# ओथांबे


रवीन्द्र केळेकर

अनुवाद

रेखा देशपांडे





पद्मगंधा
प्रकाशन

Othambe (Collection of short reflective essays)
Ravindra Kelekar
Translated by : Rekha Deshpande

ओथांबे (मूळ कोंकणी पुस्तकाचा अनुवाद)
रवीन्द्र केळेकर
अनुवाद : रेखा देशपांडे



**प्रकाशक** । अरुण जाखडे
पद्मगंधा प्रकाशन,
३६/११, धन्वंतरी सहकारी गृहरचना संस्था,
पांडुरंग कॉलनी, एरंडवन,
पुणे - ४११०३८
फोन : (०२०) २५४५५३८५, २५४४२४५५
Website : www.padmagandha.com
E-mail : arunjakhade@padmagandha.com



**मुखपृष्ठ** । डॉ. सुबोध केरकर

**मुखपृष्ठ अक्षरलेखन** । कुमार गोखले

**प्रथमावृत्ती** । ३१ जुलै २०१०

**मुद्रक** । श्रीबालाजी एंटरप्रायझेस
धायरी, पुणे - ४११०४१

**मूल्य** । १५० रुपये

ISBN 978-81-86177-33-4

'मागे राहिलेल्या कोंकणीला तिच्या भाषाभगिनींच्या पंगतीला कधी बसता येईल?'
या माझ्या प्रश्नाला, 'लागतील शे-दोनशे वर्षं... आजपासून प्रयत्नाला लागूया,
तेवढाच एक दिवस कमी होईल.' असे उत्तर देऊन मला माझ्या वयाच्या
सतराव्या वर्षी माझ्या जीवनाचे 'मिशन' दाखवून देणाऱ्या–
**प्रो. शांताराम आमोणकरांना**
विनम्रतापूर्वक




# सांगण्यासारखे...

जे सांगण्यासाठी इतरांना पूर्ण पुस्तक लिहावे लागते, पुस्तक लिहूनही कधी-कधी सांगता येत नाही, ते आपल्याला दहा ओळींत सांगता यायला हवे, असा निश्चय जर्मन तत्त्वज्ञ नीत्शे याने केला आणि 'ट्वायलाइट् ऑफ द आयडॉल्स्' आणि 'अँटि-ख्राइस्ट'सारखी पुस्तके त्याने लिहिली. ही पुस्तके वाचली, तेव्हा वाटले, जे सांगण्यासाठी मला एक पूर्ण 'स्वगत' लिहावे लागते, ते दहा ओळींत सांगता आले नाही, तरी एक-दोन पानांत तरी सांगता येते की नाही, ते पाहायला हवे. 'स्वगत' या नावाचे एक सदर मी मराठीत लिहीत होतो. ते पणजी येथून निघणाऱ्या 'नवप्रभा' दैनिकाच्या रविवार पुरवणीत सतत वीस-बावीस वर्षे प्रसिद्ध होत होते. प्रसार-माध्यमांच्या वृद्धीमुळे लिखित शब्दांचे मोल खूपच कमी झाले आहे. कमीत कमी शब्द वापरून त्यांचे मोल वाढवता येते का, ते पाहायला हवे. म्हणून मग मधून-मधून मी तसे लिहू लागलो आणि इथे-तिथे ते देऊ लागलो. गेल्या दहा-पंधरा वर्षांतले असलेच लिखाण इथे संग्रहित केलेले आहे.

अशा प्रकारच्या लेखनाचे दोन प्रयोग यापूर्वी केले होते. एक 'वेळे वयल्यो घुलो' या पुस्तकात आणि दुसरा 'सांगाती'त. 'ओथांबे' त्याच परंपरेतले पुस्तक. तिसऱ्या प्रयोगाच्या रूपाने जन्माला आलेले. श्रावणातल्या पावसाची सर पडून गेल्यानंतर झाडांच्या पानांवरून टप टप थेंब पडत राहतात, त्यांना कोंकणीत 'ओथांबे' असे म्हणतात. 'ओथांबे'साठी मराठीत कोणता शब्द वापरावा, हे मला सुचले नाही ते नाहीच. पुस्तकाचा मराठीत अनुवाद करणाऱ्या रेखा देशपांडे यांनाही सुचले नाही. याशिवाय 'ओथांबे' या शब्दातूनच त्याचे एक ध्वनिचित्र साकारते, असे वाटते. तेव्हा म्हटले, या मराठी अनुवादाला 'ओथांबे' हेच नाव द्यावे. मराठीकडून कोंकणीने पुष्कळ काही घेतले आहे. कोंकणीचा एक शब्द मराठीने स्वीकारला, तर तिचे काय नुकसान होणार आहे?

सांगण्यासारखे वाटले, ते कमी शब्दांत सांगण्याचा यातून प्रयत्न केला. ते आता इतरांना वाचावेसे वाटावे, अशी आशा करतो.

प्रियोळ-गोवा

**– रवीन्द्र केळेकर**

# व्रतस्थ लेखक रवीन्द्रबाब

२२ नोव्हेंबर २००८ ही तारीख गोवा व कोंकणी भाषा व साहित्याच्या इतिहासात सुवर्णाक्षरांत लिहिली जाईल. थोडा झिजलेला शब्दप्रयोग वाटला, तरी संघर्षमय कोंकणी भाषेच्या संदर्भात, त्याला विशेष असा अर्थ प्राप्त होतो. सुप्रसिद्ध कोंकणी लेखक श्री. रवीन्द्र केळेकर यांना अत्यंत प्रतिष्ठेचा 'ज्ञानपीठ' पुरस्कार जाहीर झाला आणि कोंकणी भाषेची शक्ती व तिच्या साहित्याचा दर्जा एकाच बरोबर अधोरेखित झाला, असे म्हटले तर ते वावगे ठरू नये. या पुरस्कारामुळे समस्त भारतीय साहित्यविश्वाचे लक्ष या उपेक्षित भाषेकडे वेधले आहे. तसे पाहिले तर गिरीश कर्नाड, विंदा करंदीकरांनंतर हा बहुमान मिळविणारे ते तिसरे कोंकणी माणूस ठरतात.

केळेकरांचा जन्म ७ मार्च १९२५ या दिवशी कुंकळ्ळी या त्यांच्या आजोळी झाला. त्यांच्या आईचे वडील लिंगू रघुवीर दळवी हे व्यवसायाने वकील व पोर्तुगीज सरकारच्या सेवेत उच्चपदस्थ होते. हिंदू असूनही त्या काळात त्यांचे पोर्तुगीज भाषेवर प्रभुत्व होते व त्यांनी त्या भाषेत इतिहास व कायदा या विषयांवर लेखन केले होते. भारतीय संस्कृतीची ओळख पोर्तुगीज साम्राज्याला करून देण्यासाठी हिंदू धार्मिक ग्रंथांचा पोर्तुगीज अनुवाद करण्याचा त्यांनी संकल्प सोडला होता. पण त्यांच्या अकाली निधनामुळे हा संकल्प अपुरा राहिला. आपल्या कलकत्त्याच्या प्रवासात त्यांनी गुरुदेव रवीन्द्रनाथ टागोरांची भेट घेतली होती आणि आपल्या नातवाला रवीन्द्र हे नाव त्यांनीच ठेवले. ज्ञानसाधनेचा हा वारसा केळेकरांना त्यांच्या आजोबांकडून मिळाला. त्यांचे वडील डॉ. राजाराम पुंडलिक केळेकर हे व्यवसायाने डॉक्टर होते व त्यांची उभी हयात दीव येथे डॉक्टरकी करण्यात गेली. ते स्वत: उत्तम वाचक होते. पोर्तुगीज - फ्रेंच साहित्याचा त्यांचा गाढा व्यासंग होता. त्यांनी केलेला भगवद्‌गीतेचा पोर्तुगीज अनुवाद महत्त्वाचा मानला जातो. एकदा ज्ञानकोशकार डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर कोशाचे खंड विकण्यासाठी जुनागढहून दीवला कसे आले आणि डॉ. केळेकरांनी त्यांचा सत्कार कसा केला, त्याची हृद्य

आठवण रवीन्द्रबाबनी लिहिली आहे. उच्चपदस्थ पोर्तुगीज अधिकाऱ्यांची त्यांच्या घरी ऊठबस असल्यामुळे त्यांना पोर्तुगीज भाषेची तोंडओळख झाली.

केळेकरांचे प्राथमिक शिक्षण गुजराती माध्यमातून झाले. त्यामुळे आजही त्यांना गुजराती उत्तम लिहिता-बोलता येते. 'सेगुंद ग्राव्ह' ही पोर्तुगीज परीक्षा पास झाल्यानंतर त्यांनी गोव्यात फोंडा येथील कुलेज आल्मेद या शाळेत प्रवेश घेतला. दादा वैद्य यांसारखे ध्येयवादी समाजधुरीण ही शाळा चालवीत होते. फार महत्त्वाची गोष्ट म्हणजे, सुप्रसिद्ध कथाकार लक्ष्मणराव सरदेसाई या शाळेचे प्राचार्य होते. उत्तम साहित्याचे पहिलेवहिले संस्कार त्यांच्यावर इथेच झाले. सरदेसाईंनी त्यांच्याकडून ज्युलियो दांतश या प्रसिद्ध कादंबरीकाराची एक कादंबरी वाचून घेतली व त्यांना वाचनाची गोडी लागली. पुढे त्यांनी स्टिफन झ्वायग या जर्मन लेखकाचे समग्र साहित्य पोर्तुगीज अनुवादातून वाचून काढले आणि विशेषत: झ्वायगचे आत्मचरित्र आजही त्यांचे एक आवडते पुस्तक आहे.

पुढे तारुण्याच्या उंबरठ्यावर असताना त्यांच्या हातात स्वामी विवेकानंदांचे ग्रंथ अ ले आणि त्यांच्या जीवनाची दिशाच बदलून गेली. अरविंद विचारांचा प्रभावही काही काळ त्यांच्यावर होता. १९४६ साली डॉ. राममनोहर लोहियांनी गोवा स्वातंत्र्यलढ्याचे रणशिंग फुंकले व केळेकर या लढ्याकडे ओढले गेले. 'किंतान'ची परीक्षा विक्रमी मार्कांनी पास झालेल्या केळेकरांनी शिक्षणाकडे पाठ फिरविली आणि गोवा मुक्ती-संग्रामात स्वत:ला झोकून दिले. डॉ. लोहियांचे व्यक्तिमत्त्व व विचारांनी ते भारावून गेले आणि आजही लोहियांच्या विचारांचा प्रभाव त्यांच्या वैचारिक लेखनात डोकावतो. हिंसेच्या मार्गाने स्वातंत्र्य मिळविता येईल, असे त्यांना वाटत होते; परंतु हिंसेच्या मार्गाचा फोलपणा त्यांच्या लक्षात आला व ते गांधीजींच्या अहिंसेच्या विचाराकडे वळले. गांधी साहित्याचे सखोल चिंतन-मनन ते आजही करीत असतात. महात्मा गांधी हा कधीच न संपणारा शोध आहे, असे ते म्हणतात. महात्माजींच्या विचारांनी त्यांच्या आयुष्याला नवी दिशा मिळाली. आचार्य काकासाहेब कालेलकरांशी बा. भ. बोरकर यांनी त्यांची घडवून आणलेली भेट ही महत्त्वपूर्ण ठरली. उणीपुरी तीस-पस्तीस वर्षे त्यांना काकासाहेबांसारख्या ऋषितुल्य विचारवंतांचा सहवास लाभला. त्यांच्या ऋणातून मुक्त होणे या जन्मी शक्य नाही, असे रवीन्द्रबाब म्हणतात. काकासाहेब एक चालतेबोलते विद्यापीठ होते आणि त्यांचा एक विद्यार्थी असल्याचा सार्थ अभिमान ते बाळगतात. एरव्ही त्यांच्याकडे अन्य कुठलीच पदवी नाही. पण त्यांचा

विविध विषयांवरील व्यासंग विद्यापीठातील प्राध्यापकापेक्षा कमी नाही. आता गोवा विद्यापीठाने डी. लिट. देऊन त्यांचा सन्मान केला आहे.

पोर्तुगीजांच्या जोखडातून गोवा मुक्ती व कोंकणी भाषेचा विकास ही रवीन्द्रबाबच्या जीवनाची दोन ध्येयं बनली. काकावाडी, वर्धा इथे काकासाहेबांच्या आश्रमात असताना त्यांनी 'मीर्ग' नावाचे पाक्षिक सुरू केले. (मंगेश पाडगावकरपण त्याच काळात काकावाडीत होते.) गोवा मुक्तीच्या काही काळ आधी ते गोव्यात परतले, तेव्हा त्यांना अटक करण्यात आली. १९ डिसेंबर १९६१ रोजी गोवा मुक्त झाला, हे पाहण्याचे भाग्य त्यांना लाभले. त्यानंतर स्वतंत्र गोव्यात त्यांनी कोंकणी भाषा आणि साहित्याच्या विकासाला वाहून घेतले आणि कोंकणीत मौलिक लेखन केले.

राजकारण, समाजकारण, साहित्य आणि संस्कृती हे रवीन्द्रबाबच्या अभ्यासाचे विषय. कोंकणीला स्वकीय तसेच परकीयांकडून होणारा विरोध मोडून काढण्यासाठी त्यांनी असंख्य लेख लिहिले व वादविवाद केले. त्याचबरोबर सर्जनशील साहित्याची निर्मिती केली. त्यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा साहित्य प्रकार म्हणजे ललित निबंध. त्याचप्रमाणे प्रवासवर्णन. काकासाहेबांचे हिमालयदर्शनाचे वर्णन वाचून त्यांना हिमालय यात्रेची प्रेरणा मिळाली आणि या यात्रेचे रसाळ वर्णन त्यांच्या 'हिमालयांत' या प्रवासवर्णनात वाचायला मिळते. हे नुसतेच प्रवासवर्णन नसून, त्यांनी घेतलेला भारतीय संस्कृतीचा शोध आहे. पुढे या पुस्तकाला साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला. हा कोंकणी साहित्याचा राष्ट्रीय स्तरावरचा पहिलावहिला सन्मान होता. १९६७ साली त्यांनी जपानचा प्रवास केला. पुढे या प्रवासाचे वर्णन 'जपान जसा दिसला' या नावाने मराठीतून प्रसिद्ध झाले. एक आगळावेगळा साहित्य प्रकार त्यांनी कोंकणी साहित्यात रुजविण्याचा प्रयत्न केला तो म्हणजे, डायरी साहित्य. 'वेळेवयल्यो घुलो', 'सांगाती', 'ओथांबे' या नावाने त्या प्रसिद्ध आहेत. या साहित्यातून त्यांच्यातला चिंतक आपल्याला दिसतो. वरवर सामान्य वाटणाऱ्या गोष्टी किती अर्थपूर्ण असू शकतात, त्याचा वेध ते घेतात. 'ओथांबे' चा हिंदी अनुवाद भारतीय ज्ञानपीठ प्रकाशनने प्रसिद्ध केला आहे. वर लिहिल्याप्रमाणे त्यांच्या ललितलेखांचा संग्रह 'उजवाडाचे सूर' या नावाने प्रसिद्ध आहे. महात्मा गांधींच्या विचारांप्रमाणेच टॉलस्टॉय साहित्याचा त्यांचा गाढा अभ्यास आहे.

केळेकरांनी काही कथिका लिहिल्या त्याचप्रमाणे 'तुळशी' ही कादंबरिका लिहिली. त्यांनी कोंकणीत रूपांतरीत केलेल्या गुजराथी व फ्रेंच नाटकांचे

प्रयोग नाट्य रसिकांना आकर्षित करणारे ठरले. त्यांनी काही कविता केल्या असल्या तरी त्यांच्या ललित लेखनात काव्य व चिंतन यांचा सुरेख मेळ झालेला आढळतो. 'आज पुनव ओतताली' हा त्यांचा ललित लेख विशुद्ध काव्याची अनुभूती देतो.

कोंकणी साहित्याची क्षमता सिद्ध करणारी त्यांची साहित्यकृती म्हणजे दोन खंडात प्रसिद्ध झालेला 'महाभारत' या महाकाव्याचा अनुवाद. त्याला अनुवाद असे न म्हणता रवीन्द्रबाब त्याला अनुसर्जन असे म्हणतात. आजपर्यंत महाभारताचे जे अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत त्यांचा धांडोळा घेऊन हे अनुसर्जन झाले आहे. सहा वर्षाच्या अथक परिश्रमातून आठशे पृष्ठांचा हा ग्रंथ आकारास आला. या कामात त्यांची पत्नी गोदुबाय यांनी त्यांना जी साथ दिली त्याला तोड नाही. या अनुसर्जनाचे कित्येक वेळा त्यांनी न कंटाळता पुनर्लेखन केले.

रवीन्द्रबाब यांच्या साहित्याचा आढावा छोट्या अवकाशात घेणे शक्य नाही. त्यांना आकाश वाचण्याचा छंद आहे व या छंदातून 'ब्रह्मांडांतलें तांडव' या सुंदर पुस्तकाची निर्मिती झाली. 'समिधा' व 'घुस्पल्लें जानवें' हे त्यांच्या वैचारिक लेखांचे महत्त्वाचे संग्रह. त्याचप्रमाणे 'पांथस्थ' हे आत्मचरित्रात्मक लेखन गोवा स्वातंत्र्यसंग्रामाचे दर्शन घडविते. कोंकणीबरोबरच मराठी व हिंदी भाषांतून त्यांनी विपुल लेखन केले आहे. 'नवप्रभा' या दैनिकातून त्यांनी अनेक वर्षे रविवारच्या पुरवणीत सदर लेखन केले. त्याचे काही खंड प्रकाशनाच्या मार्गावर आहेत. त्याशिवाय 'महात्मा गांधी - एक जीवनी', 'काकासाहेब कालेलकर : अधिकृत जीवनी' ही दोन हिंदीतून लिहिलेली चरित्रे विशेष उल्लेखनीय आहेत. त्यांचे गांधीचरित्र अलाहाबाद विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात समाविष्ट झाले यावरून त्यांचे हिंदी भाषेवरील प्रभुत्व अधोरेखित होते. रवीन्द्रनाथ टागोरांच्या मूळ बंगाली साहित्याचा आस्वाद घेण्यासाठी ते उतारवयात महात्माजींचे बंगाली शिक्षक शिवबालक बिसेन यांच्याकडून बंगाली शिकले, यावरून त्यांच्या ज्ञानलालसेची कल्पना येते.

स्थापत्यशास्त्राचा आगळावेगळा नमुना असलेल्या वास्तूत विविध विषयांवरील कोंकणी, मराठी, हिंदी, पोर्तुगीज, फ्रेंच, इंग्लिश पुस्तकांनी खचाखच भरलेल्या कपाटांच्या सान्निध्यात त्यांचे वाचन-लेखन चाललेले असते. म्हार्दोळ येथे असलेले त्यांचे घर शहराच्या कोलाहलापासून दूर आहे. रवीन्द्रबाब यांचे हे घर म्हणजे ज्ञानमंदिर वाटते. ते सतत नवनवीन पुस्तकांच्या शोधात असतात. एखादे बुद्धीला खाद्य देणारे पुस्तक हातात आले की त्यांना परमानंद वाटतो. कोंकणी साहित्यातील अनेक पिढ्या त्यांच्या तालमीत तयार झाल्या. एक व्रतस्थ लेखक

म्हणून आम्ही त्यांच्याकडे पाहतो. बुद्ध व बौद्ध धर्माविषयी ते बोलतात तेव्हा तो एक आगळा अनुभव असतो.

असे हे बहुआयाम असलेले कोंकणीतून लिहिणारे रवीन्द्रबाब भारतीय लेखक आहेत.

**– माधव बोरकर**

## अथ रवीन्द्रोपनिषदम्

सकल सन्माननीय तसेच आदरणीय श्रीयुत रवीन्द्र केळेकर यांना आज 'ज्ञानपीठ' विजेते विचारवंत व साहित्यिक म्हणून भारतीय सारस्वताच्या मांदियाळीमध्ये ओळखले जाते. 'ओथांबे' हा त्यांचा मुक्तचिंतनपर स्फुट लेखांचा संग्रह. तो सन २००० मध्ये प्रकाशित झाला. त्याचा हिंदी अनुवाद डॉ. माधवी सरदेसाई यांनी केलेला असून तो 'पतझर में टूटी पत्तियाँ' या शीर्षकाखाली प्रसिद्ध झालेला आहे. विशेष म्हणजे हा अनुवाद भारतीय ज्ञानपीठ, दिल्ली (२००५) यांच्याद्वारे प्रकाशित केलेला आहे. आणि आज 'ओथांबे' या मूळ कोंकणी पुस्तकाचा, रेखा देशपांडे यांनी केलेला मराठी अनुवाद प्रसिद्ध होत असलेला पाहून मला अत्यंत आनंद होत आहे. आनंद कशासाठी, तर मूळ कोंकणी 'ओथांबे'च्या प्रकाशन सोहळ्यात मला प्रमुख वक्ता म्हणून पुस्तकासंबंधी चार शब्द बोलण्यास आमंत्रित करण्यात आलेले होते. माननीय रवींन्द्रबाबांचे वय आणि अधिकार पाहता मला दडपून गेल्यासारखे वाटणे साहजिक होते. त्यांच्या उपस्थितीत त्यांच्या पुस्तकासंबंधी बोलणे, तेही प्रकाशन सोहळ्यात! आव्हानच होते. अमर्याद! परंतु 'बोलणे' संपवून खाली बसलो तेव्हा टाळ्यांचा अव्याहत गजर ऐकू आला. हायसे वाटले. नंतर अनेकांनी प्रत्यक्ष भेटून भाषण आवडल्याचे सांगितले. 'ओथांबे'वरचे हे कोंकणी भाषण 'जाग' या साक्षेपी नियतकालिकामधून छापून यावे व ते सर्वांना उपलब्ध व्हावे, असे मला अनेकांकडून निरोप आले. 'जाग'च्या कार्यकारी संपादकांकडूनही विचारणा झाली. परंतु मुळातले भाषण माझ्याकडे लिखित स्वरूपात उपलब्धच नव्हते, तेव्हा या वाटण्या-असण्याला काही अर्थच नव्हता.

पुढे कधी तरी पणजी आकाशवाणी केंद्राकडून 'ओथांबे'वर कोंकणीमधून लघुभाषणासाठी आमंत्रण मिळाले. भाषण ध्वनिमुद्रित झाले. अनेकदा प्रसारितही झाले. ते लिखित स्वरूपात होते. पुढे ते 'जाग'मधून प्रकाशितही झाले. 'क्ष : समिक्षेंतलो' या माझ्या कोंकणी साहित्य समीक्षाविषयक (पारितोषिकविजेत्या) ग्रंथामध्ये त्याचा समावेश करण्यात आलेला आहे.

आणि आता फिरून पुन्हा 'ओथांबे'च्या मराठी आवृत्तीकरिता मी काही

लिहावे, असे मला सांगण्यात आले. नाही म्हणताच येणे नाही. तर असा हा मी आणि 'ओथांबे' या पुस्तकामधील ऋणानुबंध!

'ओथांबे' आता मराठीतून टपटपायला लागतील तेव्हा यच्चयावत् मराठी प्रज्ञावंतांचे कान टवकारले गेल्याशिवाय राहणार नाहीत. त्याचप्रमाणे महाराष्ट्रदेशीच्या विवेचक विचारवंतांच्या तोंडी हे 'रवीन्द्रोपनिषद' पुढील अनंत काळापर्यंत तरी सुरक्षित राहील, याची खात्री वाटते. तसे पाहायला गेल्यास श्रीमान रवीन्द्र केळेकर हे नाव एक लेखक म्हणून मराठी भाषेला अपरिचित मुळीच नाही. 'जपान जसा दिसला' यासारखे विलोभनीय प्रवासवर्णन त्यांनी मराठी शारदेच्या प्रांगणात रुजू केलेले आहेच. 'भाषिक संघर्षाचे समाजशास्त्र' हा ग्रंथही मराठी अनुवादातूनच सिद्ध झालेला आहे. आणि तो मराठी भाषिक आणि मराठी भाषाशास्त्रज्ञांच्या हातात अलीकडेच पडलेला आहे. शिवाय 'ज्ञाननिधीच्या सान्निध्यात' आणि 'कोंकणीचे राजकारण' अशी दोन पुस्तके त्यांनी मराठीतून पूर्वी लिहिलेली आहेतच. याव्यतिरिक्त गोव्यातून प्रसिद्ध होणाऱ्या दैनिक 'नवप्रभा' या वृत्तपत्राच्या रविवार पुरवणीतून 'स्वगत' या नावाचे सदर त्यांनी १९८० ते १९९९ पर्यंत सातत्याने चालविले होते. त्यातून त्यांनी आपल्या विचारांना, चिंतनाला आणि निरीक्षणांना शब्दबद्ध केलेले आहे; तेही आता ग्रंथबद्ध होऊन प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

'ओथांबे' हे रवीन्द्रबाब यांचे प्रेरक असे चिंतनशिल्प आहे. परंतु या चिंतनशिल्पाचा प्रारंभ त्याच्याही पूर्वी लिहिलेले त्यांचे कोंकणी पुस्तक – 'वेळेवयल्यो घुलो' – या दैनंदिनी स्वरूपाच्या लेखनापासून झालेला पाहावयास मिळतो. 'वेळेवयल्यो घुलो' (१९७१) या पुस्तकातून आलेले लेखन हे केवळ दैनंदिनी नव्हे. निमित्त दैनंदिनीचे. मात्र त्यातून रवीन्द्रबाबांचे समाज-संस्कृतीविषयीचे चिंतनच प्रामुख्याने शब्दबद्ध झालेले आहे. त्याचे स्वरूप अनुभव, निरीक्षण, चिंतन इत्यादींची नोंद या स्वरूपाचे असून त्यासाठी त्यांनी निबंधसदृश फॉर्मची निवड केलेली आहे. याच्या पुढच्या टप्प्यावर त्यांनी 'उजवाडाचे सूर' (१९७३) आळवले. पाठोपाठ १९७७ मध्ये 'सांगाती' आले. 'उजवाडाचे सूर' आणि 'सांगाती' ही दोन्ही पुस्तके कोंकणी भाषेतूनच आहेत. १९८० ते १९९९ पर्यंत त्यांनी 'स्वगत' लिहिले. 'समिधा' हे सदर 'सुनापरान्त' या कोंकणी दैनिकातून १९८६ ते १९८७ पर्यंत चालले. पुढे 'समिधा' हे पुस्तकाच्या रूपात लोकांपर्यंत पोहोचले. 'नदर संपादप्याची' हे 'जाग' या कोंकणी मासिकातून त्यांचे संपादकीय १९८८ पासून सुरू झाले ते ऑगस्ट २००७ पर्यंत अखंडपणे चालले. या सर्व कोंकणी-मराठी लेखनाचे स्वरूप हे कमीअधिक फरकाने निबंधाचे आहे. स्फुट

आहे. कधी हा निबंध वैचारिक रूप घेतो, कधी खेळकर बनतो, कधी मिश्कील होतो, कधी ललितमधुर होऊन बरसतो, तर कधी चिंतनात डुंबून जातो. कधीकधी तर तो प्रबोधनाचे कोरडे आसूड ओढायलाही मागेपुढे पाहत नाही. परंतु या सर्वांच्या मुळाशी एकच एक जिव्हाळा, एकच एक तळमळ, आणि एकच एक व्रत असलेले जाणवते; आणि ते म्हणजे 'जे जे आपणांसि ठावें । ते ते इतरां शिकवावें । शहाणे करुनी सोडावे । अवघे जन ।' १९९९ मध्ये प्रकाशित झालेले त्यांचे 'ओथांबे' म्हणजे या सगळ्याचे सार आहे, या सगळ्याचे सत्त्व आहे, या सगळ्याचा तो कळसाध्याय आहे.

'वेळेवयल्यो घुलो' या पुस्तकातील लेखनही प्रथम 'वासरिका' या सदराखाली दैनिक 'राष्ट्रमत'मधून क्रमशः प्रसिद्ध झालेले होते (२९-११-१९७० ते २१-६-१९७५). या पुस्तकाला 'दोन उतरां' म्हणून जे मनोगत लेखकाने लिहिलेले आहे त्यात ते म्हणतात, ''ही दैनंदिनी लिहून माझ्या हस्ते कोंकणी साहित्याची सर्वांत चांगली सेवा घडलेली आहे.'' कोंकणी साहित्याने त्यांचे हे ऋण मान्य करण्यासारखे आहेच; परंतु मी तर असे म्हणेन की, त्यांच्या या लेखनाने त्यांच्या प्रज्ञाकोशात 'ओथांबे'चे बीज रुजू घातले, त्यासाठी मराठी साहित्यजगतानेच नव्हे, तर अखिल भारतीय साहित्यविश्वाने त्यांचे ऋणाईत होऊन राहिले पाहिजे.

'उजवाडाचे सूर'च्या 'मखलाशी' या निवेदनात ते लिहितात की, ''हे लिखाण दहा वर्षांपूर्वीचे आहे... संस्कृतीच्या क्षेत्रात वावरणाऱ्या माणसाला विकृतीचे फोफावलेले रान दया-माया बाजूला सारून कापून काढावेच लागते.'' यातून काही घटना, काही प्रसंग, काही स्थळे, काही अनुभव, तर काही द्रष्टेपणाचे लेखन आलेले आहे. खबरी (हकिकती) सांगितल्यासारखे त्यांनी ते सांगितलेले आहे. त्यांच्या या सांगण्याला एक विशिष्ट लय आहे. वळण निबंधाचे परंतु चलन कथेचे आहे. वास्तवात पाहू गेल्यास ही आत्मनिवेदने आहेत.

'वेळेवयल्यो घुलो' या त्यांच्या पुस्तकाला सन्माननीय डॉ. मनोहरराय सरदेसाई यांनी 'घुलो कानाक लायतकूच' या शीर्षकाची प्रस्तावना लिहिलेली आहे. त्यातून ते रवीन्द्रबाबांच्या लेखनाचा पिंड शोधतात. त्याचा त्यांनी रवीन्द्रधर्म म्हणून उल्लेख केलेला आहे. त्यात त्यांनी लिहिलेले आहे, ''(रवीन्द्रबाब) उतरांत (शब्दात) गंध आणि अर्थ शोधतात... सत्याचा शोध लावणारी चिंतने... त्यातून दैनंदिन जीवनाचे दर्शन घडो वा न घडो, मनाचे दर्शन घडते... त्यांचे व्यक्तिमत्त्व स्पष्ट होत जाते. ...रवीन्द्रांचे लेखन म्हणजे एक साधनाच... दैनंदिनी लेखन म्हणजे एक प्रकारचे अत्मलेखन... आपल्याच जीवनावर आपणच केलेली

एक धावती commentary. त्यांच्या या लेखनाला जीवनाची लांबी-रुंदी प्राप्त झालेली आहे.''

रवीन्द्रबाब 'धुळो'च्या मनोगतात म्हणतात, ''माझा स्वभाव काहीसा चिंतकाचा. कोणतीही साधीसुधी गोष्ट कधीकधी मला गंभीर बनवून जाते आणि चिंतनाच्या गावी कुठेतरी खोल खोल ओढून नेते.'' नेमक्या शब्दांत या लेखनाचे वर्म आणि धर्म सांगताना ते लिहितात की, ''एकमेकांशी संबंध नसलेली ही त्रुटित चिंतने असली; तरीदेखील ती पावसातल्या पागोळेगत थेंबा-थेंबाने पडणारी आणि सतत स्रवणारी.''

'उजवाडाचे सूर' या पुस्तकाचा जो ब्लर्ब आहे, त्यात लिहिले आहे : ''जीवनाच्या विस्तारात खोल खोल ओढून नेणारे लेखन. जे दिसते त्याच्यामागे असलेल्या सत्य-शिव-सुंदराची ओळख करून देणारे लेखन.'' स्वत: रवीन्द्रबाबांनी या लेखनाला personal essays आत्माभिव्यक्तीचे लेखन, असेच म्हटलेले आहे.

त्यांचे 'सांगाती'मधील लेखनही याच जातकुळीचे आहे. त्यातून जसे अनुभवकथन आलेले आहे तसेच रवीन्द्रबाबांच्या चिंतनशीलतेचे आणि विचारवैभवाचे मनोज्ञ दर्शन पानापानांतून वाचकाला घडल्याशिवाय राहत नाही. एवढी एक गोष्ट जरी इथे नोंदवली तरी या लेखनाचे मोल सुज्ञांस अधिक सांगण्याची गरज ती काय?

रवीन्द्रबाबांच्या या विचारयात्रेचा चौथा अध्याय म्हणजे त्यांचा 'ओथांबे' हा ग्रंथ. होय, ग्रंथच. पुस्तकाला पाने असतात. परंतु ग्रंथाला पाने नसतातच. त्याला असतो विस्तार – असीम, अमर्याद, अनंत. असते खोली, गहनाई – गर्द, सखोल. त्यांच्या आधीच्या तिन्ही अपत्यांचे सारे गुणधर्म त्यांच्या या चौथ्या सृजनात उतरलेले आहेतच; शिवाय त्यांचे, खास त्यांचेच, असेही काही अधिकचे गुणविशेष या लेखनाला सचेतन व ऊर्जस्वल बनवितात असा अनुभव आहे.

रवीन्द्रबाबांनी या ग्रंथात 'सांगण्यासारखे' म्हणून जे एक छोटेखानी; पण धीट आणि नीट मनोगत दिलेले आहे ते वाचकाला 'सावधान' करतेच, शिवाय पुढील पृष्ठांतून घडणारे विश्वरूप दर्शन कसे पाहावे व समजून घ्यावे याची एक दिव्य दृष्टीही देऊन जाते. ही दिव्य दृष्टी जो न घेईल तो करंटाच म्हणावा लागेल. कारण 'दोग्धा गोपालनंदन' असून पुरत नाही, ते दुग्ध प्राशन करणाराही अर्जुन असावा लागतो. जगातील पौर्वात्त्य तसेच पाश्चात्त्य तत्त्वज्ञान परंपरांचे सारसर्वस्व त्यांच्या या 'ओथांबे'मध्ये पुरेपूर भरून उरलेले आहे.

रवीन्द्रबाब मनोगतात लिहितात, ''जे सांगण्यासाठी दुसऱ्यांना एक पूर्ण पुस्तक लिहावे लागते, पुस्तक लिहूनही कधीकधी सांगून संपत नाही, ते

अपणाला दहा ओळींमध्ये सांगता आले पाहिजे, अशी इच्छा जर्मन तत्त्वज्ञ नीत्शे यांनी बाळगली आणि 'Twilight of the Idols' आणि 'Anti-Christ' यांसारखी पुस्तके लिहिली. ही पुस्तके वाचली तेव्हा जाणवले, जे सांगण्यासाठी मला एक पूर्ण 'स्वगत' लिहावे लागते, ते दहा ओळींत नको पण निदान एक-दोन पानांमध्ये सारांश रूपात सांगता येते का पाहूया. प्रसार माध्यमांच्या वृद्धीमुळे शब्दांचे मोल खूपच उणे झालेले आहे. उण्यात उणे शब्द वापरून त्यांचे मोल वाढवता येते का ते पाहिले पहिजे आणि मी अधून मधून तसे लिहू लागलो.''

कोंकणी 'ओथांबे'चा ब्लर्ब कविवर्य माधव बोरकर यांनी लिहिलेला आहे. तो वाचनीय आहे. शिवाय रवीन्द्रबाबांच्या लेखनाची अचूक नाडीपरीक्षा त्यांना झाल्याचे त्यातून सूचित होते. त्यात ते लिहितात, '''ओथांबे' वाचताना डाग हेम्मरशोल्डाच्या 'Markings'ची याद येते. मनात आलेले विचार, सूक्ष्म भावना, जीवन आणि मरण याविषयीचे खोल चिंतन हेम्मरशोल्ड मार्क करून ठेवत असे. त्याचप्रमाणे रवीन्द्रबाबांमधील चिंतक कवीच्या नजरेने ह्या जगाकडे पाहतो आणि ज्या गोष्टी सामान्यपणे आमच्या नजरेला दिसत नाहीत त्या अचूक टिपतो.''

याच प्रकारात अंतर्भाव होणारी त्यांची दोन पुस्तके 'घुस्पल्लें जानवें' (२०००) आणि 'अघळपघळ' (२००५) 'ओथांबे'नंतर कोंकणीत प्रकाशित झाली. पैकी दुसऱ्या पुस्तकाच्या मनोगतात ते लिहितात, ''आयुष्यभर हे लिहिले पाहिजे, ते लिहिले पाहिजे असे म्हणत लिहीत आलो. या पुस्तकामधील एकही लेख, लिहिले पाहिजे, म्हणून विचार करून लिहिलेला नाही.'' याचाच अर्थ अशा प्रकारच्या त्यांच्या लेखनाचे दोन विभाग करता येतील. एक अभ्यासपूर्ण व नियोजित, तर दुसरा मुक्त व स्वच्छंदी. पहिल्याची बैठक प्रज्ञेची आहे, तर दुसऱ्याला कवितेचे पंख लाभलेले आहेत. प्रज्ञा आणि प्रतिभेचा असा विलास त्यांच्या एकूणच निबंधलेखनातून अनुभवावयास मिळतो.

''लेखकाने स्वाध्याय केलाच पाहिजे. त्यात शिस्त असली पाहिजे. नियोजन पाहिजे.'' हे साहित्यनिर्माणप्रक्रियेविषयीचे आपले मत त्यांनी एके ठिकाणी नोंदविलेले आहे. वाचन, मनन, चिंतन, भ्रमण आणि अनुभवन ही त्यांच्या एकूणच लेखनाची पंचसूत्री म्हणून सांगता येईल. 'ओथांबे'मधील लेखन हा तर याचा वस्तूपाठच!

रवीन्द्रबाब बहुभाषिक. कोंकणीव्यतिरिक्त गुजराती, मराठी व हिंदी या देशी भाषा आणि इंग्रजी व पोर्तुगीज या विदेशी भाषा त्यांना चांगल्या अवगत आहेत. सर्वप्रथम ते एक चांगले वाचक आहेत. जगातले उत्तमोत्तम साहित्य त्यांनी प्रसंगी

मिळवून वाचून काढले आहे. त्यात वेद-उपनिषदे, जैन व बौद्ध वाङ्मय, संतवाङ्मय तसेच आधुनिक भारतीय श्रेष्ठ साहित्यकृतींच्या बरोबरीनेच विश्वसाहित्यातील टॉलस्टॉय, गोर्की, चेकोव्ह, फेर्नान्दु पेस्सोआ इत्यादी लेखकांच्या साहित्याचा समावेश होतो. भारतीय व पाश्चात्त्य तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांचा व लेखनाचा त्यांचा व्यासंग असल्याचे त्यांच्या लेखनातून जाणवते. त्यात सर्वच धर्माच्या तत्त्वज्ञानाचा माणसाच्या उन्नतीला व 'माणूस' म्हणून जगण्यासाठी कसा आणि किती उपयोग झालेला आहे आणि पुढेही होऊ शकतो यांविषयीचे त्यांचे साधार विवेचन मर्मग्राही, नेटके व सुस्पष्ट असते. महात्मा गांधींच्या विचारांचा प्रभाव त्यांच्या लेखनावर सखोल आणि सर्वाधिक जाणवतो.

'ओथांबे'मधील लेखनाला रवीन्द्रबाबांनी जरी 'त्रुटित स्वरूपाचे' म्हटले असले तरी त्यांच्या या लेखनातून एक सूत्र, एक अखंड सूत्र, गुंफलेले मला सतत जाणवत आलेले आहे. ते म्हणजे जीवनोपनिषदाचे सूत्र. त्यामुळेच या लेखनाला उपनिषदांची सूत्रबद्धता आणि संवादीपणा स्वभावतःच प्राप्त झालेला आहे. सकृद्दर्शनी 'अणुरेणुयां थोकडा' या स्वरूपाचे वाटणारे हे 'ओथांबे' अथांग आकाशात दिगंत प्राज्ञ शिखरे आणि अवीट गोडीची प्रातिभ शिल्पे भाव-विचारांच्या मयुर कुंचल्याने कोरताना दिसतात.

रवीन्द्रबाबांचे हे 'ओथांबे' लहान-मोठ्या आकाराचे. लहानात लहान अडीच ओळींचा, तर मोठ्यात मोठा अडीच पृष्ठांचा. परंतु दोन्हींचे वजन, दोन्हींचे मूल्य एकसारखे. 'जीवनाचा आकार कैसा?' तर 'त्याच्या पात्रा ऐसा' हेच त्याचे उत्तर. परंतु पूर्ण सत्य नव्हे. पूर्ण सत्य काय? पूर्ण सत्य 'जीवना'कार 'जीवन'. त्यांचे हे 'ओथांबे' वाचकाला अशा 'जीवना'ची जीवनयात्रा घडवून आणतात, अनुभवाच्या अथांग, अनंत महासागरात बुडी मारण्यास, उडी मारण्यास त्याला ते प्रेरित करतात. पाण्याने पाणी बांधून आणावयास गुरूने सांगावे तसाच हा एक अंतर्यामी अनुभूतीचा सर्वांगीण सर्वसाक्षी अनुभव. नीति-अनीति, चारित्र्य-चारित्र्यहीनता, सृजन, शिक्षण, समाजकारण, राजकारण, अर्थकारण, साहित्य संस्कृती व कला, भाषा व भाषावाद, मूल्य व नवमूल्यविचार, कर्म व धर्मप्रवणता, ज्ञान-विज्ञान, यम-नियम, धर्मशास्त्र, वेद-वेदांगे, बायबल, कुराण, उपनिषदे, बौद्ध-जैनादी तत्त्वज्ञाने, मार्क्सवाद, गांधीवाद, लोकशाही, समाजवाद-साम्यवाद, culture and civilization, दुष्टता-सुष्टता, संत-असंत, तत्त्वज्ञान-तंत्रज्ञान, आंबेडकर-तुकाराम, पर्यावरण, लोक व लोकाचार, सूर-तुलसी-मीरा-कबीर, गांधी-टॉलस्टॉय-टागोर असे अनेकानेक अफाट, अनंत विषय. हे विषय म्हणजे एक एक ब्रह्मांडच. त्याची एक सहज सहल, एक

परिक्रमा ते वाचकाला घडवून आणतात. त्यांच्यामधील मित्र, तत्त्वज्ञानी व गुरू या प्रवासात वाचकाला मागे पुढे सांभाळीत असतो.

उपनिषदांच्या परंपरेतला आणि 'लीळाचरित्रा'च्या जातकुळीतला हा ग्रंथ कोंकणी भाषिकांनाच नव्हे, तर अखिल मानव समाजाला सतत साद देत राहील, असे तेज या ग्रंथात निश्चितच आहे. आम्ही अक्षराचे उपासक, सारे तेजाचेच पुजारी. तेज:सूर्याचे, तेज:ज्योतीचे पुजारी. भारतीय ज्ञानपीठसूर्याची, ज्योतीने केलेली ही तेजाची आरती.

२६ जानेवारी २०१०

**– डॉ. बाळकृष्णजी कानोळकर**
असोसिएट प्रोफेसर, मराठी विभाग,
गोवा विश्वविद्यालय, गोवा.

। १ ।

जिभेची कामं दोन – कडू, गोड, तिखट चवी ओळखणं, हे एक आणि कडू, गोड, तिखट बोलणं, हे दुसरं. दोन्हींवर नियंत्रण हवं. ते राहिलं नाही, तर पहिली गोष्ट, माणसाची प्रकृती बिघडते आणि दुसरं, त्याचे संबंध बिघडतात.

जिभेला हाड नसतं.

कोणी तरी म्हटलंय, 'The boneless tongue, so small, so weak can crush and kill.' हाड नसलेली ही लहानशी जीभ कधी कुणाला चिरडून मारून टाकील, सांगता येणार नाही. द्रौपदीच्या जिभेनं अठरा अक्षौहिणी सैन्य गारद केलं होतं. तलवारीहूनही जिभेची ताकद मोठी. हाड नसलेली ही जीभ कधी कोणती अरिष्टं आणील, सांगता येणार नाही.

म्हणून जिभेवर नियंत्रण हे हवंच.

काळजात असेल, ते जिभेवर येतं. काळीज नितळ असेल, तर जिभेवरही निर्मळ शब्द उतरतात. काळीजच बुरसटलेलं असेल, तर जीभही बुरसटते. भोवताली स्वर्ग निर्माण करायचा की नरक, हे जिभेवर अवलंबून असतं. पाय घसरला तरी चालेल; पण जीभ घसरू देऊ नये.

जो जीभ सांभाळतो, तोच स्वत:ला सांभाळू शकतो

। २ ।

कोणतं काम हाती घ्यावं?

पहिला आदर्श – या आयुष्यात पूर्ण करता येईल, असं.

दुसरा आदर्श – या आयुष्यात संपवता येणार नाही, इतकंच नव्हे; तर एकट्या माणसाच्या हातून कधीच पूर्ण होऊ शकणार नाही, असं.

पहिला आदर्श स्वीकारला, तर माणूस कधीही आळशी बनणार नाही.
दुसरा स्वीकारला, तर वय वाढलं, तरीही तो कधी म्हातारा होणार नाही.

। ३ ।

बावनकशी सोनं वेगळं आणि गिन्नीचं वेगळं.

गिन्नीच्या सोन्यात थोडंसं तांबं मिसळलेलं असतं, त्यामुळे ते जास्तच चमकतं. काही बायका तर, हे सोनं जास्त चमकतं; म्हणून दागिने त्याचेच करून घेतात. गिन्नीच्या सोन्याला तासही छान पाडता येतात.

पण कितीही झालं, तरी ते गिन्नीचं सोनं; शुद्ध सोनं नव्हेच.

शुद्ध आदर्श हे शुद्ध सोन्यासारखे. पण काही जण त्यात व्यवहारवादाचं थोडंसं तांबं मिसळून ते चालवून दाखवतात आणि मग भोवतालचे लोक त्यांचं 'प्रॅक्टिकल आयडियालिस्ट' म्हणून कौतुक करू लागतात. कौतुक करावं; पण एक गोष्ट विसरू नये. कौतुक होतं, ते आदर्शवादाचं नव्हे; व्यवहारवादाचं होतं आणि व्यवहारवादाचं कौतुक होऊ लागलं, म्हणजे या 'प्रॅक्टिकल आयडियालिस्टां' – मधला आदर्शवाद हळूहळू बाजूला सरत त्यांच्यातला व्यवहारवादच पुढे येऊ लागतो. आणि मग...

सोनं मागे पडतं आणि तांबंच वरचढ ठरतं.

गांधींही स्वत:ला 'प्रॅक्टिकल आयडियालिस्ट' म्हणत असत आणि लोकही त्यांना तसंच मानत असत. इतकंच नव्हे; तर ते शुद्ध आदर्शवादी असते, तर कुठल्या कुठे हरवून गेले असते. त्यांना व्यवहार कळत होता; म्हणूनच ते आपला आदर्शवाद राबवू शकले, असं म्हणणारेही काही लोक आहेत. पण एक गोष्ट विसरून चालणार नाही. गांधींचा 'प्रॅक्टिकल आयडियालिझम' आणि इतरांचा 'प्रॅक्टिकल आयडियालिझम' एक नव्हता. दोन्हींत एक मोठा फरक आहे. गांधींनी आदर्शवादाला व्यवहारवादाच्या पातळीवर उतरवलं नव्हतं; तर ते व्यवहारवादाला आदर्शवादाच्या पातळीवर घेऊन गेले. ते सोन्यात तांब्याची भेसळ करीत नसत; तर तांब्यात सोनं घालून तांब्याची किंमत वाढवीत असत.

म्हणूनच सोनं वरचढ ठरू शकलं.

व्यवहारवादी माणूस नेहमी जागरूक असतो. बघून-सवरून पावलं उचलताना तो अशा प्रकारे पावलं उचलतो, की ज्यायोगे त्याला फायदाच होईल. तो 'सक्सेसफुल' होतो; पुढे जाऊ शकतो. तो पुढे जात असेल; पण वर चढतो का? स्वत: वर चढताना आपल्याबरोबर इतरांनाही वर घेऊन जाणं महत्त्वाचं

आहे. हे काम आतापर्यंत केवळ आदर्शवादी लोकांनीच केलं आहे. समाज पुढे गेला, तो आदर्शवादी लोकांमुळेच. आज समाजात जी शाश्वत मूल्यं पहायला मिळतात, ती आदर्शवादी लोकांनीच आम्हाला दिली आहेत.

। ४ ।

आपले पूर्वज सांगून गेलेत, *'आत्मानं विद्धि'* – तू स्वतःला नीट ओळखून घे.

मी जेव्हा स्वतःला नीट ओळखतो, तेव्हा दोन फायदे होतात. एक, मी दुसऱ्यांना नीट ओळखू शकतो; आणि दुसरं, माझ्या मनाच्या भुका भागवताना मी किती क्षुद्र होतो, किती खालच्या पातळीवर उतरतो, त्याची मला जाणीव होते. आणि ज्या क्षणी मला माझ्या क्षुद्रपणाची जाणीव होते, त्या क्षणी मी त्यातून मुक्त होतो.

स्वतःला नीट ओळखण्यासाठी एक करायला हवं – क्षणोक्षणी स्वतःच्या वर्तणुकीकडे लक्षपूर्वक न्याहाळून पाहण्याची ताकद मी स्वतःच्या अंगी बाणवायला हवी.

। ५ ।

सॉक्रेटिस लोकांना विचारायचा, ''चप्पल तुटली, तर तुम्ही कोणाकडे जाल?''

''चर्मकारकडे.'' लोक म्हणायचे.

''चर्मकाराकडेच का? सुताराकडे का नाही?'' सॉक्रेटिस परत विचारायचा.

''चप्पल शिवायचं काम चर्मकाराचं; सुताराचं नाही, म्हणून.'' लोक उत्तर द्यायचे.

''बरोबर!'' सॉक्रेटिस म्हणायचा आणि पुन्हा विचारायचा, ''समजा, तुमची आई आजारी पडली, तर तिला काय औषध द्यावं, हे तुम्ही कुणाला विचाराल?''

''डॉक्टरला.'' लोक म्हणायचे.

''डॉक्टरलाच का? वकिलाला का नाही?'' तो पुन्हा विचारायचा.

''आजाऱ्याला औषध देण्याचं काम डॉक्टरचं; वकिलाचं नाही, म्हणून.'' लोक उत्तर द्यायचे.

सॉक्रेटिस अशा प्रकारे प्रश्नावर प्रश्न विचारून लोकांकडून त्यांची उत्तरं काढून घेत असे. मग खळखळून हसत म्हणत असे, ''चप्पल शिवून घ्यायची

झाली, तर तुम्ही चर्मकाराकडे जाता. घर बांधायचं झालं, तर इंजिनियरकडे जाता. घरात फर्निचर करायचं झालं, तर सुताराला सांगता. कुणी आजारी पडलं, तर डॉक्टरकडे जाता. नको ते बालंट अंगावर येऊन पडलं, तर वकिलाचा सल्ला घेता. का? हे लोक त्या त्या विषयातले तज्ज्ञ आहेत, म्हणूनच ना? तुम्हाला सगळ्या क्षेत्रात तज्ज्ञ लागतात. आणि... चोरांनो, राज्यकारभार मात्र तुम्ही कुणाच्याही हातात सोपवता. राज्य चालवायला तज्ज्ञ नकोत का?... तुमचं राज्य चांगलं कसं चालणार?''

स्वातंत्र्य मिळाल्यापासून आम्ही कुणालाही विधानसभेत पाठवलं आहे, कुणालाही लोकसभेत पाठवलं आहे, कुणालाही मंत्री केलं आहे. त्यांना काय येतं, त्यांनी याआधी काय कार्य केलं आहे, कोणत्या प्रश्नाचा अभ्यास केला आहे, हे काहीच आम्ही पाहिलं नाही. आम्ही फक्त त्याची जात पाहिली...

परिणाम काय, तर राण्यांच्या राज्यापेक्षा ताईंचं राज्य बरं होतं, ताईंच्या राज्यापेक्षा भाऊंचं राज्य किती तरी चांगलं होतं, भाऊंच्या राज्यापेक्षा फिरंग्यांचं राज्य पुष्कळ बरं होतं, असं आपण म्हणत राहिलो.

याच्यावर काही उपाय नाही का? आहे. समाजात कुणी तरी सॉक्रेटिसचं काम करायला पाहिजे आणि लोकांकडूनच प्रश्नांची उत्तरं काढून घेतली पाहिजेत. कदाचित सॉक्रेटिसप्रमाणे त्यालाही लोक विष घालून मारतील; पण लोकशाही टिकवायची, तर दुसरा उपायच नाही.

Dare to be unpopular...

। ६ ।

धर्माला कंटाळलेले लोक अध्यात्मही सोडून देतात.

धर्म आणि अध्यात्म एकच नव्हे.

आम्ही कोण, हे विश्व म्हणजे काय, विश्वाचा आणि आमचा संबंध काय, हे अध्यात्म आम्हाला सांगतं आणि जीवनाचं मर्म समजावून देतं.

अध्यात्म हे तत्त्वज्ञान आहे; तर धर्म आहे कर्मकांड.

जगात आजवर किती तरी धर्म उदयाला आले. काहींचा प्रसार झाला; तर काही जन्माला आले, त्या भागापुरतेच मर्यादित राहिले. काही संपूनही गेले... कुठे कुठे एका धर्मातून नवे धर्म जन्माला आले. सगळ्यांनी अध्यात्मातूनच प्रेरणा घेतली होती. अध्यात्माच्या बळावर माणसानं आणि समाजानं कशी प्रगती करून घ्यावी, हेच दाखविण्यासाठी ते धर्म पुढे झाले. त्यांच्यावर काळाचा रंग

चढला. ते जिथे जन्मले, त्या प्रदेशांच्या सीमाही त्यांना पडल्या, तसा-तसा त्यांचा रंग बदलत गेला.

जोपर्यंत ते एकमेकांपासून दूर होते, तोपर्यंत त्यांचा कुणाला त्रास होत नव्हता. आजच्या जगानं त्यांना एकमेकांशेजारी आणून बसवलंय. आता काळाच्या आणि स्थळाच्या सीमाही त्यांना ओलांडाव्याच लागतील. त्यांना बदलावंच लागेल.

ते बदलणार नसतील, तर अध्यात्माला त्यांच्यापासून दूर राहावं लागेल.

। ७ ।

अनेकजण वर चढल्यानंतर खाली कोसळले आहेत.

ज्या घरात शिक्षणाचा गंध नव्हता, अशा घरात ते जन्मले, शिकले आणि शिकल्यावर इतरांपेक्षा आपण वेगळे आहोत, केवळ वेगळेच नाही; तर त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ आहोत, असं समजू लागले, तेव्हा ते कोसळले आहेत.

जे गरिबीत वाढले, कमवू लागले, श्रीमंत झाले आणि श्रीमंत झाल्यावर स्वतःला इतरांपेक्षा मोठे समजू लागले, तेव्हा ते खाली कोसळले आहेत.

माणूस जेव्हा स्वतःला वरचढ समजू लागतो, तेव्हाच तो खाली येतो.

तो वर कधी चढतो? तर, आपण शिकलो खरे; पण अजून शिकायचं खूप बाकी आहे, या जाणिवेनं जो आयुष्यभर शिकत राहतो, सदैव विद्यार्थी राहतो, तो वर चढतो. जेव्हा तो मोठ्या माणसांकडे पाहतो आणि यांच्या पायतळीच्या धुळीच्या कणाइतकीही माझी किंमत नाही, असं मनापासून मानू लागतो, तेव्हा तो श्रेष्ठपदी पोहोचतो. आपल्या स्वभावातल्या त्रुटी ओळखून त्या दूर करायचा प्रयत्न करतो, तेव्हा तो मोठा होतो.

मोठ्या माणसाला आपण मोठे आहोत, असं कधीच वाटत नाही. ज्या क्षणी त्याला तसं वाटतं, त्या क्षणी तो खाली कोसळतो.

। ८ ।

त्याची मतं अगदी वेगळी. वेगळी म्हणजे माझ्या मतांच्या नेमकी उलटी. आणि तो माझ्या शेजारी येऊन राहू लागला आहे.

आता मी काय करावं?

'शी:! असल्या माणसाचा शेजार नको', असं म्हणून दूर दुसरीकडे जाऊन राहायचं? तसं केलं, तर माझा मीच मला भित्रा वाटू लागेन. बरं, त्याला माझ्या

मताचा करण्यासाठी त्याच्याशी वाद घालीत बसायचं का? म्हणजे माझा मीच मला मूर्ख वाटू लागेन. चिडलो, तर दुबळा ठरेन.

माझ्यापुढे एकच मार्ग उरतो. त्याच्यापासून दूर जायचं नाही, त्याला आपल्या मताचा करण्यासाठी पुढे व्हायचं नाही; आणि त्याच्यावर चिडायचं तर मुळीच नाही. त्याच्या जवळच राहायचं. त्याला त्याच्या मताप्रमाणे वागू द्यायचं; मी माझ्या मतानुसार वागायचं. प्रत्येकाचा दृष्टिकोन वेगळा असू शकतो, वागायची तऱ्हा वेगळी असू शकते, असं मानून त्याला समजून घ्यायचा प्रयत्न करायचा.

हळूहळू एक दिवस त्यालाही कळेल की, आपल्यापेक्षा वेगळाही काही दृष्टिकोन असू शकतो. मग तोही माझ्याकडे उदार दृष्टीनं पाहू लागेल; मला समजून घेण्याचा प्रयत्न करील. आपल्यापेक्षा वेगळ्या मतांच्या माणसांबरोबरही समजुतीनं राहता येतं, हे आम्हा दोघांना कळू लागेल. आणि महत्त्वाचं म्हणजे, आपापलं मत मांडत असताना दोघांची भाषा सौम्य झालेली असेल.

। ९ ।

धोपट आणि बिकट असे दोन मार्ग समोर आले, तर माणूस धोपट मार्गच चोखाळतो. पण बिकट वाटेची निवड करणारेही काही जण या जगात भेटतात. नाही असं नाही. हे जग अजून तेवढं easygoing झालेलं नाही. बिकट वाटेनं जाणारा माणूस कणखर बनतो, तेजस्वी बनतो, हे अनेकांना माहीत असतं; आणि आपणही कणखर व्हावं, तेजस्वी व्हावं – अशी आकांक्षा अनेकांच्या मनी असते. तसं नसतं, तर माणूस एव्हरेस्टवर चढलाच नसता.

पण समजा, आपल्यासमोर दुसरेच दोन मार्ग उभे राहिले – एक यशाकडे जाणारा आणि दुसरा अपयशाकडे जाणारा. तर अपयशाच्या मार्गानं जाणं कोणी पसंत करेल का?

कणखर आणि तेजस्वी माणसांमध्येही असा कुणी सापडायचा नाही.

तेजस्वी लोकांचं जग हेदेखील यशामागे धावणाऱ्यांचंच जग आहे.

असं असूनही यशाला ठोकरून लावून पुढे जाणारे लोक या जगात होऊन गेले आहेत. काहींना तर आम्ही 'याचि डोळा याचि देही' पाहिलंही आहे. गांधी, लोहिया, जयप्रकाश हे लौकिकदृष्ट्या अपयशी ठरलेले लोक; पण अपयशामुळेच ते पुढे जाऊ शकले. जयप्रकाशजींनी एक कविता लिहिलीय,

जीवन विफलताओं से भरा है
सफलताएँ जब कभी आयीं निकट

दूर ठेला है उन्हें निज मार्ग से ।

तर आपण हा वेडेपणा केला की काय?

नहीं; सफलता और विफलता की
परिभाषाएँ हैं भिन्न मेरी,
मुझ क्रांतिशोधक के लिए
अन्य पथ ही मान्य थे...
जग जिसे कहता विफलता,
थीं शोध की वे मंजिलें
और मंजिलें तो अनगिनत हैं ।

आणि शेवटी ते म्हणतात–

रुकना नहीं मुझको कहीं
अवरुद्ध जितना मार्ग हो...

जयप्रकाशजींना कुठेच थांबायचं नव्हतं. आयुष्यभर ते पुढे आणि पुढे चालतच राहिले. त्यांची Quest त्यांना स्वस्थ बसूच देत नव्हती.

यशस्वी माणूस यश मिळालं, की थांबतो, संपतो, स्वत:ही पुढे जात नाही; आणि दुसऱ्यालाही जाऊ देत नाही. जो यशाला लाथाडून गेला, तोच पुढे गेला... सतत चालत राहिला... आणि त्याच्यामुळेच जग पुढे गेलं.

। १० ।

जपानमधल्या मुक्कामात मी एका मित्राला विचारलं, "इथे सर्वात जास्त प्रमाण कोणत्या रोगाचं आहे?"

"मेंदूच्या रोगाचं." तो उत्तरला, "जपानमधले ऐंशी टक्के लोक वेडे आहेत."

"कारण काय?"

"स्पीड." तो म्हणाला, "इथे कोणी चालत नाही; धावतात. इथे कोणी शांतपणे बोलत नाही; बडबडतात. एकटे असले, तरी मनातल्या मनात स्वत:शीच बडबडत राहतात."

मी म्हटलं, "ज्या देशात झेन बुद्धिझम् इतका बहरला, तिथे असं कसं झालं?"

"औद्योगीकरणामुळे. आम्ही अमेरिकेशी स्पर्धा करू लागलो. जे काम एक वर्षात व्हायचं, ते आम्हाला एका दिवसात व्हायला हवं असतं. यामुळे आमच्या जगण्याला वेग आला. मन एरवीसुद्धा वेगानं धावतं. त्या मनाला हे स्पीडचं

इंजिन लागलं, की ते एरवी धावतं, त्याच्या हजारपट वेगानं धावू लागतं; आणि मग एक क्षण असा येतो, की अतिताणामुळे ते मोडून पडतं...''

''यावर उपाय काय?''

''जीवनशैली – वे ऑफ लाइफ – बदलायला हवी.''

संध्याकाळी तो मला 'टी सेरेमनी'ला घेऊन गेला. जपानी भाषेत 'चा-नो-यू.' चहा पिण्याचा एक विधी.

सहा मजली बिल्डिंगच्या गच्चीवरची एक सुंदरशी झोपडी. भिंती पुठ्ठ्याच्या. जमीन तातामींची (चटयांची). वर कौलांऐवजी गवत. सगळं साधं आणि सुंदर.

दारात एक भांडं होतं. वाकडं-तिकडं; पण आर्टिस्टिक म्हणतात, तसलं. त्यातल्या पाण्यानं आम्ही हात-पाय धुतले आणि झोपडीत शिरलो. दोन किंवा तीन माणसांच्या वर आत कुणाला घेत नसतात. चा-नो-यूच्या या धर्मक्रियेत गर्दी नसावी, हा पहिला नियम.

आत एक 'चा-जीन' बसलेला. तो चहा करून देणारा. आम्हाला पाहून तो उठला. 'दो-झो' म्हणत, कंबरेत वाकून नमस्कार करत त्यानं आमचं स्वागत केलं. आम्हाला बसायची जागा दाखवली. मग त्यानं शेगडी पेटवली. त्यानंतर आतल्या खोलीत जाऊन तो चहाची भांडी घेऊन आला. ती त्यानं एका रुमालानं पुसली. किटलीत पाणी ओतलं. ती शेगडीवर ठेवली. तो जे काही करत होता, ते इतकं सावकाश, इतकं नजाकतीनं (ग्रेसफुली), की त्याच्या त्या हालचालींतून जणू जयजयवंतीचे सूर उलगडत चालले आहेत, असंच भासत होतं.

वातावरण शांत. इतकं शांत, की किटलीतलं पाणी उकळायला लागलं, तसा त्याचा आवाजही ऐकू येऊ लागला.

चहा तयार होताच त्यानं तितक्याच सावकाशीनं आमच्यापुढे चहा प्यायची भांडी आणून ठेवली आणि तितक्याच सावकाशीनं त्यानं त्यांत चहा ओतला. दोन घोटदेखील होणार नाहीत, इतकाच चहा त्या प्याल्यांत होता. तो मग आम्ही दीड तास पीत राहिलो. तोंडाला लावून एक-एक थेंब जिभेवर घेऊन चवी-चवीनं प्यायचा.

पहिली दहा मिनिटं मला कसंसंच वाटलं. गोंधळल्यासारखं झालं. मग धावणारं मन थांबलं. सगळं शांत, किण्ण झालं. किण्णपण ऐकू यावं, इतकं शांत झालं माझं मन. जणू अनंत काळ आपण असेच जगत आहोत, असं वाटू लागलं.

माणूस जगतो, तो एक तर भूतकाळाच्या कडू-गोड आठवणींवर; किंवा भविष्यकाळाची रंगीबेरंगी स्वप्नं रंगवीत. भूत आणि भविष्य हे दोन्ही काळ

मिथ्या. का, तर एक गेलेला; आणि दुसरा अजून आलेलाच नाही, असा. आपल्यासमोर असतो तो वर्तमान क्षण – तोच सत्य; तोच जगायचा.

पण आपण कुणीच वर्तमान क्षणात जगत नाही.

त्या दिवशी माझ्या मनातून भूत आणि भविष्य – दोन्ही काळ नाहीसे झाले. समोर उरला, तो फक्त वर्तमान क्षण. आणि हा वर्तमान क्षण अनंत काळाइतका विस्तृत झालेला.

त्या दिवशी मला *सुशेगाद'* म्हणजे काय, ते कळलं. त्याचं महत्त्व पटलं. 'इटर्नल नाउ'मध्ये जगायचं म्हणजे सुशेगाद जगायचं. वर्तमान क्षण चवीनं आणि उत्कटपणे जगण्याचा हा एक 'वे ऑफ लाइफ.'

थट्टेची बाब नाही ही!

। ११ ।

जैनांचं एक तत्त्वज्ञान आहे – 'स्यादवाद' नावाचं.

स्याद म्हणजे हिंदी भाषेतलं 'शायद'.

माणूस कोणत्या 'अँगल'मधून सत्याकडे पाहतो, ते पाहायचं. मगच त्याच्या सत्याचं स्वरूप आपल्या लक्षात येतं. समजा, एखाद्या पर्यटकानं कुणाला तरी विचारलं, ''प्रियोळ कुठेसं आहे?'' उत्तर देणारा जर पणजीचा असला, तर तो म्हणतो, ''पणजीच्या दक्षिणेला.'' आणि तो जर मडगावचा असला, तर म्हणतो, ''मडगावच्या उतरेला.''

स्वत: प्रियोळला जर विचारलं, ''तू कुठे आहेस?'' तर ते म्हणेल, ''मी जिथे आहे, तिथेच आहे. एक मात्र खरं, पणजी माझ्या उत्तरेला आहे आणि मडगाव दक्षिणेला.''

यातलं एकही उत्तर खोटं नाही. सगळीच खरी!

सत्याचंही असंच असतं. संपूर्ण सत्य कुणालाच उमगत नाही. माणूस कोणत्या भूमीवरून त्याकडे पाहतो, त्यावर सत्याचं स्वरूप अवलंबून असतं.

जगात नेहमीच वेगवेगळ्या विचारांची माणसं राहत आलेली आहेत. ती जेव्हा एकत्र येतील, तेव्हा त्यांनी एकमेकांशी कसं वागायचं, हा प्रश्न नेहमीच पडतो. आणि मग आपल्यापुढे एकच मार्ग खुला होतो – सगळ्यांनी एकमेकांकडे उदार नजरेनं पाहत, एकमेकांना समजून घेत, एकमेकांना सांभाळून घेत सहकार्यानं वागण्याचा.

। १२ ।

मोडकळीस आलेली देवळं नव्यानं बांधा, त्यांचा जीर्णोद्धार करा, तिथे पूजा-उत्सव सुरू करा, तुम्हाला लोकांची साथ मिळेल. लोक तुम्हाला मान देतील. विकलांग मुलांसाठी शाळा काढा, तिथे त्यांना शिकवा, त्यांना स्वावलंबी बनवा, लोक तुमच्यासाठी प्रशंसेच्या नजरेनं बघतील; तुम्हाला हवं ते काढून देतील. अनाथालय सुरू करा, वाऱ्यावर पडलेल्या लोकांना धीर आणि आधार द्या, इस्पितळं काढा, तिथे रुग्णांचं हगलं-मुतलं काढायचं काम करा, त्यांच्या पाठीवरून मायेचा हात फिरवा, लोक तुम्हाला देव मानतील.

समाजातले अन्याय दूर करण्याचा प्रयत्न करा, परंपरेनं चालत आलेल्या वाईट गोष्टी आणि कुप्रथा मोडून काढण्यासाठी पुढे व्हा, चुकीच्या मार्गानं जाणाऱ्याला त्याचा कान पकडून योग्य मार्गावर आणायचा प्रयत्न करा, लोकांना नवे विचार द्या, समाजात नवी मूल्यं रुजवू पहा, लोक तुम्हाला मानतीलच, असं सांगता येणार नाही. तुम्हाला साथ देतीलच, याची खात्री देता येणार नाही. तुम्हाला चांगलं म्हणणारा कदाचित कुणी मिळायचाही नाही. आजवर समाजाला बदलण्याचा प्रयत्न ज्यांनी कुणी केली, त्यांच्याविषयी समाजात नेहमीच चुकीचे समज पसरले. लोकांनी त्यांचा राग केला, रागानं त्यांनी त्यांची निंदा-नालस्ती केली आणि कधी-कधी तर त्यांना शत्रू ठरवून त्यांना अटीतटीनं विरोध केला. काहींना तर लोकांनी मारूनही टाकलं. सॉक्रेटिस, येशू खिस्त, गांधी हे अशा प्रकारचे सेवक होते. यांना शत्रू होते. ते यांच्या विरोधात बोलत असत. कधी-कधी यांच्यावर चिडून यांना मारण्यासाठी त्यांचे बाहू फुरफुरत असत.

या तिघांनाही त्यांनी मारून टाकलं.

तुम्ही समाज बदलायचा प्रयत्न करत असलात, तर तुमच्या विरोधात बोलणारे लोक समाजात असायलाच हवेत. नसतील, तर तुम्ही जे काही केलं, ते अगदी किरकोळ काम असलं पाहिजे; महत्त्व नसलेलं असं ते काम असलं पाहिजे. जीव ओतून पोटतिडिकीनं समाजाला बदलायचा प्रयत्न करा, तुम्हाला शत्रू असल्याचं तुम्हाला दिसून येईल. कुणीसं म्हटलंय, *'If you have none to oppose, small is the work you have done.'*

समाजाला बदलायचा प्रयत्न करणाऱ्याला झोपलेल्याच्या अंगावर थंड पाण्याची कळशी ओतून त्याला जागं करायचं काम करावं लागतं. कधी चिमटे काढावे लागतात, कधी टपल्या माराव्या लागतात; तर कधी चाबकानं लोकांच्या पाठीची सालटी सोलून काढावी लागतात. लोकांचं वाईटपणच

नव्हे; तर त्यांचा रागही ओढवून घ्यावा लागतो. कटू सत्य बोलून लोकांना दुखवावं लागतं. कवी म्हणतो,

If you have never turned the wrong to right,
You have been coward in 'the fight'.

लढाऊ समाजसेवक हा अजातशत्रू कधीच होऊ शकत नाही.

। १३ ।

आपल्याला काही महत्त्व नाही, हे ज्यांना ठाऊक आहे, ते आपल्याला महत्त्व मिळावं या आशेनं, मनात काही एक इच्छा बाळगून पुढे जाऊ पाहतात, तिला आपण 'महत्त्वाकांक्षा' असं म्हणतो. पण मनात महत्त्वाकांक्षा बाळगूनही महत्त्व नसलेल्यांना कधी महत्त्व मिळू शकलं आहे का? या जगात तसं ते कुठेच कुणाला मिळालेलं नाही. परिणामी, महत्त्वाकांक्षी लोकांकडे फक्त 'आकांक्षा'च उरते आणि ती त्यांना दिवसागणिक आपल्याबरोबर खाली खेचत नेते; त्यांना क्षुद्र करून सोडते.

विनोबा म्हणत, माणसानं 'नम्रताकांक्षी' व्हावं. *'नम्र झालां भूतां तेणें कोंडिला अनंता.'* जो नम्र होतो, तो अनंताला म्हणजे ईश्वरालासुद्धा मुठीत पकडू शकतो. अशा माणसाला मग महत्त्वाकांक्षा उरत नाही. तो महत्त्वाकांक्षेपलीकडे पोहोचतो.

आणि जग अशाच माणसाला महत्त्व देतं.

। १४ ।

बाहेर कुंप* घेऊन महार आला.

बाहेरूनच त्यानं विचारलं, ''बाय, कुंप हवेत?''

बाय स्वयंपाकघरात होती. तिथून डोकावत तिनं विचारलं, ''कसे दिले?''

''चार रुपयाला एक.'' महार म्हणाला.

''किती आहेत?''

''पाच.''

बायनं त्याला 'थांब' म्हटलं; आणि आतून वीस रुपये आणून त्याला दिले.

मी बाहेरच्या खोलीत बसून लिहीत होतो. तिथून हे संभाषण मी ऐकलं.

---

* कुंप - रोपट्याला गुराचं तोंड लागू नये म्हणून, त्याच्याभोवती बांबूचं छोटं संरक्षण-कुंपण बनवलं जातं.

काल बाजारात गेलो होतो, तिथे याच महाराला मी दोन-दोन रुपयांना कुंप विकताना पाहिलं होतं. दोन रुपयांचा कुंप हा चार रुपयांना विकतोय, हे पाहून मस्तकात तिडीक गेली. मी बायला विचारलं, ‘‘घेतलेस ते घेतलेस; पण घासाघीस न करताच का घेतलेस? हाच माणूस काल बाजारात दोन रुपयाला एक कुंप विकत होता.’’

त्यावर बाय शांतपणे म्हणाली, ‘‘बाजारात तो एक रुपयालासुद्धा विकत असेल. लोक घासाघीस करायला लागल्यावर बिचारा काय करील? त्याला हे एवढंच काम येतं आणि त्याच्याच जोरावर तो संसार चालवतो. त्याच्याशी कसली घासाघीस करायची? आपण एवढ्या मोठ्या घरात राहतो. इथे आपण सांगू, त्या भावानं कुंप विकत घेतले जातील, या आशेनं तो आला; आणि आता समाधानानं गेला. त्यानं त्याचं काम केलं; मी माझं केलं. या घराची शान राखायला हवी मला.’’

बायचं उत्तर ऐकून मी शरमलो. इतकं वाचून ‘स्वदेशी’चं जे मर्म समजलं नव्हतं, ते मला या लहानशा घटनेनं समजावून दिलं. गावातला एक माणूस आपल्या कर्तव्याला चुकला, की सारं गावही चुकतं...

बायको म्हणजे लक्ष्मी आहे माझ्या घरची!

। १५ ।

लोक आपल्याला ओळखत नाहीत, असं आपण म्हणतो, ते बरोबर नाही. ते चांगले ओळखून असतात आपल्याला. आपली नेमकी किंमत त्यांनी केलेली असते. आपल्यात नसलेलं मोठेपण आपण त्यांच्यावर लादू पाहतो, तेव्हा ते मुकाट्यानं मानून घेतात. आपल्याला नीट पारखून ते आपल्याला आपली खरी जागा दाखवून देतात. एक खरं, काहीजण आपल्याला दुरून बघतात आणि आपल्याविषयी काही तरी समज-अपसमज करून घेतात; पण हेही लोक आपल्याला एक दिवस नीट ओळखू लागतात.

लोक कुणावरही अन्याय करीत नाहीत.

खूप जवळचे असूनही दुस्वास करणाऱ्या लोकांची गोष्ट वेगळी! त्यांना सोडून द्यायचं. पण तेही आपल्याला चांगले ओळखून असतात. तोंडानं कबूल न का करीनात; पण त्यांच्या मनाच्या तळाशी आपलं स्थान निश्चित झालेलं असतं. म्हणूनच तर ते आपला दुस्वास करतात.

पण माझ्यापुढे कधी-कधी एक वेगळाच प्रश्न उभा राहतो.

मी अमुक एक असा माणूस आहे, अशी स्वत:ची एक प्रतिमा मी माझ्या मनात तयार करतो आणि ज्यांना मी माझे इष्ट मित्र, सखे-सोबती किंवा हितचिंतक मानतो, त्यांच्याही मनात माझ्या कृत्यांनी मी माझी एक प्रतिमा उभी करतो. त्यांच्या मनातली ही प्रतिमा माझ्याविषयीच्या माझ्या प्रतिमेपेक्षा काही-काही वेळा कमी दर्जाची असते. अशा वेळी मी स्वत:ची कोणती प्रतिमा खरी मानायची? माझ्या मनातली की त्यांच्या मनातली?

माझ्या अपरोक्ष लोक माझ्यासंबंधी बोलतात, ते कधी-कधी माझ्या कानांवर येतं, तेव्हा त्यातून त्यांच्या मनातल्या माझ्या प्रतिमेचा अंदाज मला येतो.

अशा वेळी तुम्हाला माझ्याविषयी असं वाटावंच का, अशी तक्रार करण्यात अर्थ नसतो. 'मरा तिकडे, तुम्ही मला नीट ओळखलेलंच नाही', असंही म्हणण्यात अर्थ नसतो. त्यांच्या मनात उभी राहिलेली प्रतिमाच माझी खरी प्रतिमा मानून मी अंतर्मुख व्हायला हवं.

मग हळूहळू माझ्या मनातल्या माझ्या प्रतिमेतली कृत्रिम अंगं आपसूक गळून पडतील आणि मी थोडा-थोडा बदलूही लागेन.

तेव्हा मग त्यांच्या मनातली माझी प्रतिमाही बदलेल.

## । १६ ।

समाज माणसाची कदर करीत नाही म्हणतात, ते खरं नाही.

मुंबईहून दिल्ली विमानानं दीड तासाचा प्रवास; पण आज विमान तीन तास उशिरा सुटलं. य. दि. फडक्यांनी लिहिलेलं र. धों. कर्व्यांचं चरित्र वाचायला मला साडेचार तास मिळाले. सुंदर लिहिलंय. माझी पत्रं त्यात आहेत, माझा उल्लेखही केलाय; पण पुस्तक मात्र मला राजाध्यक्षांकडून मागून घ्यावं लागलं. भेट म्हणून मिळालं नाही.

र. धों. कर्वे हे अण्णासाहेब कर्व्यांचे पुत्र. ध्येयानं झपाटलेले. त्यागी. त्याशिवाय रँग्लर परांजप्यांचे ते भाचे. बुद्धिवादी. परंपरेनं चालत आलेल्या गोष्टी त्यांनी मुकाटपणे कधीच स्वीकारल्या नाहीत. माझ्या बुद्धीला जे पटत नाही, ते मान्य करायला मी बांधलेला नाही, असं म्हणणारा धाडसी आणि मोठा माणूस.

ते बेधडक संतति-नियमनाचा प्रचार करायचे; म्हणून काही लोकांना ते मोठे वाटतात. या दृष्टीनं ते मोठे आहेतच; पण त्यांचं खरं मोठेपण आहे, ते त्यांनी कामस्वातंत्र्याचा पुरस्कार करण्याचं जे धाडस दाखवलं, त्यात. आजही असं धाडस दाखवणारा माणूस या देशात पाहायला मिळत नाही.

महाराष्ट्रात र. धों.ची उपेक्षा झाली, असं काहीजणांचं म्हणणं. त्यांची व्हायला हवी तेवढी कदर म्हणे कुठेच कुणी केली नाही. हे कितपत खरं मानायचं? र. धों.चं कार्यक्षेत्र केवढं? महाराष्ट्राला व्यापणारंही नाही. मुंबई, पुणे, नागपुरापुरतंच. तेवढंही नाही. या तीन शहरांतल्या शिक्षित जगाएवढंच. त्यांच्या 'समाज-स्वास्थ्या'ला तीनशे-चारशेच्या वर वर्गणीदार मिळाले असतील, असं वाटत नाही. एवढ्या लहानशा प्रांतात काम करणाऱ्या माणसाची मराठीत दोन चरित्रं प्रसिद्ध झाली आहेत. दोन्ही अतिशय आदरपूर्वक लिहिली गेली आहेत. कोणत्या तोंडानं म्हणायचं, समाज माणसाची कदर करीत नाही म्हणून? समाज कधीच कुणाची उपेक्षा करीत नाही. ज्याला जे मिळायला हवं, ते त्याला तो देतोच देतो. र. धों. कर्व्यांना मिळायला हवं, त्याहून अधिक समाजानं त्यांना दिलंय.

। १७ ।

*'भैया, कुछ दे दो।'* असं म्हणून तिनं आपला हात पुढे केला. तिच्या कडेवर एक पोर होतं. मी खिशात हात घातला. मोड नव्हती. होता एक अखखा रुपया. काढला आणि दिला.

माझ्याबरोबर एक मित्र होता. तो म्हणू लागला, "भिकाऱ्यांना असं भीक घालणं बरोबर नाही. भीक मागणं हा सध्या काही लोकांचा चांगला धंदाच होऊन बसलाय. त्यांना काम करायला लावलं पाहिजे."

माझ्याकडे उत्तर होतं. "समाजानं मला काही काम दिलं का?" म्हणून उत्तर जिभेवरही आलं होतं. पण म्हटलं, जाऊ दे, दुखावेल. आणि मी चालू लागलो.

मन काही वर्षं मागे धावू लागलं.

रेल्वेच्या तिसऱ्या वर्गाला अजून दुसऱ्या वर्गाचा दर्जा लाभलेला नव्हता; पण रिझर्व्हेशन्स् नुकतीच सुरू झाली होती. मी पश्चिम एक्स्प्रेसनं दिल्लीला चाललो होतो. वाटेत भर दुपारी गाडी एका स्टेशनवर थांबली. तिथे माझी 'थाळी' आली. आधीच 'ऑर्डर' दिलेली होती. जेवायला सुरुवात करणार, एवढ्यात आवाज कानावर पडला – "भैया, बच्चे को कुछ दो ।' एक बाई कडेवर एका शेंबड्या पोराला घेऊन भीक मागत होती.

"दळभद्री कुठची! नेमकी जेवायच्या वेळेवर आली." मी मनात म्हटलं. काळीज घट्ट करून तिला 'आगे जाव' म्हटलं आणि खिडकी लावून घेतली.

पण घास घशाखाली काही केल्या उतरेना. क्षणभर घुसमटलो. मनातल्या मनात मी स्वत:वरच खेकसलो. म्हटलं, असं करायला नको होतं. तिला असं

हाकलायला नको होतं. लगेच निर्णय घेतला. एका चपातीवर थोडीशी भाजी घातली. मला तेवढीच पुरेशी होती. उरलेलं सगळं तिला द्यायचं ठरवलं. खिडकी उघडली आणि तिला हाक मारली. इथेच कुठे तरी असेल, असं वाटलं होतं. प्लॅटफॉर्मवर उतरलो. कुठेच दिसली नाही.

स्वत:साठी वेगळी काढलेली भाजी आणि चपाती खायचा प्रयत्न केला; पण घशाखाली ती उतरेना. चपाती-भाजी ताटात परत ठेवून दिली आणि ताट झाकून बाकाखाली सरकवलं. गाडी सुटताना वेटर आला आणि थाळी आणि पैसे घेऊन गेला.

माझ्या शेजारी एक मुलगा बसला होता. इंटरव्ह्यूसाठी दिल्लीला चालला होता. त्याला वाचनाची आवड होती. आयन रँडची काही पुस्तकं घेऊन आला होता. त्याच्याशी बोलण्यात गुंतलो. दिवस मावळेपर्यंत आमच्या गप्पा चालल्या होत्या.

गाडी धावत होती. बरीच रात्र झाली होती. कुठच्या तरी स्टेशनावर गाडी थांबते. माझी थाळी आली आहे. मी जेवायला सुरुवात करणार, इतक्यात, "भैया, बच्चे का कुछ दो ।' – माझ्या कानांवर पुन्हा तोच आवाज येतो.

"अरेच्या! ही आपल्याबरोबरच प्रवास करतेय तर." मी आश्चर्यानं मनात म्हणतो. ती हात पुढे करते. मी बाकाखाली सारलेली थाळी शोधतो. थाळी मला मिळत नाही. अचानक तिच्या चेहऱ्याकडे माझं लक्ष जातं आणि मी कासावीस होतो. "तू? तुझी अशी गत व्हावी? भीक मागायचा प्रसंग यावा तुझ्यावर?" मी कळवळून तिला विचारतो आणि म्हणतो, "नाही, नाही, मी जिवंत असेपर्यंत तुझ्यावर भीक मागायची वेळ येऊ देणार नाही." माझ्या घशातून एक हुंदका फुटतो.

...आणि मला जाग येते.

मला स्वप्न पडलं होतं. स्वप्नात मी माझ्या आईला भीक मागताना पाहिलं होतं.

गाडी झुक झुक झुक झुक करीत धावत सुटली होती.

तेव्हापासून आता कोणत्याच भिकाऱ्याला 'आगे जाव' म्हणण्याचा धीर मला होत नाही. काही तरी काढून देतो, म्हणजे देतोच.

। १८ ।

आपल्या नीतिशास्त्रात नको नको त्या गोष्टी भरलेल्या आहेत. हेच पहा ना, माणसानं म्हणे सदा खरं तेच बोलावं. *'सत्यम् ब्रूयात्।'* त्याबद्दल दुमतच नाही. खरं तेच बोललं पाहिजे. खरं नाही, ते मुळीच बोलायचं नाही. पण त्याचबरोबर

*'प्रियम् ब्रूयात्।'* म्हणजे मग ब्रूयात् तरी काय? गोड तेच. गोड असेल, ते खरंच असेल, असं म्हणायचं असेल, तर त्यात खरेपणा कुठे आला? पण जाऊ दे, गोडही बोलूया. अहो, पण आपलं नीतिशास्त्र एवढ्यावर थांबत नाही. ते पुढे जाऊन म्हणतं – 'न ब्रूयात् सत्यम् अप्रियम् ।' कटू सत्य बोलू नये. कसली ही शिकवण? दांभिकपणा वाढवणारीच नव्हे काय? सत्य गोड असतंच, म्हणून कोण सांगतं? ते कटूही असू शकतं. नव्हे; बहुतांशी कटूच असतं. जीवनात वाईट, अमंगळ करायचं नाही, असं ठरवलं, तर कटू सत्य बोलायचं धैर्य व्हायलाच हवं. ऐकणाऱ्याला वाईट वाटेल, वाटू दे; तो दुखावेल, दुखावू दे; त्याला संताप येईल, येऊ दे; पण ते जर निर्मळ मनानं सांगितलेलं असेल, तर अंती त्याचा परिणाम चांगला व्हायलाच हवा.

काल आणखी एक 'नीती' वाचली.

'प्राप्य चलान अधिकारान / शत्रुषु मित्रेषु बंधुवर्गेषु / नाऽपकृतम् नोपकृतम् सत्कृतम् / किम् कृतम् तेन?'

सुभाषित जबरदस्त वाटलं. अर्थ काय होतो? 'तुझ्या हाती तूर्तास अधिकार आले आहेत. ते सर्वकाळ राहणार नाहीत. आज आहेत, उद्या नसतील. म्हणून काय करशील? तर जोपर्यंत तुझ्या हातात अधिकार आहेत, तोपर्यंत शत्रूचं करता येईल, तितकं नुकसान कर. मित्रांवर करता येतील, तितके उपकार कर आणि आप्त-स्वकीयांचं करता येईल, तेवढं कल्याण कर. तुला हे करता आलं नाही, तर तू हाती अधिकार घेऊन केलंस तरी काय?' *'किम् कृतम् तेन?'*

अर्थ कळताच कपाळावर हात मारून घेतला. म्हटलं, या प्रकारची शिकवण ज्या लोकांना मिळते, त्यांची प्रगती होणार तरी कशी? असला हीन प्रतीचा आदर्श ज्या देशाला मिळतो, तो देश भ्रष्टाचारापासून मुक्त होणार तरी कसा?

शी:! आपलं संपूर्ण पुरातन नीतिशास्त्र घासून-पुसून स्वच्छ करायला हवं.

। १९ ।

जास्तीत जास्त माणसं ज्या मार्गानं जातात, त्याच मार्गानं आपण जातो. का? हाच मार्ग योग्य होय, असं आपल्याला वाटलं म्हणून का? असं काही नसतं. जास्तीत जास्त माणसांच्या सोबतीनं राहिलो, की आपण सुरक्षित राहू, असं माणसांना वाटतं, म्हणून.

माणूस एकटे पडू, म्हणून घाबरतो.

माणूस परंपरेला धरून चालतो, तेही याच कारणानं; परंपरा त्याला योग्य

वाटते म्हणून नाही. बाकीचे लोकही परंपरेला धरून चालतात आणि त्यांच्या सोबतीनं राहिलं, की त्याला सुरक्षित वाटतं, म्हणून.

*महाजनो येन गतः स पंथः ।*

। २० ।

आपल्याला दुःखं नको असतात, तरी जीवनात दुःखं येतातच. बोलावल्याशिवाय येतात. दुःखानं माणूस आतून समृद्ध होत जातो...

सामान्यतः आपल्याला आपल्या शक्तीचा अंदाज नसतो. दुःखं आल्यावर, संकटं कोसळल्यावर जेव्हा आपण त्यांचा प्रतिकार करायला पुढे सरसावतो, तेव्हाच आपल्याला आपल्या शक्तीचा अंदाज येतो.

एक प्रकारचा हा नवा जन्मच असतो आपला. जन्माच्या वेळी त्रास हा व्हायलाच हवा.

पण आपल्यात किती शक्ती लपलेली होती, त्याची जाणीव होऊन आनंदही व्हायलाच हवा.

। २१ ।

इतकी वर्षं आपण हेच खरं, म्हणून मानत आलो होतो आणि आता ते खोटं असल्याचं कळलं. पण इतकी वर्षं जे मानीत आलो, ते आता सोडून तरी कसं द्यायचं? असा पेच अनेकांना पडतो.

परवा मी एकाला म्हटलं, ''गांधींच्या वाटेनं आपण चाललो असतो, तर वीस-पंचवीस वर्षांत देशातली गरीबी हटली असती. आपण ती वाट 'आउट ऑफ डेट' म्हणून सोडून दिली आणि स्वातंत्र्याला चाळीस वर्षं झाली, तरी आपण गरीबी हटवू शकलो नाही.''

तो म्हणू लागला, ''हे आपल्याला आता कळायला लागलं आहे. पण इतकी वर्षं या वाटेनं चालल्यावर आता ही वाट कशी सोडून द्यायची? आता याच वाटेनं पुढे जायचं.''

मी म्हटलं, ''म्हार्दोळचा माणूस पणजीला यायला बाहेर पडला आणि पोहोचला काणकोणला, तर काय समजायचं? तो वाट चुकला, असंच ना? वाट चुकल्यावर माणसाला आपण वाट चुकलो, हे कळायला पाहिजे, ते कळल्यावर, आपण वाट चुकलो, हे कबूल करण्याचं धैर्य असलं पाहिजे, इतकंच नव्हे; तर यापुढे मी या

वाटेनं कधी जाणार नाही, हा निर्णय घेण्याची हिंमत त्याच्यात असायला हवी. आपण एकटे पडू, ही भीती त्यानं मनातून काढून टाकायला हवी.''

अख्ख्या जगाला फसवता येतं; पण माणूस स्वत:लाच कसा काय फसवणार?

गुजराती भाषेत एक म्हण आहे – 'जाग्या त्यांथी सवार'। माणसाला जाग येते, त्या क्षणापासून त्याची सकाळ सुरू होते. चुकीची वाट कधीच योग्य वाट ठरत नाही. पणजीला जायला म्हणून बाहेर पडलेला माणूस काणकोणाला पोहोचला आणि त्याच वाटेनं तो पुढे जात राहिला, तर तो कारवारला पोहोचेल, मंगळूरला पोहोचेल, कोचीनला पोहोचेल, अगदी दक्षिण ध्रुवावर पोहोचेल; पण तो कधीही पणजीला पोहोचणार नाही. चुकीच्या वाटेनं माणूस कितीही पुढे गेला, तरी तो योग्य वाटेवर कधीही येणार नाही. चुकीची वाट ती चुकीची. याच वाटेनं तो पुढे गेला, तर त्याचं प्रत्येक पाऊल चुकीचंच पडत राहणार. खऱ्या मुक्कामापासून ते त्याला दूरच नेणार. 'आता काय करू? आता इतक्या दूर आल्यावर मागे कसा जाऊ?' असं समर्थन करण्यात माणूसपण नाही. चुकलं ते चुकलंच, असं मान्य करून ती वाट सोडूनच द्यायला हवी. चुकीच्या वाटेनं जायचं नाही, म्हणून त्यानं निर्धार करायला हवा. म्हणजे मग 'आता कसं होईल?' अशी चिंता त्याला वाटणार नाही. चिंता वाटेनाशी झाली, की मग मनातला सगळा गोंधळ, सगळा कोलाहल, सगळी चलबिचल एका क्षणात विरून जाईल आणि त्याची पावलं पडायला हवीत, त्याच दिशेनं पडू लागतील. उशीर नको; योग्य वाटेनंच जायचं.

## । २२ ।

आपल्याला हवं तसं जग कधी चालत नाही. तत्त्वत: आपण सगळे सारखे; पण एकाला वाटतं, तसं दुसऱ्याला वाटत नाही. प्रत्येकाची विचार करण्याची तऱ्हा वेगळी. प्रत्येकाच्या आवडी-निवडी वेगळ्या. प्रत्येकाची काम करण्याची पद्धत वेगळी. का, तर प्रत्येकाचे संस्कार वेगळे असतात. त्यामुळे दोन जिवाभावाच्या मित्रांमध्येदेखील मतभेद होतात, एवढंच नाही; तर त्यांच्यामध्ये कधी-कधी गैरसमजही निर्माण होतात.

आजच्या 'सभ्य' समाजात औचित्याविषयी काही गैरसमज पसरलेले आहेत. आपल्याला वाटतं, ते मोकळेपणानं सांगितलं, तर दुसरा दुखावेल, उगीच वाईटपणा कशाला घ्या; म्हणून आपण त्याला ते सांगत नाही. पण सांगतं नाही, तरी बोलत नाही, असं असतं का? नाही. बोलतो. तिसऱ्याकडे बोलतो. कधी-कधी खोटी नावं घेऊन लिहितोही. परिणामी, बोललेलं त्या माणसाच्या कानांवर

जातंच, कोणी लिहिलेलं आहे, तेही त्याला कळतं आणि मनं गढुळतात.

कुठे तरी एक नीतिवचन वाचलंय – ''आजचा तुमचा मित्र उद्या तुमचा शत्रू होऊ शकतो, हे विसरू नका. तसा आजचा तुमचा शत्रू उद्या तुमचा मित्र होऊ शकतो, हेही विसरू नका. आज जो मित्र आहे, तो उद्या शत्रू झाल्यावर तुमची वर्मं वेशीवर टांगील, ही भीती असते. म्हणून, तो मित्र असतानाही तुमची वर्मं त्याच्या नजरेला पडणार नाहीत, याची काळजी घ्या. त्याचप्रमाणे, आजचा तुमचा शत्रू उद्याचा तुमचा मित्र होऊ शकतो. तो मित्र झाल्यावर लाजेनं मान खाली घालायचा प्रसंग तुमच्यावर येऊ नये, म्हणून तो दुखावेल, असलं कोणतंही कृत्य हातून घडणार नाही, याची काळजी घ्या.'' असा या शिकवणुकीचा अर्थ आहे. वर वर पाहता ही शिकवण 'व्यवहारवादी' वाटेल; पण खोलात जाऊन विचार केला, तर या शिकवणुकीत किती तरी उदात्त अर्थ भरलेला दिसेल.

कुणाच्याही वर्मावर घाव घालण्याचं कृत्य आपल्या हातून घडू देऊ नये.

अवगुण कोणात नसतात? आपल्यातल्या चांगल्यात चांगल्या माणसातही किती तरी अवगुण असतील आणि वाइटातल्या वाईट माणसात किंवा दुष्टातल्या दुष्ट माणसातही किती तरी गुण आढळतील. गुण-अवगुणांच्या आडव्या-उभ्या धाग्यांनीच आपलं जीवन विणलेलं दिसून येईल.

आपले अवगुण बाहेर दिसू नयेत, याची काळजी माणूस सतत घेत असतो. प्रत्येकाच्या मनात ही इच्छा असते. म्हणून संस्कारशील माणसानं दुसऱ्याचे अवगुण जाहीर करायचा प्रयत्न कधी करू नये. निदान त्याच्या अपरोक्ष तरी त्याच्या वर्मावर घाव घालू नये. एखाद्याच्या अपरोक्ष त्याची निंदा करणाऱ्या माणसाला गीतेत 'पिशुन' असं म्हटलंय. 'पिशुन' म्हणजे चहाडखोर. आणि चहाडखोराला आपण नेहमीच कमी लेखत आलो आहोत.

याचा अर्थ – कुणीच कुणावर टीका करायची नाही, असा नाही. टीका करावी. त्याच्या तोंडावर करावी, त्याच्या नावानं करावी; पण त्याच्या अपरोक्ष नाही करायची आणि खोटी नावं घेऊन तर नाहीच नाही करायची. एका ध्येयासाठी काम करताना कमीत कमी एवढा तरी संस्कार अंगी असायला हवा. नाही तर ध्येय मागे पडेल आणि आयुष्यभराची तपश्चर्या आणि सेवा मातीमोल होऊन जाईल.

। २३ ।

१५ ऑगस्ट १९४७च्या आधीच्या पन्नास वर्षांची आणि नंतरच्या पन्नास वर्षांची परिस्थिती निरखून बघावी. केवढा मोठा फरक पडलाय! आधी देश

गुलाम होता; आता स्वतंत्र झालाय. आधी देशात ५६५ संस्थानं होती; आता ती सारी विलीन होऊन सारा देश एक झालाय. आधी देशात लोकशाही नव्हती; आता देशात लोकशाही आहे. आधी आपल्याला हवं ते करता येत नसे; आता हवं ते करता येतं. आंतरराष्ट्रीय राजकारणात आधी आपल्याला कुणी विचारीत नव्हतं; आज आम्ही एक शक्ती म्हणून उभे राहू शकलो आहोत.

आधी आपल्याला बाहेरून अन्नधान्य आयात करावं लागायचं; आता आपली लोकसंख्या दुपटीनं वाढली असूनही अन्नधान्याच्या बाबतीत आपण स्वावलंबी झालो आहोत. आधी देशात मोठे उद्योगधंदे नव्हते; आता औद्योगीकरणाच्या क्षेत्रात आपला देश जगातल्या पहिल्या आठ देशांमध्ये गणला जातो आहे. आधी आपल्याला तंत्रज्ञ बाहेरून आणावे लागत; आज आपले तंत्रज्ञ आपण बाहेर पाठवू लागलो आहोत. पूर्वी बालमृत्यूचं प्रमाण खूप असे; आता ते खूपच कमी झालंय. पूर्वी देवी, कॉलरा, प्लेगनं माणसं मरत; आता या रोगांचं समूळ उच्चाटन झालंय.

पण पूर्वी किती तरी उत्तुंग व्यक्तिमत्त्वाचे पुढारी या देशानं जन्माला घातले होते; आज अगदी खुजे पुढारी आपल्या वाट्याला आले आहेत. पूर्वी त्यागाला, चारित्र्याला किंमत होती; आज सत्तेला, स्वार्थाला आणि पैशाला किंमत आली आहे.

आणि सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे–

पूर्वी भोवताली काळोख पसरलेला असे; पण हृदयांत प्रकाश पाहायला मिळत असे. आज बाहेर सर्वत्र प्रकाश पसरलेला दिसतोय; पण आत मात्र काळोख दाटला आहे.

## । २४ ।

आश्रम भजनावलीत एक भजन आहे – 'उठ जाग मुसाफिर भोर भई, अब रैन कहाँ, जो सोबत है।' या ओळीनं सुरू होणाऱ्या या भजनात एक कडवं येतं – 'जो कल करे सो आज कर, आज करे सो अब ।' जे उद्या करायचं ठरवलं असेल, ते आजच करून टाक. तसंच, आज करायचं आहे, ते आत्ताच करून टाक. उद्याचं कुणी पाहिलंय? खरं सांगायचं, तर समजायला लागल्यावर माणसानं उद्याची कामं आज आणि आजची कामं आत्ताच करायची सवय लावून घेतली पाहिजे. पण तरुणपणी हे माहीत असूनही मला ते जमलं नव्हतं. माझ्यापुढे काळाचा केवढा तरी विशाल पट पसरलेला होता. नजरेच्या टप्प्यात कुठे त्याचा अंत दिसत नव्हता. आजचं काम उद्यावर ढकलायला मला काहीच वाटायचं

नाही. चाळिशी संपेपर्यंत हे असंच चालू राहिलं. पन्नाशी संपता-संपता काय काय करायचं राहिलंय, त्याचा हिशेब करायला लागलो आणि पुढच्या पंधरा-वीस वर्षांत जे करायचं योजलं होतं, त्याची आखणी केली. ज्या कामांमुळे वेळ वाया जातो, अशी सगळी कामं सोडून दिली. त्यांतून अंग काढून घेतलं. मनही काढून घेतलं. साठी संपता-संपता पाहिलं – योजली होती, त्यातली अर्धी कामंसुद्धा झालेली नाहीत. साठीनंतर वर्षं वेगानं धावू लागली. यापूर्वी वर्षं इतक्या वेगानं कधी पळताना जाणवली नव्हती. माझं जगही आता 'छोटं' झालंय. किती तरी सखे-सोबती जग सोडून गेलेले बघतोय. आता माझ्याच्यानं आजचं काम उद्यावर ढकलवेना. उद्याचं काम आज आणि आजचं काम आत्ता कर, म्हणून मला कुणी सांगायची आता गरज राहिली नाही.

त्यामुळे मला आता दुसऱ्या कशाला वेळच मिळेनासा झालाय...

। २५ ।

वाचायचं किती तरी राहिलंय, फिरायचं किती तरी राहिलंय? कधी होणार हे सगळं? एक आयुष्य पुरणार नाही.

वाचायचं, फिरायचं, पाहायचं, ते सारं तरुणपणीच करून घ्यायला हवं. चाळिशीच्या आधीच. त्यानंतर ते होत नाही. बुद्धाचं 'अनागत भयानि' नावाचं एक सुत्त (सूत्र) आहे. तो म्हणतो, ''आज तू तरुण आहेस; म्हणून सदैव तरुणच राहशील, या भ्रमात राहू नकोस. एक दिवस तू म्हातारा होशील. तुला व्हायचं नसलं, तरी होशील. म्हणून काय कर? तर जे समजत नाही, ते समजून घेण्याचा आणि जे मिळत नाही, ते मिळवण्याचा तरुणपणीच प्रयत्न कर. तरच, उद्या वार्धक्य येईल तेव्हा, 'अरेरे, मिळवायचं होतं ते मिळवताच आलं नाही', असा पश्चात्ताप तुला करावा लागणार नाही. आज जे मिळवलंस, ते त्या वेळीही तुला उपयोगी पडेल.''

बुद्धानं या सुत्तात पाच *'अनागत भयं'* सांगितली आहेत. *'अनागत'* म्हणजे जे अजून आलेलं नाही; पण यायचं आहे, ते. पहिलं भय वार्धक्याचं, दुसरं अंथरुणाला खिळण्याचं, तिसरं आकस्मिक संकटांचं, चौथं मृत्यूचं आणि पाचवं... विसरलो. इतकं लक्षात राहिलं की, जे वाचायचं, पाहायचं, मिळवायचं, समजून घ्यायचं, ते सारं माणसानं तरुणपणीच केलं, तर म्हातारपणी, अंथरुणाला खिळल्यावर, संकटात पडल्यावर, कोणत्याही परिस्थितीत उपयोगी पडतं. नाही तर मग विपरीत परिस्थितीत त्याच्यावर पश्चात्ताप करायचा प्रसंग येतो.

तात्पर्य, 'जो कल करे सो आज कर, आज करे सो अब।' 'जब चिड़ियन खेती चुग डाली, फिर पछताये क्या होवत है?'

जीवन ही एक साधना आहे – जागरूक राहून आयुष्यभर करायची.

। २६ ।

प्रेमचंदांचं 'गोदान' वाचायला घेतलं. वाचता-वाचता होरी आणि धनियाच्या जगण्याशी एकरूप होऊन गेलो. त्यांची दु:खं माझी दु:खं झाली. पाच-सात दिवसांनी पुस्तक वाचून संपलं, तेव्हा हमसून-हमसून रडलो. शरदबाबूंची *'विप्रदास'* ही कादंबरी वाचली, तेव्हाही असंच झालं होतं. खूप रडू आलं होतं.

माझ्यात असा कोणता बदल झाला; म्हणून मला रडू आलं? मी 'माझ्या'तून बाहेर पडलो. 'माझ्या'तून बाहेर पडून मी दुसऱ्याच्या दु:खांशी एकरूप, एकजीव झालो. मी मी राहिलो नव्हतो. माझ्या व्यक्तिमत्त्वाचा विस्तार झाला होता.

व्यक्तिमत्त्वाच्या या विस्ताराला गीतेनं नाव दिलंय – अध्यात्म. आणि माणसानं या अध्यात्माची कास धरावी, असं सांगितलंय.

संस्कारितेची हीच मेख होय.

। २७ ।

वैचारिक लेखन दोन प्रकारचं असतं.

एक, जे विचार करायला लावतं, अनेक प्रश्न आपल्यासमोर उभे करतं, आणि त्यांची उत्तरं शोधून काढ, म्हणून सांगतं, ते.

दुसरं, जे विचार करायला तर लावतंच; शिवाय झोपेतून आपल्याला जागं करतं, जागं करून उभं करतं आणि काही ना काही 'कराय'ची प्रेरणा देतं, ते.

दोन्ही गुण एका ठिकाणी असलेलं लेखन करता आलं पाहिजे. पण त्यासाठी लेखक केवळ विचारवंत असून चालत नाही; कृतिशीलही असावा लागतो.

। २८ ।

त्यानं मला तुकाराम वाचायला सांगितला. मी म्हटलं, ''तुकारामाला लिहिताच येत नाही. त्याची भाषा ओबडधोबड. आज शाळेतल्या मुलांनी या प्रकारच्या भाषेत लिहिलं, तर एकही मुलगा परीक्षेत पास होणार नाही.'' तो म्हणू लागला,

"त्याच्या भाषेकडे कशाला बघतोस? त्याच्या विचारांकडे बघ. फार मोठा माणूस होता तो." मी गप्प बसलो.

काही दिवसांनी त्यानं मला आणखी एक पुस्तक आणून दिलं. सुरेखच होतं. मी म्हटलं, "फार सुंदर! इतकं सुंदर सहसा कुणाला लिहिता येणार नाही. पण या लेखकाला मी ओळखतो. हा खोटारडा माणूस आहे. दारातसुद्धा उभं करण्याच्या लायकीचा नाही हा."

तो म्हणू लागला, "त्याच्याकडे कशाला बघतोय? त्यानं लिहिलेल्या पुस्तकाकडे बघ." याही खेपेस मी गप्प बसलो.

। २९ ।

अलीकडे मला एका पुस्तकानं वेड लावलंय – 'पंचतंत्रा'नं.

लहान मुलांसाठी लिहिलेलं पुस्तक, अशी मनावर त्याची छाप पडलेली होती. चाळीस-पंचेचाळीस वर्षांपूर्वी वाचलं होतं. आता उतारवयात पुन्हा हातात घेतलं आणि कळलं, हे केवळ लहान मुलांसाठी लिहिलेलं पुस्तक नाही. लिहायला मुलं निमित्त झाली, एवढंच. पण विष्णुशर्मानं ते मोठ्यांसाठीच लिहिलं आहे.

यात नीतिशास्त्र आहे, राज्यशास्त्र आहे, अर्थशास्त्रही आहे.

सामान्य माणसाला (बहुजनसमाजाला) शहाणं करून सोडायचं, हाच उद्देश डोळ्यांसमोर ठेवून विष्णुशर्मानं हे लिहिलं असावं. अमरशक्ती राजाचे तीन पुत्र – बहुशक्ती, उग्रशक्ती आणि अनंतशक्ती. ही बहुजनसमाजाचीच दुसरी नावं.

पंचतंत्रानं आपल्या बहुजनसमाजाला घडवलं. आपल्या निरक्षर बहुजन-समाजातल्या काही लोकांमध्ये जे व्यावहारिक शहाणपण पाहायला मिळतं, ते पंचतंत्रानंच त्यांना दिलं आहे.

'पंचतंत्र' हे सर्वांत पुरातन पुस्तकांपैकी एक, पुरातन काळात लिहिलं गेलेलं; पण आजही चालत आलेलं आहे, हे महत्त्वाचं. आजही ते तितकंच नवं आणि ताजं राहिलंय, हे महत्त्वाचं.

सर विल्यम जोन्स यानं भारतातल्या तीन मौलिक – ओरिजनल – गोष्टींचा उल्लेख केला आहे. त्यांत बुद्धिबळ, गणितातली दशमान पद्धती यांच्याबरोबर वाघा-कोल्ह्यांच्या, कुत्र्या-मांजरांच्या, कावळ्या-बगळ्यांच्या कहाण्या सांगून समाजाला शहाणं करणाऱ्या पंचतंत्राचाही समावेश केला आहे.

जगातल्या पन्नास भाषांतून पंचतंत्राचे दोनशेच्या वर अनुवाद सापडतात.

एक बायबल सोडलं, तर इतकी भाषांतरं झालेलं दुसरं कोणतंच पुस्तक जागतिक साहित्यात पाहायला मिळायचं नाही.

कोकणीत हे पुस्तक केवळ लहानांसाठीच नाही; तर मोठ्यांसाठीही त्यातल्या नीतिशास्त्र-अर्थशास्त्रासहित आपण केव्हा आणणार? अकादमीनं अनुदान दिल्यावरच? बाकीच्या भाषांत त्या त्या लेखकांनी ते स्वत:च्या प्रेरणेनं आणलं. आपल्या कोकणीत अजून असा लेखक जन्माला यायचाच आहे.

। ३० ।

एक वाक्य दोनदा वाचूनही नीट समजलं नाही, तर समजायचं, या लेखकाला नीट लिहिता येत नाही. विषय कितीही कठीण असो, तो सोपा करून लिहिता यायलाच हवा. शॉपेनहॉवर, बर्ट्रांड रसेल हे कठिणात कठीण विषय किती सोप्या पद्धतीनं समजावून सांगायचे! आणि ते फक्त सामान्य लोकांकरिताच लिहीत होते, असं नाही; तर आपल्या दर्जाच्या लोकांसाठीही लिहायचे.

समजणार नाही, असं लेखन काव्यात चालतं. आणि साहित्यक्षेत्रात सर्वांत जास्त 'बुवाबाजी' काव्यातच चालली आहे. गद्यात शैली साधी, सोपी, सरळ आणि प्रांजळ असायची हवी. मनोहरराय सरदेसाई म्हणतात, त्याप्रमाणे – 'सूर्यप्रकाशासारखी, जिच्यात इंद्रधनुष्याचे सातही रंग आहेत; पण एकही स्पष्टपणे दृष्टीस पडत नाही, अशी.' बल्कांवांवर (घराच्या ओटीवर) तिठ्यावर, बस स्टँडवर वा जेवतानाच्या गप्पांमध्ये जशा भाषेत आपण एकमेकांशी बोलतो, तशाच भाषेत आपल्याला महाभारत सांगता यायला हवं, गीता सांगता यायला हवी, शॉपेनहॉवर समजावून सांगता यायला हवा.

अशी भाषा लिहिणं, हे सोपं काम नाही. फार कठीण काम आहे हे. त्यासाठी बरीच साधना करावी लागते. स्थेंदालनं 'द स्कार्लेट अँड द ब्लॅक' हे पुस्तक 'द रूझ इन न्वार' चा आदर्श डोळ्यांपुढे ठेवून लिहिला. कुणीसं त्याच्या शैलीचं वर्णन केलं आहे : No fine phrases, no heroics, no broad sweeps of imaginative writing, but a story told in the language men use in talking to each other by fireside.

अशा प्रकारच्या शैलीत लिहिता यावं, असं आंद्रे जीदला किती वाटायचं!

टॉलस्टॉय हाही असाच सोप्या, साध्या, सरळ आणि प्रांजळ शैलीत लिहिणारा एक लेखक. अलीकडेच त्याच्या 'हाजी मुराद', 'डेथ ऑफ इवान इलीच', 'द डेव्हिल' या कादंबऱ्या वाचायला मिळाल्या – 'एक होता कोल्हा आणि एक होती

कोल्ही.' अशा शैलीत लिहिलेल्या. पण त्या वाचकाला किती खोलवर घेऊन जातात! 'The kingdom of God is Within You' आणि 'What Then We Must Do' अशी गंभीर (आणि गंभीरच नव्हे; तर झोप उडवणारी) पुस्तकंही त्यानं याच साध्या, सोप्या, सरळ आणि प्रांजळ शैलीत लिहिली आहेत.

इतकं सोपं त्याला कसं लिहिता आलं?

याचं एकच उत्तर आहे – लिहिण्यापूर्वी त्यानं त्या विषयावर खूप चिंतन केलं होतं, खोलात जाऊन सर्व अंगांनी विचार केला होता आणि विषय डोक्यात स्पष्ट झाल्यानंतरच लिहायला घेतलं होतं. एवढ्यानंही त्याची साधना संपली नव्हती. 'मला जे समजलंय, ते इतरांना सांगितल्यावर त्यांना ते समजलंच पाहिजे', या तळमळीनं त्यानं लिहिलं.

लिहायला बसण्यापूर्वी तीन गोष्टी डोक्यात स्पष्ट झालेल्या असायला हव्यात. आपण काय लिहायला बसलो आहोत, कोणासाठी लिहायला बसलो आहोत आणि कशासाठी लिहायला बसलो आहोत? तरच माणूस सोपं, साधं, सरळ आणि प्रांजळ शैलीत लिहू शकेल.

बरेच लोक लिहितानाच विचार करतात आणि तेव्हा जे काही सुचतं, तेच लिहितात... असलं लिखाण दोन-दोनदा वाचूनही नीट समजणार नाही.

। ३१ ।

लिहायचं तर म्हणे स्फूर्ती यावी लागते. खरं आहे हे.

पण स्फूर्तीचं एक गणित आहे. ती आपसूक येत नसते. तुम्ही काम करत रहा, ती येते. ती येईल, मग मी काम करीन; म्हणून बसून राहाल, तर तीही तुम्ही कामाला सुरुवात करण्याची वाट पाहत बसून राहील. अलीकडेच आणखी एक गणित लक्षात आलंय. कोणतंही काम हाती घेण्यापूर्वी ते घ्यायचं की नाही, याचा विचार करावा.

एकदा ते हातात घ्यायचा आणि तडीस न्यायचा निश्चय झाला, की ते कामच स्वत:च्या हातात घेतं. तुम्हाला ते स्वस्थ बसू देत नाही आणि तुम्हाला कामाला लावतं.

। ३२ ।

लिहीत राहिलं, की माणसाला लिहायची सवय होते; आणि एकदा का

एखादी सवय जडली, की ती हाता-पायांतल्या बेड्यांप्रमाणे होऊन जाते.

आमच्या एका नातेवाइकाला सवय जडली होती, सकाळी नऊ वाजता सूट घालून ऑफिसात जाण्याची. तीन वर्षं त्यांनी 'सर्व्हिस' केली, नंतर ते 'रिटायर' झाले; तरी सूट घालायची ही सवय काही सुटली नाही. सकाळी नऊ वाजले, की आंघोळ करताच ते सूट चढवायचे, घरातल्या घरात फेऱ्या मारायचे. अर्ध्या-पाऊण तासानं सूट उतरवून धोतर नेसायचे.

पावलोव्हच्या 'कंडिशण्ड् रिफ्लेक्स'चंच ते एक उदाहरण आहे.

लेखकाचंही तसंच असतं. त्याला एकदा लिहायची सवय जडली, की बरोबर लिहायच्या वेळेला तो लिहायला बसणार. सांगण्यासारखं त्याच्याकडे काही असो वा नसो, लिहिल्याशिवाय त्याच्याच्यानं राहवणारच नाही. तो काही तरी लिहिणार आणि तो 'सिद्धहस्त' की काय असल्यामुळे, अनुभवी असल्यामुळे, तो जे काही लिहील, ते प्रसिद्ध करण्यायोग्य ठरणार आणि ते छापायला पाठवलं, की छापून येणार.

लेखकानं नेमकं इथेच सावध राहायला हवं. लिहिणं हे त्यानं आपलं 'कर्तव्य' होऊ देऊ नये. तसंच, ते आपलं 'व्यसन'ही होऊ देऊ नये.

एक बरं आहे. कितीही लिहिलं, म्हणजे ते लोक वाचतीलच, असं नाही. आपल्या पश्चात आपल्या लेखनापैकी किती टिकून राहणार आणि किती विस्मृतीत जाणार, हे सांगता येणार नाही. व्हॉल्तेअरनं जे जीव ओतून लिहिलं, ते सारं मोठमोठ्या कपाटांतून धूळ खात पडलं आणि जे हलकं-फुलकं – 'कांदीद' -सारखं – सहज म्हणून लिहिलं – ते कायम नवं ताजं राहिलं, असं मनोहरराय सरदेसाई म्हणायचे. म्हणून म्हणतो, आपण जे लिहितो, त्यातलं किती टिकून राहणार, हे देवालाच ठाऊक. ते देवावर वा काळावर सोडायचं आणि लिहायचं, ते स्वत:ला व्यस्त करण्यासाठी लिहायचं. त्यातच समाधान मानायचं, मग ते कोणी वाचो अथवा न वाचो. लिहायला हवं म्हणून लिहायचं, असा प्रसंग मात्र येऊ द्यायचा नाही.

कधी थांबायचं, हे प्रत्येकानं स्वत:ला विचारूनच ठरवायचं. जोपर्यंत 'The best is yet to come' असं आतून वाटतंय, तोवर लिहीत राहायचं. पण ज्या दिवशी, काय लिहावं हे कळेनासं होईल, काही सुचत नाही असं वाटेल, त्या दिवशी आणि त्याच क्षणी निर्णय घ्यायचा, मी आता संपलो. आता काही लिहिणार नाही.

। ३३ ।

रवींद्रनाथांनी शांतिनिकेतन उभं करण्याच्या प्रयत्नात उभं आयुष्य वेचलं. आज शांतिनिकेनात काय उरलंय? रवींद्रनाथांनी एवढं एकच काम केलं असतं,

तर शांतिनिकेतनबरोबर तेही संपून गेले असते. पण ते जिवंत आहेत त्यांच्या साहित्याच्या रूपानं. जगाच्या पाठीवर जोपर्यंत बंगाली भाषा आहे, तोपर्यंत रवींद्रनाथ असणार आहेत.

पाश्चात्य म्हणतात, 'निनेव्हसारख्या शहराचे अवशेषही आज उरलेले नाहीत...'

उरतात फक्त विचार, संस्कार, प्रेरणा.

। ३४ ।

आपण लिहितो, ते आपल्या हयातीतच प्रसिद्ध व्हावं, असं आपल्याला का वाटावं?

काफ्काची सगळी पुस्तकं तो गेल्यानंतरच प्रसिद्ध झाली आहेत. फर्नान्दो पेस्सोआची पुस्तकंही त्याच्या मृत्यूनंतरच प्रसिद्ध झाली आहेत. आपण लिहितो, ते काळाच्या कसोटीवर उतरेल, ही श्रद्धा मनात बाळगून लेखकानं लिहीत राहावं.

कधी तरी पुस्तक प्रकाशित होईल.

। ३५ ।

माझी आई तिच्या काळातल्या चार-चौघी स्त्रियांसारखीच एक होती. 'शिवलीलामृत' आणि 'भागवत' सोडून तिनं काही वाचलं नव्हतं. माझं शिक्षणात फार लक्ष नाही, हे पाहून तिला वाईट वाटायचं आणि ती मला म्हणायची, "बाळा, शीक रे! शिकल्याशिवाय तू माणूस होणार नाहीस."

शिकायचं, ते 'माणूस' बनण्यासाठी, हे तिला शिक्षणशास्त्राचं एकही पुस्तक न वाचता कळलं होतं.

आश्चर्य वाटतं, तिला जे समजलं, ते मोठमोठ्या शिक्षणतज्ज्ञांना कसं समजत नाही? शिक्षण म्हटलं, की ते मुलांना कोणत्या भाषेतून शिकवावं, कोकणीतून, मराठीतून की थेट इंग्रजीतून... किती भाषा शिकवाव्यात, कोणत्या क्रमानं शिकवाव्यात... इतिहास-भूगोल किती आणि कसा शिकवावा... विज्ञानातला कोणता भाग शिकवावा... गणित कुठपर्यंत शिकवावं... असल्याच प्रश्नांची चर्चा करत बसतात.

शिकायला आलेला मुलगा 'माणूस' कसा होईल, हा विषय महत्त्वाचा असायला हवा होता, यावर कधी चर्चा करता का तुम्ही?

अडचणी कितीही येवोत, धीर खचू देऊ नये. कितीही संकटं कोसळू दे, त्यांनी बावचळून जाऊ नये. काम कितीही कठीण असो, आपल्याच्यानं ते होणार नाही, असं म्हणून मागे हटू नये. आत्मविश्वास हरवून जाऊ देऊ नये. दुसरा कितीही हुशार असला, तरी त्याचा मत्सर करू नये. कितीही लाभ होवो (वा कितीही नुकसान होवो), सत्य सोडू नये. आपल्या हातानं काम करायची लाज वाटू देऊ नये. हे आणि असं सगळं मुलांच्या अंगी कसं बाणता येईल, याची चर्चा तुम्ही कधी करणारच नाही का?

खरं तर सगळ्यात अधिक चिंतन याच विषयावर व्हायला हवं. मुलं संस्कारी कशी होतील, त्यांची जिज्ञासा सतत जागी कशी राहील, कोणतीही कामं ती काटेकोरपणे कशी करतील, या गोष्टींना जे महत्त्व आहे, ते इतिहास-भूगोल-गणिताच्या ज्ञानाला आहे का?

जिज्ञासा जागी असेल, तर या कशाला; कुठल्याही विषयाचं ज्ञान माणूस आयुष्यभर मिळवत राहील. अनुभवातून शिकेल, प्रयोगांतून शिकेल, जाणकारांच्या पायाशी बसून शिकेल, पुस्तकं वाचून शिकेल.

जे विषय आयुष्यभर शिकायचे, ते बालपणातच शिकवून संपवायचे असतात होय? बालपणी मिळायला हवेत ते माणूसपणाचे संस्कार; पण ते देणारा शिक्षकही तेवढाच संस्कारी असायला हवा.

शाळेत सगळ्यात महत्त्वाचा विषय असायला हवा तो Character Formationचा, व्यक्तिमत्त्व-विकासाचा, चारित्र्य-निर्मितीचा; त्याची उपेक्षा करून गणित-इतिहास-भूगोल शिकवायचा का?

। ३६ ।

स्वातंत्र्य मिळाल्यापासून आपण देशाला श्रीमंत किंवा समृद्ध करण्याच्या दिशेनं प्रयत्न करत आलो आहोत. पण एवढ्यानं भागतं होय?

एक गोष्ट विसरता येणार नाही. आपण गुलाम झालो, त्या वेळी हा देश दरिद्री नव्हता. जगातल्या समृद्ध देशांपैकी एक होता. इथे तयार होणारा माल आपण साऱ्या जगभरात विकत असू. आपण समृद्ध होतो; म्हणून तर इंग्रज इथे आले. गरीब देशात ते कशाला आले असते?

मग प्रश्न उपस्थित होतो, तो असा की, आपण समृद्ध असूनही गुलाम कसे झालो? काय म्हणून आपण आपलं स्वातंत्र्य गमावलं? उत्तर एकच – आपल्याला स्वातंत्र्याचं महत्त्व समजलं नाही. स्वातंत्र्याचं रक्षण कसं करायचं, हे

आपल्याला माहीत नव्हतं. आपण एकमेकांशी भांडत होतो, एकमेकांना नाडत होतो, एकमेकांना लुटत होतो; आणि एकमेकांना श्रेष्ठ-कनिष्ठ वा कमी लेखून एकमेकांपासून दूर राहत होतो.

आपल्याला राष्ट्रीय चारित्र्य नव्हतं.

इंग्रजांनी सर्वांत प्रथम आपल्यातली फुटीरता पाहिली. या फुटीरतेला पोसत त्यांनी काही जणांना फोडलं, त्यांना चांगल्या नोकऱ्या दिल्या, तऱ्हेतऱ्हेची प्रलोभनं दाखवली, त्यांना आपलंसं केलं आणि त्यांच्या मदतीनं ते आपल्यावर राज्य करू लागले.

आज? आपलं राज्य आपल्या हाती आहे. आपण नवनवे किती तरी उद्योगधंदे सुरू केले आहेत. आर्थिकदृष्ट्या आपण किती तरी प्रगती केली आहे. पण आपलं राष्ट्रीय चारित्र्य आपण घडवू शकलो आहोत का? सगळ्यांनी एकमेकांच्या हातात हात घालून, एकमेकांना सांभाळत, एकमेकांच्या आधारानं आपण देशाला पुढे घेऊन जायला हवं, हे आपल्याला कळतंय का? त्या दिशेनं आपण प्रयत्न करतो आहोत का?

आज देशापुढे किती तरी प्रश्न उभे आहेत. सगळे जुने. यातला एक तरी प्रश्न आपण सोडवू शकलो आहोत का?

देश स्वतंत्र झाला खरा; पण आपलं मन? इंग्रज आले त्या वेळेला होतं, तसंच राहिलंय ते. तेच मन घेऊन आपण आपलं स्वातंत्र्य टिकवणार आहोत का?

आपल्याकडे मन-परिवर्तनाचा कोणता तरी कार्यक्रम आहे का?

## । ३७ ।

नायबराजजींना मी म्हटलं, "आज मंजूला घरी पोचायला जरा उशीर होईल. रात्रीचे आठ वाजतील. तुम्ही काळजी करू नका. मीच आणून पोचवीन तिला."

"कुठे जायचं ठरवलंय?"

"बंगाली मार्केटात, आइस्क्रीम खायला. 'सन्निधी'तल्या सगळ्या मुलींना घेऊन जायचं ठरवलं आहे."

"कशाला एवढा खर्च करायला हवा?" नायबराजजी म्हणाले.

"असा कितीसा खर्च येणार आहे मला? वीस-तीस रुपयेच ना? पण वीस-तीस रुपये खर्च करून मुलींना होणारा आनंद पाहताना मला जो आनंद मिळणार आहे, त्याचं मोल तीस लाख रुपयांपेक्षा किती तरी अधिक असेल." मी म्हणालो.

नायबराजजी गप्प झाले. मग म्हणू लागले, "लक्ष्मी आहे ती. विष्णूची पत्नी. आपली आई. आईचा भोग घ्यायचा नसतो. तिची भक्ती आणि सेवा करायची असते."

। ३८ ।

देवदर्शन घेऊन तो देवळातून बाहेर आला, तेव्हा समोरच ती त्याला दिसली. ती देवदर्शनाला येत होती. तिच्याबरोबर तिचा नवरा होता. याच्याबरोबर याची बायको. दोघांची नजर एकमेकांवर पडली आणि दोघंही थांबली.

"बरा आहेस ना रे?" तिनं विचारलं.

"तू कशी आहेस?" त्यानं विचारलं आणि मग बायकोकडे बोट दाखवत म्हणाला, "ही माझी बायको."

"हा माझा नवरा." तिनं आपल्या नवऱ्याची ओळख करून दिली.

मग 'मुलं किती? काय शिकतात?' वगैरे प्रश्न एकमेकांना विचारले आणि दोघं आपापल्या वाटेनं चालू लागले.

पंधरा वर्षांपूर्वी दोघं एकमेकांच्या प्रेमात पडली होती. वेडीपिशी झाली होती. लग्न करणार होती; पण नाही करू शकली. नंतर एकमेकांना भेटूही शकली नाहीत. कारण, हा दूर अमेरिकेत गेला आणि ती इथे गोव्यातच राहिली.

पंधरा वर्षांनंतर दोघं एकमेकांपासून इतकी अलिप्त कशी झाली, हा मला पडलेला प्रश्न! मी त्याला विचारलं,

"जुन्या आठवणींनी उचंबळून आलं नाही?"

"आलं." तो म्हणाला, "पण क्षणभरच... कारण ती आता; 'ती' राहिलेली नाही. तिच्या आईसारखी दिसते आहे."

मी म्हटलं, "तिलाही कदाचित तू तुझ्या वडलांसारखा दिसला असशील."

मग माझ्या डोक्यातलं चक्र सुरू झालं. म्हटलं, 'समजा, तो तोच राहिला असता, तसाच दिसला असता, तीही तीच राहिली असती, तशीच दिसली असती, तर मग कदाचित दोघांच्याही जुन्या आठवणी उचंबळून वर आल्या असत्या. पण आज पंधरा वर्षांनंतर तो 'तो' राहिला नाही. बदलला. तीही 'ती' राहिली नाही. बदलली. 'काळा'चीच किमया म्हणायची ही."

काळ प्रेमातली ओढ कमी करत जातो. काळ मोठ्यातली मोठी दुःखं हलकी करतो. काळानं शत्रुत्वही नाहीसं केलं पाहिजे; अपमानही विसरायला लावला पाहिजे. पण काहीजण शत्रुत्व विसरत नाहीत. अपमानही विसरत

नाहीत. हे कसं काय? वयानं ते वाढले; पण मनानं होते तिथेच, तेवढेच राहिले, असं समजावं का?

। ३९ ।

जग दुःखानं भरलं आहे, असं बुद्ध म्हणाला. एवढ्यानंच बुद्ध निराशावादी होता – पेसिमिस्ट होता – असं म्हणता येईल का?

जग दुःखानं भरलं आहे, असं म्हणून तो गप्प बसला असता, तर तसं म्हणता आलं असतं. पण दुःख असतं, असं म्हणतानाच, या दुःखाला कारणं असतात, असंही तो म्हणतो. ही कारणं दूर करता येतात, म्हणून सांगतो आणि ती दूर करण्याची एक अष्टांगी वाटही तो दाखवतो.

ज्यानं कोणत्याही गुरूचा, पुरोहिताचा वा देवाचाही आधार न घेता आपली आपणच ही वाट शोधून काढली आणि त्या वाटेनं लोकांना नेलं, त्याला निराशावादी कसं म्हणता येईल?

। ४० ।

सगळीच उपनिषदं मला प्रिय. त्यातही ईशावास्य सर्वांत जास्त. अगदी लहानसं उपनिषद आहे हे. फक्त अठरा श्लोकांचं. मला ते पाठ आहे. कधी कधी डोक्यात घोळू लागतं. परवा असंच झालं.

संध्याकाळचा फेरफटका मारत होतो. पंधरा-एक मिनिटं ते डोक्यात घोळत राहिलं. पण पहिल्याच श्लोकाच्या दुसऱ्या अर्ध्या भागापुढे ते जाईच ना! हा दुसऱ्या ओळीचा अर्धा भाग म्हणजे–

'तेन त्यक्तेन भुंजीथाः । मा गृधः । कस्यस्वित् धनम् ।' 'त्यागून भोगावं. कुणाच्याच धनाकडे वखवखलेल्या नजरेनं पाहू नये.' सगळ्या मोठमोठ्या जाणकारांनी याचा असाच अर्थ लावला आहे; आणि सर्वांनी तो प्रमाण मानला आहे. मीदेखील तोच प्रमाण मानून चालत आलो होतो. पण आज एक नवाच अर्थ समोर स्पष्ट उलगडू पाहत होता.

'तेन' म्हणजे 'त्याने'; ईश्वराने, जे 'त्यक्तेन' म्हणजे सोडले (तुझ्यासाठी), तेच, तेवढेच तू खायचे, भोगायचे, त्यापलीकडे नाही, त्याहून अधिक नाही. 'मा गृधः' वखवखलेल्या गिधाडाप्रमाणे जगाकडे पाहू नकोस. हे जग एकट्या तुझ्यासाठी नाही. ते कुणाचं? त्याचं; ईश्वराचं. समोर तुला जे

'यतकिंच जगत्यां जगत' दृष्टीस पडतं, ते त्याचं धन; त्यानं निर्मिलेलं. ते तू लुटायचं नाहीस.

एकाएकी जाणवलं. म्हटलं, उपनिषद आज मला इकॉलॉजी शिकवायला लागलं की काय? ते म्हणतं, फळ खा; झाड मारू नकोस. दूध पी; गाय मारू नकोस. तुझ्या गरजा भागवण्यापुरतं निसर्गानं जेवढं 'सोडलंय', तेवढंच तू खायचं. बाकीचं तू हे जे 'हे तोड, ते तोड' करू लागला आहेस, हे एक्स्प्लोअर कर. ते एक्स्प्लॉइट कर, असं करू लागला आहेस, ते करण्याचा तुला अधिकार नाही. तुला जंगलतोड करायचा अधिकार नाही. तोडायचं झालंच, तर फक्त गरजेपुरतंच. पण त्याचबरोबर, एक झाड तोडलंस, तर दोन झाडं लाव; आणि ती काळजीपूर्वक वाढव. खाणीतून खनिजं काढायची, ती गरजेपुरतीच काढ; अगदी कमीत कमी. सगळ्यांचा नाश करू नकोस. निसर्गाकडून जे घेतलं, ते त्याला परत देता येत नसेल, तर ते घेण्याचा तुला अधिकार नाही. जेवढं घेतोस, तेवढं तुला परत देता यायला हवं. जमलं, तर त्याच्या दुपटीनं देता यायला हवं. सध्या विकासाच्या नावानं तू जे काही करतो आहेस, ती आहे लूट. निसर्ग ही काही लुटण्याची वस्तू नव्हे. तू आज गिधाडासारखा झाला आहेस; तसा होऊ नकोस.

आता, कुणाही जाणकाराला भेटलो, की 'तेन त्यक्तेन भुंजीथा:' चा असा अर्थ करता येईल का, म्हणून विचारीन म्हणतो. करता येईल, असं मनापासून वाटतं.

**। ४१ ।**

स्वर्गाची आणि नरकाची अनेक वर्णनं वाचली होती. ती वाचून माझ्यावर उलटाच परिणाम झाला होता. 'छे, स्वर्गही नसतो आणि नरकही नसतो.' असं मी म्हणू लागलो होतो. परवा मात्र मला, स्वर्गही असतो आणि नरकही असतो, याचा साक्षात्कार झाला.

मुंबईला गेलो होतो. तिथे ज्यां पॉल सार्त्र याचं एक नाटक पाहायला मिळालं. नाटकाचं नाव 'नो एक्झिट'.

एक पत्रकार असतो. एका दंग्याचं रिपोर्टिंग करायला गेला असताना तो गोळी लागून मरतो. मेल्यावर कुठे जाणार? पुण्य काहीच गाठीशी नसतं. त्यामुळे नरकात जातो. नरकात तऱ्हेतऱ्हेच्या यम-यातना भोगाव्या लागतात, असं त्यानं बिचाऱ्यानं जिवंतपणी ऐकलेलं असतं. पण इथे पाहतो, तर त्याला राहायला चांगल्यापैकी खोली मिळते. खोलीत चांगल्यापैकी फर्निचर, चांगलं-चुंगलं जेवण. कामधाम काही

नाही. कोणी विचारणारं नाही, की हटकणारं नाही. हवं तेव्हा झोपा; हवं तेव्हा उठा. काय हवं ते करा. त्याला शंका येते. हा नरक म्हणायचा की स्वर्ग?

थोड्या वेळानं यमदूत एका सुंदर स्त्रीला तिथे आणून सोडतो. आणखी थोड्या वेळानं आणखी एकीला आणून सोडतो. पत्रकार यमदूतावर वैतागतो. तेव्हा यमदूत म्हणतो, ''नाही. आता आणखी कुणाला आणणार नाहीय. तुम्ही तिघांनीच इथे राहायचंय. तुम्हाला हवं असेल, ते ते हवं तेव्हा मिळेल.'' तिघं एकमेकांसोबत राहताना अशा तऱ्हेनं वागतात की, तिघांनाही मनोमन पटतं, की नरक आपल्याबाहेर वेगळा असा काही नसतोच.

होय. स्वर्गही आपल्या आतच असतो आणि नरकही आपल्या आतच. आपल्या आजूबाजूच्या लोकांशी आपले संबंध चांगले असले, की आपल्या भोवती आपसूकच स्वर्ग निर्माण होतो. आपणच तो निर्माण करतो. संबंध कटू असतील, तर नरक निर्माण होतो. मेल्यावर नव्हे; जिवंतपणीच.

। ४२ ।

अन्याय, मूर्खपणा, असं काहीही पाहून तुम्हाला राग आला, तर त्याच्याविषयी रागानं बोलू नका. चेष्टेवारी न्या. त्याची विनोदानं संभावना करा. विनोदावर लोक हसतात, त्यांच्या डोक्यात लख्ख प्रकाश पडतो; आणि मग तो त्यांच्या काळजातला ज्वालामुखीही चेतवतो.

व्हॉल्तेअरनं विनोदानंच फ्रान्समध्ये परिवर्तन घडवून आणलं होतं. कुणी तरी म्हटलंय, इटलीत रेनेसां (पुनरुज्जीवन) जन्माला आली, जर्मनीत रिफॉर्मेशन (सुधारणा) जन्माला आली; आणि फ्रान्समध्ये केवळ एक व्हॉल्तेअर जन्माला आला. आणि त्यानं या दोन्ही चळवळींच्या साथीनं रेव्होल्युशन (क्रांती) घडवून केवळ फ्रान्सचंच नव्हे; तर संपूर्ण युरोपचं मानसच बदलून टाकलं.

हसूनच त्यानं सर्वांना गारद केलं.

। ४३ ।

परवा टाइम्समध्ये एक बातमी वाचली. कुणाचंच लक्ष गेलं नव्हतं तिच्याकडे.

एका युरोपियनानं म्हटलं होतं – ''आशिया, आफ्रिका खंडांतल्या आमच्या वसाहती आमच्या हातून गेल्या. त्या जायच्याच होत्या. पण म्हणून आशिया, आफ्रिका खंडांवरचा आमचा प्रभाव संपला म्हणता येतो काय? अजूनही तिथे

आमचंच राज्य चालतंय. एक, आर्थिक क्षेत्रात आणि दुसरं, सांस्कृतिक क्षेत्रात.

"या दोन्ही क्षेत्रांत आम्ही जे सांगतो, तेच तिथले लोक करतात.

"संस्कृतीच्या क्षेत्रात ते आमचंच अनुकरण करतात. विचार कसा करायचा, हे आम्हीच त्यांना शिकवतो. आर्थिक क्षेत्रांतही काय करायचं, ते आम्हीच त्यांना सांगतो.

"आशिया आणि आफ्रिका खंडांचे खरे मालक आम्हीच आहोत – आजही."

जवाहरलाल नेहरूंनीही आपल्याला सांगितलं होतं–

*'यत् यत् आचरित श्रेष्ठः तत् तत् एव इतरः जनः । स यत् प्रमाणम् कुरुते, लोकः अनुवर्तते ।'* थोर माणसं ज्या मार्गानं जातात, त्याच मार्गानं इतर सर्व जातात. मोठी माणसं जो आदर्श घालून देतात, त्याचंच अनुकरण सर्व जण करतात.

स्वतः जवाहरलालांनी त्यांचं अनुकरण केलं आणि आपण जवाहरलालांचं करायला लागलो.

आज आपण आपले राहिलोच नाही. आपण 'त्यांचे'च झालो आहोत.

। ४४ ।

पुतण्या आणि भाच्या लग्नाच्या झाल्या आहेत. त्यांचे आई-वडील त्यांच्यासाठी स्थळं बघतात आणि मग मला विचारतात, "हे स्थळ कसं आहे? ते स्थळ कसं आहे?" मी त्यांना म्हणतो, "मुलगी देण्यापूर्वी एका गोष्टीची विचारपूस करा. बापानं मुलाला इस्टेट ठेवली आहे का? मग ती जमीन-जुमल्याच्या रूपात असो, की बँक बॅलन्सच्या रूपात...

'हो,' म्हणून उत्तर आलं, की मी म्हणतो, "मुलगा चांगला असला, तरी इस्टेट असलेल्या मुलाला मुलगी द्यायची नाही."

ज्यांनी मुलासाठी इस्टेट ठेवली, त्यांनी मुलाच्या कर्तृत्वाच्या वाटेत खोडा घातला, म्हणून समजा. माझ्या पिढीतल्या काहीजणांना पैशा-अडक्यानं, जमीन-जुमल्यानं गिळून टाकलेलं मी पाहिलंय. आयुष्यात ते काहीच करू शकले नाहीत. वडिलोपार्जित संपत्तीचे, जमीन-जुमल्याचे ते गुलाम बनले आणि स्वातंत्र्यात जेव्हा तो हातून जाऊ लागला, तेव्हा ते सैरभैर झाले. अनेकांचं जगणं जमीन-जुमल्यापायी करपून गेलं.

ज्यांच्याजवळ जमीन-जुमला नव्हता, त्यांनीच आयुष्यात काही कर्तृत्व करून दाखवलं.

जमीन-जुमला म्हणजे भाग्य नव्हे; दुर्भाग्य मानलं पाहिजे.

। ४५ ।

थोरोचं 'वॉल्डन' वाचल्याला खूप काळ लोटला; पण संस्कारांच्या रूपानं ते आत आत कुठे तरी राहिलेलं आहे.

अमेरिकेत वॉल्डन नावाच्या तळ्याला लागून थोरोची स्वत:ची जमीन होती. तो तिथे जाऊन राहिला होता. तिथेच त्यानं राहण्यासाठी स्वत:च्या हातांनी एक झोपडी बांधली होती – लाकडाची. कुदळ-फावडं घेऊन तो जमीन कसू लागला होता. स्वत:च्या गरजेपुरतं पिकवू लागला होता. दोनच वर्षांचा त्याचा हा प्रयोग. तो म्हणे, साधेपणानं जगण्याचा एकदा निश्चय झाला, की तुम्ही हाती कुदळ-फावडं घ्याल; आणि स्वत: काम कराल. काम केलं, की तुम्हाला कडकडून भूक लागेल. भूक लागल्यावर तुम्ही चवीनं जेवाल, तुमचं पचन चांगलं होईल, प्रकृती ठणठणीत राहील, मन प्रसन्न राहील आणि तुमचं वाचन-मननही चांगलं होईल. लेखक असाल, तर जे काही लिहाल, तेही चांगलं उतरेल.

पोटाला लागेल तितकं पिकवायला फार श्रम पडत नाहीत. घाम गाळत थकून जाईपर्यंत काम करण्याची गरज नाही. भूमाता उदार असते. तुम्ही काम कराल, तर ती पन्नास-शंभर पटींनी तुम्हाला देईल. थोरोनं केलेला हा प्रयोग मागल्या शतकातला. 'मॉडेल' म्हणून तो आज डोळ्यांसमोर ठेवता यायचा नाही; पण त्याकडे एक दिवा म्हणून पाहायचं. त्या दिव्याच्या प्रकाशात आपल्याला एक-एक पाऊल पुढे टाकता येईल. थोडीशी अक्कल वापरावी लागेल, इतकंच.

उत्पादक श्रमाला आपण आपल्या जीवनात प्रतिष्ठेचं स्थान दिलं पाहिजे. कमरेवर हात ठेवून उभं राहायचं काम पंढरपुरच्या विठोबानं केलं, ते अठ्ठावीस युगं पुरेसं आहे. आपल्याला आपले हात मातीतच मळवायला हवेत. कमरेत वाकून काम करावं लागेल, तेव्हाच आपली दृष्टी बदलेल.

पांढरपेशांनी 'काम करायचं नाही', असा एक नियम केला. परिणामी, 'काम करणं हे कमीपणाचं लक्षण', असं सगळे मानू लागले. आजवर जे लोक काम करत आले होते, तेही आता पांढरपेशांचं पाहून 'काम करायचं नाही' या नियमाबरहुकूम चालू लागले आहेत. असला विठोबाच्या अनुयायांचा समाज मोडून काढला पाहिजे. त्याची प्रतिष्ठा कमी करायला हवी. पांढरपेशांनीच आता स्वत: उत्पादक श्रमांची कामं करून समाजाला नवा आदर्श घालून दिला पाहिजे.

'काम करायचं नाही', या तत्त्वाचा आधार घेत पांढरपेशांनी 'श्रम विभागणी'चं एक अर्थशास्त्र निर्माण केलं. ते म्हणू लागले, ''सर्वांनी शेतात काम करणं वेडेपणाचं आहे... सगळ्यांनी कापड विणणं, हे तर त्याहून वेडेपणाचं आहे.

खूपशा लोकांनी शेतात काम करावं, काही जणांनी मिलमध्ये जाऊन कापड विणावं; आणि त्यातल्याच काही जणांनी कारखान्यात जाऊन काम करावं.''

आणि पांढरपेशांनी? लेख लिहायचे, भाषणं करायची, पदं म्हणायची, नाटकं करायची, संस्कृतीत भर घालायची. 'तू रांध, मी जेवतो', असला हा न्याय. हाच न्याय आज जगात चालतो आहे. हा मोडून काढायला हवा. 'वॉल्डन' पुन्हा वाचायला हवं; किंवा तसलंच एक नवं पुस्तक लिहायला हवं.

। ४६ ।

थकवा आल्यासारखं वाटायचं. नको-नकोसं व्हायचं. पडून राहायचो आणि सारखी कूस बदलयचो. दोन दिवस सोसलं.

तिसऱ्या दिवशी उठलो, सदरा घातला, पायात चपला सरकवल्या आणि चालत राहिलो. घरातून 'शिमेपायणी'पर्यंत, तिथून मंगेशीपर्यंत, मंगेशीहून परत घरी. तासभर चाललो. थकवा बघता-बघता फुर्रर्रर्र करून कधी उडून गेला, कळलंच नाही. खरं तर थकवा आलेला असताना तासभर फिरून येण्यानं आणखी थकवा यायला हवा होता, त्याऐवजी हलकं-हलकं वाटू लागलं. विहिरीवर गेलो आणि कळशा भरभरून काढून डोक्यावर ओतून घेतल्या.

स्वर्गसुख कशाला म्हणतात, ते त्या दिवशी कळलं.

मला बाबांची आठवण आली. ते नेहमी म्हणायचे – ''आळस झटकायचा असेल, तर श्रम केले पाहिजेत; घाम गाळला पाहिजे.''

श्रम हा जीवनाचा पाया आहे. श्रम केल्याशिवाय अन्न मिळत नाही, वस्त्र विणून मिळत नाही, घर बांधून मिळत नाही; माणसाची कोणतीच गरज भागत नाही. पण आपण बहुतेकजण स्वत:च्या गरजा भागवण्यासाठी स्वत: कष्ट करीत नाहीत. मात्र आपण कष्ट केले नाहीत, तरी आपल्यासाठी दुसऱ्या कुणाला तरी ते करावेच लागतात.

आपल्यासाठी दुसऱ्या कुणी तरी कष्ट करावेत, याची लाज वाटायला हवी माणसाला. पण आजच्या संस्कृतीनं माणसाला पार निर्लज्ज करून सोडलंय; आणि या निर्लज्ज माणसानं स्वत:साठी असा एक समाज निर्माण केला आहे, ज्यात दोन प्रकारची माणसं पाहायला मिळतात. एक, बेसुमार कष्ट करूनही ज्यांना काहीही मिळत नाही, असे; आणि दुसरे, ज्यांना कोणतेच कष्ट न करता सगळंच मिळतं, असे. एकाला एका प्रकारचे परिणाम भोगावे लागतात; दुसऱ्याला दुसऱ्या प्रकारचे. ही समाजव्यवस्था मोडीत काढली पाहिजे. ती कशी मोडायची? तर श्रमाला सभ्य,

सुसंस्कृत जीवनाचं पवित्र अंग बनवून. माणूस कोणीही असो, डॉक्टर असो, धर्मगुरू असो, प्रोफेसर असो, लेखक असो, पुढारी असो, व्यापारी असो, कितीही मोठा असो, त्यानं हाती कुदळ-फावडं घेऊन बागेत जाऊन थोडं तरी काम केलं पाहिजे, काही तरी पिकवलं पाहिजे, घाम गाळला पाहिजे. त्याशिवाय जेवायचं नाही, अशी शपथ घेतली पाहिजे, तरच दोन गोष्टी घडून येतील–

एक, देशाच्या संपत्तीत त्याच्या हातून थोडी-बहुत तरी भर पडेल आणि दुसरी, समाजात आळशी, ऐदी माणसं दिसणार नाहीत. माणसाचा स्वभावच बदलेल.

मग योगासनं करायची, जॉगिंग करायची, व्यायाम करायची, फिरायला जायची गरजच भासणार नाही माणसाला. माणूस शरीरानं आणि मनानंही टवटवीत राहील. आणि (अजून कुणाच्या लक्षात आलेलं नाही; पण) माणसा-माणसात श्रेष्ठ-कनिष्ठ असा भेदभावही राहणार नाही.

सत्याचं व्रत घ्या, म्हणून सांगणारे लोक जगात भेटतात. ब्रह्मचर्याची शपथ घ्यावी, असं सांगणारेही असतात. अहिंसा, अस्तेय, अपरिग्रह ही व्रतं घेणारे असतात. श्रमाला यांच्याएवढंच, नव्हे; त्याहून अधिक मोल आहे, मूलभूत आणि सर्वांत महत्त्वाचं असं हेच एक व्रत आहे, अन्यायी समाज मोडून नवा न्यायाधारित समाज उभारायचं हेच प्रभावी साधन आहे, असं सांगणारा कुणी भेटलाय होय तुम्हाला? एकच माणूस होता; पण 'फॅड' करणारा माणूस म्हणून त्याची संभावना करीत आपण त्याला ठार मारलं.

देशाचं केवढं नुकसान केलं आपण, कल्पना आहे त्याची आपल्याला?

। ४७ ।

जाती नष्ट केल्या पाहिजेत, असं म्हणणाऱ्या सुधारकांनी – राजा राममोहन रॉयपासून डॉ. राम मनोहर लोहियांपर्यंतच्या सर्वांनी – जाती-पातींबद्दल ब्राह्मणांना जबाबदार धरलं आहे. जणू काही त्यांनीच त्या निर्माण केल्या आणि त्यांनीच त्या टिकवल्या. कोणत्याच सुधारकानं – अगदी ब्राह्मण सुधारकानंसुद्धा – ब्राह्मणांना सोडलं नाही. गांधींनी मात्र एका शब्दानंदेखील ब्राह्मणांना दोष दिलेला नाही.

मी काकासाहेब कालेलकरांना विचारलं. पण मी ज्या वेळी त्यांना हा प्रश्न विचारला, त्या वेळपर्यंत त्यांना दोन्ही कानांनी ऐकू येईनासं झालं होतं. पाटीवर लिहून विचारावं लागायचं. त्यांना माझा प्रश्न नीट समजला नाही. गांधीजी वर्णव्यवस्था मानायचे, ते का, हे त्यांनी मला समजावून सांगितलं; पण माझ्या

प्रश्नाला उत्तर मिळालं नाही. मी दादा धर्माधिकारींना विचारलं. ते म्हणाले, ''हिंदू नावाचा माणूस आहे कुठे? कोळी आहे, माळी आहे, वाणी आहे, ब्राह्मण आहे... हिंदू समाजात फक्त वेगवेगळ्या जातीचे लोक आहेत; हिंदू नाहीत.'' हेही माझ्या प्रश्नाचं उत्तर नव्हतं.

मग मीच उत्तर शोधलं. म्हटलं, जातीत हा याच्याहून श्रेष्ठ, तो त्याच्याहून श्रेष्ठ, अशा पायऱ्या असतात. ही हायरार्किकल व्यवस्था. एका समान पातळीवर कुणीच नसतं. कुणी कुणापेक्षा वरचे; तर कुणी कुणापेक्षा खालचे. समजा, एका गावात वीस जातींचे लोक आहेत. सगळे असेच वेगवेगळ्या पायऱ्यांवर बसलेले आढळतील. यातला पंधराव्या पायरीवरचा माणूस चौदाव्या पायरीवरच्या माणसाला म्हणणार, ''तुम्ही मोठे असाल तुमच्या घरचे!'' आपल्याला तो कमी लेखतो; म्हणून हा दात-ओठ खात त्याच्यामागे त्याला बोलणार; पण याच्या खालच्या पाच पायऱ्यांवर बसलेल्यांना हा कमीच लेखणार. म्हणजे हे सगळेच ब्राह्मण, त्यांच्यासारखीच मतं असणारे; म्हणूनच सगळ्यात वरच्या पायरीवर बसलेल्या ब्राह्मणांना कोणत्या तोंडानं दोष द्यायचा? मतीनं ब्राह्मण नाही, अशी एकच जात हिंदूंमध्ये आहे – भंग्याची. त्याच्याहून खालचं कुणीच नाही आणि आणि तो कुणाला आपल्यापेक्षा खालच्या जातीचा समजत नाही. गांधींनी यालाच हाताशी धरलं. ब्राह्मणाला देतात, तो मान याला द्या, म्हणून सगळ्या सवर्णांना सांगितलं. भंग्याच्या हातातला झाडू काढून सवर्णाच्या हातात दिला आणि 'हा आता तुमचे पायखाने साफ करायला येणार नाही, याला मी वेद शिकवणार', म्हणून सांगितलं आणि जातिव्यवस्थेचा पाया उखडायचा प्रयत्न केला.

गांधी सुधारकांतले रॅडिकल होते.

पण त्याचबरोबर गांधी वर्ण मानीत. इतकंच नव्हे; तर वर्णव्यवस्था हे हिंदू धर्माचं वैशिष्ट्यपूर्ण अंग आहे, असं म्हणत. 'ही एक विज्ञानसिद्ध व्यवस्था आहे, मागे-पुढे साऱ्या जगानं हिंदू धर्माकडून घ्यावी अशी व्यवस्था', असं म्हणत. सुताराच्या मुलानं सुतार म्हणूनच पुढे यायला हवं, वाण्याच्या मुलानं व्यापारच करायला हवा, ब्राह्मणानं कोणतं तरी उत्पादक काम करून पोट भरावं आणि त्याबरोबर अध्ययन-अध्यापन करावं, असं ते म्हणत. आनुवंशिक संस्कारांवर त्यांची श्रद्धा होती. सुतारकाम कुणालाही शिकता येतं; पण सुताराचा मुलगा अधिक कुशल सुतार होतो, इतकं आनुवंशिक संस्कारांना महत्त्व आहे, असं ते म्हणत. ''सुताराच्या मुलानं चार्टर्ड अकाउंटण्ट कशाला व्हायला हवं, सुतारकाम कमीपणाचं आहे होय?'' असंही ते विचारीत.

आजचं शिक्षणशास्त्रदेखील हेच सांगतं. मुलाची नॅचरल टेण्डन्सी पाहून त्या प्रकारचं शिक्षण त्याला दिलं पाहिजे, असं ते सांगतं.

शेती, सुतारकाम, कुंभारकाम – कोणताच व्यवसाय कमी दर्जाचा नाही, सगळ्यांचा स्तर एकच, असं गांधी म्हणत. पण दोन कामं अशी आहेत की, जी पिढीजात जे लोक करत आले आहेत, त्यांच्याकडून ती काढून घेतली पाहिजेत, असं ते म्हणत. एक, पायखाने साफ करण्याचं भंग्याचं कामं आणि दुसरं, मेलेल्या गुरांचं चामडं सोलण्याचं महाराचं काम. दोन्ही कामं त्यांनी सवर्णांच्या हातात दिली. अप्पा पटवर्धन चामडं सोलायचे; भंगीकाम करायचे. विनोबा तर भंगीकामात 'एक्स्पर्ट' झाले. हे दोघंही जातीनं ब्राह्मण होते.

वर्णव्यवस्थेतल्या उच्च-नीचपणाच्या भिंती ते या प्रकारे मोडू पाहत होते.

एक दिवस अचानकच भाशमचं 'The wonder that was India.' हे पुस्तक हाती आलं. त्यात जाति-वर्णांविषयी काय सांगितलंय, ते पाहिलं. वेदांत काय आहे, स्मृतीत काय आहे, ते सगळं मोठ्या जाणकारीनं आणि बारकाईनं त्यात दिलं आहे. सगळी माहिती देऊन भाशम पुढे म्हणतो, "मागल्या साठ-सत्तर वर्षांपासून जात नाहीशी होण्याच्या मार्गावर आहे, असं दिसतं. एक म्हणजे, शिक्षणाच्या प्रसारामुळे, दुसरं, सुधारकांच्या प्रयत्नांमुळे. तिसरी गोष्ट म्हणजे, दलितांमध्ये झालेल्या जागृतीमुळे आणि चौथं म्हणजे, लोकशाहीच्या आदर्शामुळे.

'But when Mahama Gandhi persuaded his followers to sweep their own floors and clean their own latrines, he sounded the death knell of the old Hindu social order.' एका विदेशी इतिहासकाराचं म्हणणं आहे हे.

किती खोलवर पोहोचले होते गांधीजी!

। ४८ ।

जगण्यासाठी माणसाला कोणतं ना कोणतं काम मिळायलाच हवं. काम शोधायचा प्रसंग कुणावर येऊ नये; आणि काम न करणाऱ्याला खायला मिळू नये.

काम केल्याशिवाय समाज चालणार नाही.

जन्माला आलेल्या प्रत्येकाला काम करावं लागेल आणि त्याला काम नेहमी मिळत राहील, अशा प्रकारची समाजरचना करायला हवी.

दोन गोष्टी महत्त्वाच्या–

पहिली गोष्ट – माणूस जे काम करतो, त्यात त्यानं आपल्या ठायी असलेल्या साऱ्या कौशल्याचा पुरेपूर उपयोग केला पाहिजे; आणि काम करता-करता त्याचं हे कौशल्य वाढत गेलं पाहिजे.

दुसरी गोष्ट – आपण काम करतो, ते फक्त आपल्या स्वत:साठी नव्हे; तर सर्व समाजासाठी, चारचौघांना त्याचा उपयोग व्हावा म्हणून करतो, याची जाणीव माणसाला असायला हवी. याच उद्देशानं त्यानं काम केलं पाहिजे; आणि त्याला ते इतरांच्या सोबतीनं करायला मिळायला हवं; करता यायला हवं.

कामात या दोन गोष्टी असल्या, तर माणसाला काम करण्यातला आनंद मिळतो, त्याची सृजनक्षमता बहरते, अधिक सर्जक होते.

कामात माणसाची घुसमट होता कामा नये, त्याचं कौशल्य मरून जाता कामा नये, त्याच्या सृजनक्षमतेचा कोंडमारा होता कामा नये; आणि आपण वेठबिगारी करतो आहोत, असं त्याला वाटता कामा नये.

काम 'खरं' असायला हवं, 'योग्य' असायला हवं, संस्कारी माणसाला 'शोभेल' असंही असायला हवं.

। ४९ ।

जपानमध्ये आम्ही दोन महिने फिरलो. आगगाडीनं फिरलो. कोणत्याच स्टेशनवर आम्हाला कुली किंवा हमाल दिसले नाहीत. युरोप-अमेरिकेतही असंच असावं. कुठेच कुली, हमाल मिळणार नाही. हमाल, कुली नसल्यानं सगळे प्रवासी स्वत:चं सामान स्वत:च उचलतात आणि स्वत:चं सामान स्वत:च उचलायचं असल्यामुळे प्रत्येक जण आपल्याच्यानं उचलवेल, एवढंच सामान घेऊन प्रवासाला निघतो.

जपानमध्ये जो तो स्वत:च स्वत:चा कुली, स्वत:च स्वत:चा हमाल असतो.

तिथे आम्ही कुणाकडे कामवालीही पाहिली नाही. नाही म्हणायला ओसाकाच्या एका भारतीय व्यापाऱ्याकडे पाहिली. ती दिवसातून दोन-वेळा यायची – स्वत:च्या मोटारीतून. आणि दोन्ही वेळेला अर्धा-अर्धा तास काम करून महिन्याला तीन-एक हजार रुपये पगार घेऊन जायची.

जपानमध्ये जपानी लोकांकडे कामवाल्या नसतात. भांडी घासायचं काम घरातलीच सारी माणसं मिळून करतात; आणि भांडी घासायचं काम घरातल्याच माणसांना करावं लागत असल्यामुळे माणसं कमीत कमी भांडी वापरतात.

जपानची संस्कृती ही शहरी संस्कृती. चीन आपल्या देशासारखा. लाखो

खेड्यांचा देश. तिथेही आम्ही कुणाकडे कामवाली पाहिली नाही. तसंच कुठेच हमाल किंवा कुली पाहिला नाही.

तेच कशाला? तिथे आम्ही कुणाकडे भंगीही पाहिला नाही. चीनमध्ये खेडेगावांतून सेप्टिक टँक नाहीत. सतत साफ करावे लागणारे संडास आहेत. आणि ते इतके स्वच्छ असतात की, दुसऱ्या दिवशी ते साफ करायला घरची माणसं जरासुद्धा अळंटळं करत नाहीत. चीनमध्ये प्रत्येक जण स्वतःच स्वतःचा हमाल, स्वतःच स्वतःचा कुली, स्वतःच स्वतःचा नोकर, स्वतःच स्वतःचा भंगी.

कुली, हमाल, कामवाल्या, मोलकरणी, घरगडी, भंगी, हे 'प्राणी' आपल्याच देशात पाहायला मिळतात. तेही हवे तेवढे. मुंबई, कोलकात्यासारख्या शहरांत तर जास्तच पाहायला मिळतात.

सभ्य-सुसंस्कृत देशांत कुठेही ते पाहायला मिळणार नाहीत.

आपण स्वतःला आता 'सुधारलेले' म्हणवू लागलो आहोत, स्वतःला 'मॉडर्न' समजू लागलो आहोत; पण सरंजामशाहीच्या संस्कारांतून अजून आपण मुक्त झालो नाही.

प्रत्येकानं स्वतःच स्वतःचा कुली व्हायचं, प्रत्येकानं आपलं जेवण स्वतःच शिजवायचं, आपली भांडी आपण घासायची सवय लावून घ्यायची, स्वतःच स्वतःचा नोकर व्हायचं, भंगी व्हायचं, हे उदाहरण भारतात एकाच ठिकाणी पाहायला मिळतं – गांधीजींच्या 'सेवाग्राम' आश्रमात वा देशात जिथे जिथे गांधीं- आश्रम चालतात, तिथेच फक्त. तिथे प्रत्येक जण आपलं काम आपणच करतो. स्वतःच घरात झाडू मारतो, स्वतःचे कपडे स्वतःच धुतो, आपला संडास स्वतःच साफ करतो. जयप्रकाश नारायण यांनाही आम्ही ही कामं करताना पाहिलं आहे. एवढंच कशाला, या आश्रमाच्या संस्कारांत वाढलेले डॉ. राजेंद्र प्रसाद राष्ट्रपती झाल्यावर जेव्हा दिल्लीला राष्ट्रपती भवनात राहायला गेले, तेव्हा आंघोळ झाली, की स्वतःचं धोतर आणि सदरा स्वतः धुवून मगच स्नानगृहातून बाहेर यायचे. राजगोपालाचारीही हा नियम आयुष्यभर पाळत आले.

आता ही सगळी कामं सगळे सभ्य-सुसंस्कृत देश करताहेत म्हटल्यावर गांधींचे आदर्श out of date झाले, असं कोणत्या तोंडानं म्हणायचं?

आपण स्वतःच स्वतःचे कुली, स्वतःचे नोकर, स्वतःचे भंगी झालो, की आपल्या सवयीही आपसूक बदलतील. प्रवासाला जाताना आपल्याच्यानं उचलवेल, तेवढंच सामान आपण बरोबर घेऊ; घासायला सोपं पडेल, इतकीच भांडी आपण घरात वापरायला लागू; धुवायला सोपं व्हावं, म्हणून आपण कपडेही

फार मळवणार नाही. आपल्या सवयी मुळातूनच बदलतील. जेव्हा आपण आपलेच भंगी होऊ, तेव्हा आपले संडास तर स्वच्छ ठेवूच; पण त्याचबरोबर जाऊ तिथे घाण करायच्या आपल्या सवयीतूनही आपण मुक्त होऊ.

स्वत:ची कामं स्वत: करायला लागू, तेव्हाच खऱ्या अर्थानं आपण सभ्य, सुसंस्कृत होऊ; खऱ्या अर्थानं 'मॉडर्न' होऊ.

आपली 'लाइफ स्टाइल'च पुरती बदलून जाईल.

देशात कुली, हमाल, मोलकरणी, नोकर, चाकर, भंगी असणं, यासारखी दुसरी लाजिरवाणी गोष्ट नाही.

। ५० ।

कलमावर बांडगूळ माजू देऊ नये. तसंच, सरकारात नोकरशाहीचं – ब्यूरॉक्रसीचं – प्रस्थ वाढू देऊ नये. नोकरशाही जितकी वरचढ होते, तितकी सरकारची कार्यक्षमता उणावते. आणि आपल्या देशात तर आपण नोकरशाही असायला हवी, त्याच्या तिप्पट वाढवून ठेवली आहे. सरकार नीट चालावं, लोकांची कामं वेळेवर व्हावीत, असं खरोखरीच आपल्याला वाटत असेल, तर दोनतृतीयांश नोकरशहांना घरी पाठवून द्यायला हवं. दुसरा उपाय नाही. त्यांना काढून टाकता येणार नाही, हे खरं. त्यांना काढून टाकलं, तर ते कोर्टात जातील आणि 'स्टे' घेऊन येतील. म्हणून मग काय करायचं? तर त्यांना सांगायचं, "तुम्हाला कामावर घेतलं, ही आमची चूक झाली. आता तुम्ही घरी जावं. महिन्याच्या महिन्याला तुमचा पगार पोहोचता केला जाईल. एक तर कसलं तरी उत्पादक काम करा, शेती करा, कोणता तरी उद्योग सुरू करा; नाही तर मग पगार घेऊन आरामात देशाचे जावई असल्यासारखे रहा. इथे ऑफिसात येऊ नका. तुम्ही आलात, की कामं नीट होत नाहीत."

चेष्टा वाटेल; पण ही चेष्टा नव्हे. हे लोक आळशी आहेत. होता होईल तोवर काम करायचं नाही, करायला लागलंच, तर दुसऱ्यावर ढकलायचं आणि ढकलायला नाहीच जमलं, तर मग जिवावर आल्यासारखं कसं तरी उरकायचं, अशी एक 'लाइफ स्टाइल' या लोकांनी विकसित केली आहे. समाजाला हे लोक काहीच देत नाहीत; समाजाकडून फक्त घेत राहतात. बांडगुळासारखे माजले आहेत हे. यांना श्रमाची काही किंमत नाही. उलट, हातानं काम करणं, हे ते कमीपणाचं मानत आले आहेत; आणि सत्ता, संपत्ती सारं याच लोकांच्या हातात असल्यानं इतर लोकही 'Masses follow the classes' या न्यायानं

त्यांचंच अनुकरण करत चालले आहेत. यामुळे झालंय काय, की उत्पादक काम करायला कुणीच पुढे सरसावत नाही. शेतकरी शेती करीत नाहीय, सुतार सुतारकाम करीत नाहीय, गवंडी गवंडीकाम करीत नाहीय. समाजधारणेसाठी जी कामं आवश्यक, ती कुणीच करीत नाहीय. पिढ्यान्‌पिढ्या ही कामं करीत आलेले लोकही आता ही कामं सोडून नोकरशहांप्रमाणे चार्टर्ड अकाउंटण्ट, मॅनेजर, वकील, ऑफिसर, क्लार्क असे निरुपयोगी कुणी तरी व्हायचा प्रयत्न करतात. त्यांना दोष देण्यात अर्थ नाही. कसा देणार? ही कामं कमीपणाची, ती करणारे लोक खालच्या पातळीवरचे, त्यांना समाजात काही प्रतिष्ठा नाही, असा सगळ्यांचा समज या नोकरशहांनी करून दिला आहे.

परिणामी, ही कामं करायला आपल्याला बाहेरून माणसं आणावी लागतात.

उत्पादक कामांना समाजात प्रतिष्ठा नाही, हे आणखी एका गोष्टीनं सिद्ध करून दाखवलं आहे. ही कामं करणाऱ्या माणसांना समाज अगदी तुटपुंजी रोजंदारी देत आला आहे. दोन वेळचं जेवणदेखील त्यातून सुटत नाही. आणि जे कोणतंच उत्पादक काम करीत नाहीत, त्यांची घरं मात्र ओसंडून वाहताहेत. हे पाहून असली उत्पादक कामं करायला कोण तयार होईल? कष्ट करणाऱ्यांना तुटपुंजा मेहनताना मिळत राहिला आणि न करणाऱ्यांना बेसुमार पैसा मिळत राहिला, तर समाज कष्ट कधी करणारच नाही. आज आपल्या समाजात जो जास्तीत जास्त शिकतो, तो समाजाकडे जास्तीत जास्त पगाराची मागणी करतो. आपल्याला शिक्षण द्यायचं म्हणून सरकारनं शाळा-कॉलेजं काढली. ती चालायला हवीत म्हणून समाजानं कराच्या रूपानं सरकारला हातभार लावला. सरकारनं, म्हणजे समाजानं आपल्याला शिकवण्यासाठी खूप खर्च केला. या समाजाचं आपण काही देणं लागतो, त्याच्या उपकारांतून थोडं तरी उतराई होऊया, हे भानच या लोकांना राहिलेलं नाही. उलट, ते म्हणू लागलेत, ''तुम्ही आम्हाला शिकवून मोठं केलंत नं? मग आता आम्हाला पगारही तसेच मोठे-मोठे दिले पाहिजेत तुम्ही.''

समाजातली सगळी मूल्यंच यांनी उलटी-पालटी करून तोडून-मोडून टाकली आहेत.

बारा महिन्यांचा पगार घेऊन साडेसहा महिन्यांच्या सुट्ट्या घ्यायच्या, हा नियम बनवला या लोकांनी.

समाजाची मूल्यं कशी उफराटी झाली आहेत, याचा विचार करू लागतो, तेव्हा विनोबांचा आवाज कानांत घुमू लागतो. विनोबा म्हणायचे,

''तुम्ही पैशाला अवास्तव दिलं; म्हणून असं झालं. पैशाच्या हाती तुम्ही तुमचा सगळा कारभार सोपवला; म्हणून सगळं उलटं-पालटं झालं. पैसा मुळात

लफंगा. त्याला स्वत:चं असं मोल नाही. तो सतत स्वत:चं अवमूल्यन करीत गेला. एके काळी रुपयाची किंमत रुपया होती; आता ती पाच पैसे झाली. यावरूनच काय ते ओळखा. पैशाला शब्दाचं मोल नाही. ज्या प्रमाणात पैशाचं अवमूल्यन होत गेलं, त्या प्रमाणात तुमच्या नीतिमत्तेचं आणि माणुसकीचंही अवमूल्यन होत राहिलं आहे. आता तुम्ही दोष कुणाला देणार?''

पैशाच्या नादी लागून माणसं बांडगुळं बनली. ती दुसऱ्याच्या श्रमावर जगू लागतील. आणि त्यातून मिळतं ते पुरेना; म्हणून याच्यावर-त्याच्यावर हात मारत राहतील.

। ५१ ।

कोणतं मत खरं मानायचं? माणसाची उत्पत्ती माकडापासून झाली हे, की माणूस सुरुवातीच्या काळात शिकारी अवस्थेत होता, पशु-पक्षी मारून खात होता, हे?

दोन्ही मतं शास्त्रज्ञांचीच.

पहिलं मत खरं धरलं, तर माणूस शिकारी अवस्थेत जगत होता, हे मत खोटं ठरेल. कारण, माकडं पशु-पक्षी मारून खात नाहीत. माकडं पूर्णपणे शाकाहारी. शाकाहारी असलेल्या माकडापासून ज्याची उत्पत्ती झाली, तो माणूस सुरुवातीच्या काळात तरी शाकाहारीच असायला हवा. नंतरच्या काळात तो बिघडला आणि मांस खाऊ लागला असावा.

माणूस भोळा असतो. कशावरही विश्वास ठेवतो. समाजावर धर्माची सत्ता चालायची, तेव्हा तो धार्मिक क्षेत्रातल्या लोकांवर विश्वास टाकून चालायचा. ते म्हणतील, ते प्रमाण मानून चालायचा. आज समाजावर धर्माची नाही; तर विज्ञानाची सत्ता आहे. त्यामुळे माणूस वैज्ञानिक सांगतील, ते प्रमाण मानून चालायला लागला आहे.

वैज्ञानिकांची मतंदेखील तपासून घेतल्याशिवाय, बुद्धीच्या कसोटीवर घासून घेतल्याशिवाय निमूटपणे मान्य करता कामा नयेत.

। ५२ ।

सिगरेटचा अतिरेक करणारा एखादा माणूस खोकून खोकून बेजार झाला, की डॉक्टरकडे जातो. आणि डॉक्टरकडे गेल्यावर डॉक्टरनं त्याला काय सांगावं?

"सिगरेट सोड, त्याशिवाय तुझा खोकला काही जाणार नाही." असंच ना? पण डॉक्टर हे सांगत नाही. तो त्याला 'ग्लायकोडिन' किंवा असलंच काही तरी सिरप देतो आणि दिवसातून तीन वेळा एक-एक डोस घे, म्हणून सांगतो.

तसंच, घरात बसून राहून कोणाला मधुमेह झाला आणि तो डॉक्टरकडे गेला, तर डॉक्टर त्याला सकाळ-संध्याकाळ एक-एक तास फेरफटका मारून ये, असं सांगत नाही. तर त्याला 'दाओनिल' किंवा असल्याच कसल्या तरी गोळ्या घे म्हणून सांगतो.

खोकल्यावर खरा उपाय आहे सिगरेट सोडणं आणि मधुमेहावर खरा उपाय आहे फेरफटका मारणं.

पण हा उपाय कुणी सांगत नाही.

कारण हा उपाय सांगितला, तर डॉक्टरची डॉक्टरकी चालणार नाही.

असंच काहीसं देशाच्या विकासकार्याच्या बाबतीत चालतं.

एकट्या मुंबई शहरात दर वर्षी पाच लाख माणसं बाहेरून पोटा-पाण्याचा उद्योग शोधायला येतात. या हिशेबानं विसावं शतक संपेस्तोवर मुंबईत एक कोटी ऐंशी लाख लोक होतील, असं म्हणतात. एका दशकाच्या आत म्हणे मुंबईसारख्या शहरांत पृथ्वीवरची निम्मी माणसं येऊन राहतील.

लोक गाव सोडून शहरात येऊन राहायला लागल्यावर शहरांचं काय होणार?

लोकांना राहायला घरं मिळायची नाहीत. लोक झोपडपट्ट्या उभारून राहू लागतील. त्यांची स्वच्छतागृहांची व्यवस्था करता येणार नाही. ते मग वाटेल तिथे घाण करून ठेवतील. घाणीमुळे वेगवेगळे रोग पसरतील आणि त्यांची लागण मोठ्या इमारतींमधून राहणाऱ्यांनादेखील होईल. सगळ्यांना नोकऱ्या मिळणार नाहीत. तरुणांमध्ये चोरा-वाटमाऱ्यांची संख्या वाढेल.

जगात म्हणे आज सुमारे २८० महानगरं आहेत. त्यातही दोन-दोन कोटी लोकसंख्येची महाकाय, अगडबंब शहरं सुमारे २६ आहेत. विसावं शतक संपेस्तोवर म्हणे सगळी मिळून ३९१ महानगरं होतील आणि महाकाय महानगरं चाळीसच्या वर गेलेली असतील. त्यातली तेरा आशिया खंडात आणि ब्राझिलसारख्या दक्षिण अमेरिकेतल्या देशांत वाढलेली असतील.

हे जे काही जगाच्या पाठीवर चाललंय, ते या जगाला कुठे घेऊन जाणार आहे? ते जगाला विनाशाकडे नेणार नाही, असं म्हणता येईल काय? आम्ही 'विकास' करतो आहोत, तो जगाच्या विनाशाकरिता का? त्याच दिशेनं चाललंय आमचं विकासकार्य.

खरं तर व्हायला काय पाहिजे? गावातल्या लोकांना गावातच काम-धंदे मिळायला हवेत. तिथेच त्यांच्या पोटा-पाण्याचा प्रश्न सुटायला हवा. पोटा-पाण्यासाठी शहरात जाण्याचा प्रसंग कुणावरच येऊ नये.

शहरांत जायचं, ते फक्त नावलौकिक मिळवायसाठी; पोटा-पाण्यासाठी नाही.

पण हे घडवून आणायचं, तर अर्थनीतीची दिशा बदलायला हवी. जास्तीत जास्त मालाचं उत्पादन करून त्याची निर्यात करायची आणि फॉरिन एक्स्चेंज मिळवायचं, हे जे आज 'विकासा'चं उद्दिष्ट ठरलं आहे, त्याऐवजी सर्वांना काम देऊन गावांना स्वावलंबी बनवणं, हे 'विकासा'चं उद्दिष्ट समोर असलं पाहिजे. पण त्यासाठी आजच्या जगानं जो मार्ग पत्करला आहे, तो सोडून गांधींनी सांगितलेल्या मार्गानं जाण्याची तयारी केली पाहिजे.

एक गोष्ट विसरून चालणार नाही. विकास म्हणजे वाढ नव्हे. वाढीला दुसरं एक नाव आहे – ग्रोथ. कॅन्सरही एक प्रकारची ग्रोथच आहे; आणि कॅन्सरवर उपाय नाही.

## । ५३ ।

केदारनाथला रात्री पोहोचलो होतो. पिठूर चांदणं पडलं होतं आणि थंडी कडाक्याची. मी धर्मशाळेत तीन कांबळी पांघरून आडवा झालो.

इतक्यात करंदीकर धावत आले.

म्हणू लागले, ''चल, देवळात आरत्या सुरू झाल्या आहेत. भक्तीचा असा उधाणलेला समुद्र तुला कुठेच पाहायला मिळणार नाही... चुकवू नकोस हा अनुभव. पाया पडतो तुझ्या.''

करंदीकर ज्येष्ठ. त्रेसष्ट की चौसष्ट वय. माझं वय त्याहून निम्मंदेखील नव्हतं. त्यांनी माझ्या पाया पडावं, हे कसंसंच वाटलं. विंचवानं नांगी मारताच उसळावं, तसा उठलो आणि शाल पांघरून देवळात गेलो.

दोनशे-अडीचशे माणसं 'जय जगदीश हरे' हे भजन म्हणत नाचत होती आणि केदारनाथाला कवटाळीत होती. घंटानाद सतत चालू होता.

अचानक माझी नजर एका वृद्ध स्त्रीवर जाऊन स्थिरावली. दृष्टीहीन होती ती. तीही वेड लागल्यासारखी टाळ्या वाजवत नाचत होती. ती तिला विचारलं, ''बाई गं, तुला दिसत नसताना एवढा त्रास सोसून इथवर काय पाहायला आलीस?''

''नको दिसू दे मला... त्याला मी दिसते ना? त्याची दृष्टी माझ्यावर पडावी म्हणून मी इथवर आले रे बाळा!'' ती उत्तरली.

नकळतच मी वाकलो आणि तिच्या पावलांना स्पर्श केला.

करंदीकरांचे डोळे भरून आले. त्यांनी मला घट्ट मिठीत घेतलं.

। ५४ ।

हल्ली-हल्लीच तो प्रोफेसर झाला आहे. प्रोफेसर झालो म्हणजे आपल्याला 'ॲब्सेंट माइंडेड' असायलाच हवं, असा त्यानं समज करून घेतलाय. हरवल्या-हरवल्यासारखा चालतो. आपल्याच तंद्रीत असतो. विसराळू, भोवतालची शुद्ध नसल्यासारखा, असा काहीसा.

मी त्याला म्हटलं, ''तू खरोखरीच असा 'ॲब्सेंट माइंडेड' झाला असशील, तर तुझ्या बुद्धीची धार गेली, असंच म्हणावं लागेल. ती निद्राधीन झाली, उबगली, असंच म्हणावं लागेल. प्रोफेसरची बुद्धी नेहमी ॲलर्ट असायला हवी, जागृत असायला हवी; सतर्क असायला हवी.''

त्याला माझा राग आला.

बुद्धी जागृत नसली, की कधी-कधी आपल्या हातून घडू नये, ते घडून जातं. मग 'लक्षातच राहिलं नाही' म्हणून आपण सारवासारव करतो.

निष्काळजीपणानं माणसाच्या हातून होऊ नये, ते होतं.

बुद्धानं म्हटलंय, निष्काळजी राहाल, तर हरवाल; जागरूक राहाल, तर जिंकाल.

बुद्ध असंही म्हणत असे की, चित्त इतकं जागृत ठेवलं पाहिजे, की माणसाला बसताना आपण बसतो आहोत, उठताना आपण उठतो आहोत, याची जाणीव असायला हवी. आपल्याला राग आला असता 'हा पहा, मला राग अनावर झालाय', अशी जागृत जाणीव त्याला व्हायला हवी.

गुप्त हेर एखाद्यावर 'नजर ठेवतो' म्हणजे काय करतो? त्या माणसाला कळू न देता अशा ठिकाणी लपून बसतो, जिथून त्याला त्या माणसाकडे कोण येतंय, कोण येऊन जातंय, सगळं पाहायला मिळावं. याचप्रमाणे माणसानं आपल्या आत असा एक सी. आय. डी. बसवायला हवा, ज्याला आपल्या मनात कोणते विचार येतात, कोणते येऊन जातात, ते जागरूकपणे कळावं. माणसाला स्वतः स्वतःला न्याहाळता यायला हवं. 'लक्षातच राहिलं नाही', हे वाक्यच त्याच्या जिभेवर कधी येता कामा नये.

'ॲब्सेंट माइंडेड' राहून माणूस मोटार किंवा स्कूटर चालवायला लागला, तर त्याचा ॲक्सिडेंट झाल्याशिवाय राहणारच नाही. 'ॲब्सेंट माइंडेड' राहून

माणूस दुकान चालवू लागला, तर त्याचा व्यापार बुडालाच म्हणून समजावं. 'ॲब्सेंट माइंडेड' राहून आपण देशाचं रक्षण करू, असं जर आपली सेना म्हणू लागली, तर देश शत्रूच्या हातीच जाणार.

'ॲब्सेंट माइंडेडनेस' म्हणजे हलगर्जीपणा आणि हलगर्जीपणा म्हणजे प्रमाद. आणि *'प्रमादो मच्चुनो पदम् ।'* प्रमाद म्हणजे मरण. निष्काळजीपणा कुठेच चालू देता कामा नये. हलगर्जीपणानं माणसानं कोणतंच काम करता कामा नये.

काहींना 'आठवण राहत नाही.' एखादा माणूस, मी अमुक वेळेला येतो, असं सांगूनही येत नाही, तेव्हा तो माझा अपमान करतोय, असं मला वाटतं. मग मला त्याचा राग येतो. आणि 'आठवण राहिली नाही म्हणून येऊ शकलो नाही', असं जेव्हा कुणी सांगतं, तेव्हा तर इतकी तिडीक जाते डोक्यात, की त्याचं श्रीमुख रंगवावंसं वाटतं; किंवा त्याला 'टाडा' लावून त्याची तुरुंगात रवानगी करावी, असं वाटतं.

'आठवण राहिली नाही', हे हलगर्जीपणाचं एक लक्षण. त्याचा 'कॉग्निझिबल ऑफेन्स'मध्ये समावेश करायला हवा.

। ५५ ।

कोणाची ते विसरलो; पण एक कथा वाचनात आली होती.

एक होता पक्षी. खूप उडायचा. अगदी उंच-उंच जायचा. पण उडताना त्याची नजर कायम जमिनीवर असायची.

एक दिवस तो नेहमीप्रमाणे उडत-उडत उंच गेला. अचानक त्याला खाली एक गाडा दिसला – वाळवीनं भरलेला. गाडेवाल्यानं वाळवीचे किडे गाड्यात भरून आणले होते. तो पक्ष्यांना मोठ्यानं हाक मारून म्हणत होता – "एक पीस द्या, दोन किडे घ्या."

त्या पक्ष्याला वाळवी खूप आवडायची.

खाली उतरून तो एका झाडाखाली येऊन बसला. त्यानं गाडेवाल्याला विचारलं, "वाळवी कशी दिली?"

"एका पिसाला दोन किडे." गाडेवाला म्हणाला.

पक्ष्यानं आपल्या पंखातलं एक पीस ओढून काढलं, ते गाडेवाल्याला दिलं, दोन किडे घेतले आणि तो फुर्र्रकन उडून गेला.

त्या दिवसापासून पक्षी दररोज एक पीस देऊन दोन किडे घेऊ लागला. तो नेहमी गाडेवाल्याची वाट पाहत बसू लागला. तो दिसला, की हा खाली यायचा,

पंखातलं एक पीस काढायचा, ते गाडेवाल्याला द्यायचा आणि त्याच्याकडून दोन वाळवीचे किडे घेऊन उडून जायचा.

हे पाहून पक्ष्याच्या बापाला वाईट वाटायचं. एक दिवस बाप पक्ष्याला म्हणाला, ''बाळा, वाळवी हे काही आम्हा पक्ष्यांचं मुख्य अन्न नव्हे. धरतीवर तऱ्हे-तऱ्हेचे किडे असतात. काही आकाशातून उडणारेही असतात. सगळीकडे ते मिळतात. असं असताना एकट्या वाळवीच्या नादाला लागणं बरोबर नाही. शिवाय, वाळवीचे किडे कितीही गोड लागले, म्हणून पिसं देऊन ते घेणं त्याहूनही चुकीचं. आम्हा पक्ष्यांचं खरं भांडवल म्हणजे आपले पंख. ते असतात; म्हणून आपल्याला उडता येतं...''

''छे!'' पक्षी बापाला म्हणाला, ''तुम्ही जुन्या पिढीतले पक्षी. जुन्या विचारांचे. वाळवीचे किडे म्हणजे काय चीज आहे, हे तुम्हाला काय कळणार?''

बाप म्हणाला, ''बाळा, एक दिवस तुझ्यावर पश्चात्तापाची वेळ येईल. बघशील तू.''

पण पक्ष्याला वाळवीची चटक लागली होती. वाळवीचे किडे खायला लागल्यापासून तो दुसरे कुठचेच किडे चोचीत धरीनासा झाला होता. कोणतं फळदेखील खाईनासा झाला होता.

एक-एक करत पक्ष्याच्या पंखांतली पिसं कमी होत गेली. त्याला पूर्वीसारखं उडता येईनासं झालं. थोडासा उडाला, की तो थकून जायचा. मग तो एखाद्या फांदीवर बसून राहायचा. बाकीचे पक्षी उंच-उंच उडत जायचे आणि हा त्यांना फक्त बघत राहायचा. मग त्यानं स्वत:साठी एक तत्त्वज्ञान रचलं – उडण्यात काय अर्थ आहे? उडून-उडून यांना असं काय मिळतं? एखाद-दुसरा किडाच ना?... मूर्ख कुठचे! एक पीस दिलं, की दोन किडे मिळतात. तेही वाळवीचे. मग उडायची गरजच काय?

मित्र त्याला म्हणायचे, ''बाबा रे, एक दिवस पश्चात्ताप होईल तुला.''

पण हा ऐकतोय कशाला? हळूहळू त्याला उडता येईनासं झालं. एका झाडावरून दुसऱ्या झाडावर जेमतेम उडता यायचं, तेही आता जमेना. त्यातल्या त्यात एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर जाता यायचं, तेवढंच. त्यापलीकडे काही जाता येईना.

एक दिवस गाडेवाला आला नाही. पक्ष्यानं दिवसभर वाट पाहिली. त्या दिवशी त्याला उपाशी राहावं लागलं. दुसरा दिवस उजाडला. त्याही दिवशी गाडेवाला आला नाही. तिसऱ्या दिवशीही आला नाही. पक्षी कंटाळला. म्हणायला लागला – ''गेला उडत गाडेवाला. मीच वाळवीचे किडे शोधून आणतो.'' तो

खाली उतरला. थोडं पुढे गेला. पुढे त्याला वाळवीची एक मोठीच्या मोठी वसाहतच दिसली. तीन दिवसांचा उपाशी होता तो. किडे दिसताच पटापट खात सुटला. मग त्याला एक विचार सुचला. त्यानं किडे जमा करून ठेवायचे, असं ठरवलं. एक गाडा भरेल, इतके किडे त्यानं जमवले.

चौथ्या की पाचव्या दिवशी त्याला गाडेवाला येताना दिसला. पक्ष्याला आनंद झाला. त्यानं गाडेवाल्याला विचारलं, ''बाबा रे, होतास कुठे तू इतके दिवस? तुझी वाट पाहून-पाहून मी थकून गेलो. आता बघ, मी किती किडे जमवलेत ते.''

गाडेवाला म्हणाला, ''चांगलं केलंस.''

''आता हे सगळे किडे तू घे आणि माझी पिसं मला परत दे.''

गाडेवाला खो खो हसायला लागला. म्हणाला, ''मी किडे देऊन पिसं घेतो. पिसं देऊन किडे घेत नाही. समजलं?''

पक्षी चडफडला. काय करावं, त्याला कळेना. सुखापायी आपण आपलं स्वातंत्र्य गमावलं, याचा त्याला पश्चात्ताप झाला. इतक्यात कुठून तरी एक बोका आला आणि त्यानं पक्ष्यावर झडप घातली. पक्ष्यानं प्राण गमावला.

। ५६ ।

गोव्यातल्या ओपिनियन पोलच्या काळातली – सार्वमताच्या काळातली – गोष्ट. एका गावी एका मित्राला भेटायला गेलो होतो.

चिंचेपाशी पोचून बस थांबवली आणि उतरलो. मित्राचं घर तिथून तीन किलोमीटर अंतरावर. चालत जावं लागायचं.

तासभर बसून परत निघालो, तेव्हा मित्र मला सोडायला चिंचेपर्यंत आला. येताना त्यानं त्याच्या पाच वर्षांच्या नातवाला बरोबर घेतलं होतं. मी म्हटलं, ''तू पोचवायला आलास, ते ठीक आहे. पण या बिचाऱ्याला कशाला आणलंस?''

''त्याच्यासाठीच तर आलो.'' मित्र म्हणाला, ''पाहुण्याचा मान कसा राखायचा, हे त्याला कळायला नको?''

। ५७ ।

काही जणांचा कशावरही विश्वास असतो. भुतं, खेतं, देवचार, म्हारू, भगत, घाडी, राहू, केतू, मंगळ, शनी, कशावरही.

या विश्वासाला ते श्रद्धा म्हणतात.

नीट विचार न करता, अनुभव न घेता, आपण जी गोष्ट मानतो, तिला श्रद्धा नव्हे; अंधश्रद्धा म्हटलं पाहिजे.

ईश्वर आहे की नाही, आम्हाला माहीत नाही. काहीजण म्हणतात, आहे. म्हणून 'आहे' असं म्हणायचं. नाहीच, असं माझ्याच्यानं म्हणवत नाही. खात्री नसताना, अनुभव नसताना, त्याच्या अस्तित्वावर अविश्वास तरी कसा दाखवणार? अंधश्रद्धेइतकीच अंध-अश्रद्धाही आंधळी! माझं मन म्हणतं म्हणून अनुभव नसताना एखादी गोष्ट मानायची, याला काही जण श्रद्धा म्हणतात.

जगात पहिल्या प्रकारचे श्रद्धावंत पावलोपावली सापडतात. दुसऱ्या प्रकारचे क्वचित कुठे-कुठे पाहायला मिळतात.

पण श्रद्धेचा आणखी एक प्रकार असतो–

समाजात असत्याचा कितीही बोलबोला असू द्या, अंती सत्याचाच विजय होणार. असत्याच्या मार्गानं मला कितीही लाभ होणार असो, मी सत्याचा मार्ग सोडणार नाही. असत्य कितीही उच्छाद मांडो, सत्याच्या विरोधात कितीही पुरावे दिले जावोत, मी सत्य सोडणार नाही म्हणजे नाहीच. अंती सत्यच विजयी होणार, मी सत्य सोडणार नाही, अशी श्रद्धा बाळगणारे काही लोक समाजात पाहायला मिळतात. समाज अजून चालतो आहे, तो अशा श्रद्धावंतांमुळे.

लोकांची हीच श्रद्धा वाढवायला हवी. दृढ करायला हवी – आपण स्वतःच वाढवून, दृढ करून.

। ५८ ।

करू नये असलं काही माणसानं केलं, की आपण म्हणतो, "तुला हे शोभलं नाही हं!" म्हणजे आपण नीतिमत्तेकडे सौंदर्याच्याच दृष्टीतून पाहतो, असा याचा अर्थ झाला.

नीतिमत्ता हे सौंदर्याचंच दुसरं नाव आहे.

। ५९ ।

आदर्श जोडपं कोणतं? भारतीय संस्कृतीच्या मते राम-सीता, सत्यवान-सावित्रीसारखं. सीतेनं आपलं व्यक्तिमत्त्व रामाच्या व्यक्तिमत्त्वातच विरघळवून टाकलं होतं. सावित्रीनंही तेच केलं होतं. तिलाही स्वतंत्र अस्तित्व नव्हतं. ती तिच्या पतीशी एकरूप झाली होती.

पती कधी पत्नीशी एकरूप, एकजीव झालाय का? पत्नीच्या आदर्शांनुसार चालतोय, असा एक तरी पती पाहायला मिळेल का?

पत्नीनं पतीशी एकरूप व्हावंच. पतीनंही पत्नीशी एकरूप, एकजीव व्हावं. असे पति-पत्नी असतील, तेव्हा ते जोडपं आदर्श, असं म्हणता येईल.

पती शारीरिकदृष्ट्या पत्नीपेक्षा शक्तिशाली. शिवाय कमावणारा तोच. घरातही त्याचीच सत्ता चालणार. ठीक आहे. पण स्त्री संसार चालवते, घर सांभाळते, मुलांना वाढवते, ही तिची जबाबदारीही कमी मोलाची नाही. जोपर्यंत तिच्या या जबाबदारीचं महत्त्व पतीला कळणार नाही, तोपर्यंत पति-पत्नी समानता अस्तित्वात येणार नाही.

समानता आल्याशिवाय एकतानता येणार नाही. ही एकतानता पत्नीनं पतीच्या व्यक्तिमत्त्वात स्वत:ला विरघळवून टाकून येणार नाही.

दोघांनी एक व्हायला हवं खरं; पण एक होऊनही दोघांची व्यक्तिमत्त्वं स्वतंत्र राहायला हवीत.

। ६० ।

लोहियांना रामाची चीड. सीतेमुळे जास्तच. एका धोब्यानं तिच्या चारित्र्याचा संशय घेतला; म्हणून रामानं तिला वनात नेऊन सोडलं, हे रामाचं कृत्य त्यांना अजिबात पटलं नव्हतं. तिची अग्निपरीक्षा घेतली, हे तर आणखीच संताप आणणारं कृत्य वाटायचं त्यांना. ते म्हणत, ''आपण प्रजातंत्रानं चालणारा राजा आहोत, हेच दाखवून द्यायचं होतं नं त्याला? मग त्यासाठी दुसरा कोणताच उपाय सुचला नाही त्याला? दुसरा उपाय होता – राज्यत्याग करायचा आणि सीतेला घेऊन पुन्हा वनात जायचं.''

पातिव्रत्याचा जो दाखला आपल्या देशात स्त्रियांना दिला जातो, त्यानंदेखील लोहिया उसळून उठत. पातिव्रत्याचं आणखी एक प्रतीक म्हणजे सावित्री. यमाकडे जाऊन तिनं सत्यवानाचे प्राण परत मागून आणले; म्हणून तिचं गुणगान गायिलं जातं या देशात. लोहिया विचारत, ''यमाकडे जाऊन पत्नीचे प्राण मागून घेऊन येणाऱ्या एका तरी पत्नीव्रती माणसाचा दाखला देता येतो का तुम्हाला?''

भारतीय माणसानं सीता-सावित्रीच्या कथा रचून भारतीय स्त्रीला मनानं पतीची गुलाम करून टाकलंय. तिला या गुलामगिरीतून मुक्त करायचं असेल, तर सीता-सावित्रीचा नव्हे; द्रौपदीचा दाखला द्यायला पाहिजे, असं लोहिया म्हणत.

'सावित्री की द्रौपदी?' असा वाद त्यांनी सुरू केला होता.

द्रौपदी एक तेजस्वी स्त्री. तिच्याशिवाय महाभारताचं एकही चक्र फिरत नाही. ज्या ज्या वेळी कोणत्याही पांडवानं तिला आपली संपत्ती मानायचा प्रयत्न केला, त्या त्या वेळी ती उसळून उठली. मी तुमची गृहलक्ष्मी आहे; दासी नव्हे, हे तिनं सर्वांना दाखवून दिलं. राजसभेत तिला ओढून आणण्यात आलं, तेव्हा तिथल्या वयोवृद्धांना तिनं जे प्रश्न विचारले, ते पाहून लोहिया म्हणतात – "हम कह सकते हैं कि पुरुष के प्रभुत्व पर इतना कड़ा प्रहार किसीने भी आज तक नहीं किया। व्यवस्था के तमाम नियामकों की उपस्थिति में अपने पक्ष को जितनी ताकत के साथ द्रौपदी ने रखा था, शायद उसके समकक्ष दुसरा उदाहरण आज तक के लिखित-अलिखित इतिहास में उपलब्ध नहीं है।"

द्रौपदीपुढे सगळे माना खाली घालून बसले होते. कुणाच्याचकडे तिच्या प्रश्नांची उत्तरं नव्हती. एक विलक्षण तेजस्वी स्त्री म्हणून, लोहिया द्रौपदीचं उदाहरण भारतीय स्त्रियांपुढे ठेवू पाहत होते.

भारतीयांचा स्त्रीविषयक दृष्टिकोनच बुरसटलेला. ते तिची दासी म्हणून तरी संभावना करतील; नाही तर तिला देवी तरी ठरवून टाकतील. स्त्री ही पुरुषाच्या बरोबरीची होय, हा विचार या देशात सर्वप्रथम मांडला, तो महात्मा गांधींनी. त्यानंतर लोहियांनी. बाकीचे सगळे एक तर पूर्वजांचाच कित्ता गिरवणारे; नाही तर युरोप-अमेरिकेचे शिष्य. मौलिक विचारच होऊ शकत नाही या देशात. अगदी कोणत्याही क्षेत्रांत.

। ६१ ।

निर्मळ चारित्र्याचा म्हणून कुणाचीशी ख्याती ऐकली.

"म्हणजे कसा?" मी विचारलं.

"रामासारखा एकपत्नीव्रती." तो म्हणाला. "कुणाही बाईकडे वाकड्या नजरेनं न पाहणारा, असा."

मला हसू आलं. या माणसाला सत्ताधाऱ्यांपुढे शेपटी हालवत उभं असलेलं अनेकदा मी पाहिलं होतं. सत्ताधाऱ्यांकडून एखादं हाडूक मिळावं; म्हणून तो किती खालच्या पातळीवर उतरायचा, तेही पाहिलं होतं.

मी म्हटलं, "असल्या चारित्र्याला कसलं आलंय मोल? फक्त सेक्सच्या बाबतीत माणूस निर्मळ असला, म्हणजे तो चारित्र्यवान होत नसतो. चारित्र्यवान माणसात इतरही अनेक गुण असावे लागतात."

पहिली गोष्ट म्हणजे, माणूस शब्दाचा पक्का असावा लागतो. दिलेला शब्द

त्यानं पाळला पाहिजे. तो कुणाला कधीही फसवणार नाही. दुसऱ्याच्या दुबळेपणाचा कधी लाभ घेणार नाही. एखादा त्याच्या हाती लाखो, कोट्यवधी रुपये देईल; पण तो त्यातल्या एकाही रुपयाला हात लावणार नाही. तो व्यवहारात चोख असेल. दुसरी गोष्ट – तो न्यायप्रिय असायला हवा. चुकीचं प्रायश्चित्त घेण्याची तयारी त्यानं दाखवली पाहिजे. तिसरी गोष्ट – हाती घेतलेलं काम तो मध्येच सोडून देणार नाही. अडचणींना धीरानं तोंड देईल आणि घेतलेलं काम पुरं करून दाखवील. ऊन-वारा-पाऊस सोसायची, श्रम करायची, कष्ट उपसायची, बारीक-सारीक गोष्टींकडे लक्ष पुरवण्याची ताकद त्याच्यात असायला हवी. चौथी गोष्ट – तो विवेकशील असावा. चांगलं-वाईट पारखून घेण्याची आणि वाईट ते सोडून देऊन चांगलं ते निवडण्याची क्षमता त्याच्या ठायी असायला हवी. अनुभव आणि कल्पना, तसंच कल्पना आणि आदर्श यांतला फरक कळण्याइतकी त्याची बुद्धी कुशाग्र असायला हवी. पाचवी गोष्ट – कितीही मोठी पदवी मिळो, कितीही मोठा बहुमान लाभो, कितीही सत्ता त्याच्या हातात येवो, आपल्यापेक्षा मोठी माणसं जगात अनेक आहेत, काही जणांच्या तर पायतळीच्या धूलिकणांइतकीही आपली योग्यता नाही, याची जाणीवही त्याला असायला हवी. समोरचा माणूस वयानं, पदानं कितीही लहान असो, त्याच्यापुढे त्याला विनम्र होता आलं पाहिजे. सहावी गोष्ट – त्याला अन्यायाची आणि असत्याची चीड असली पाहिजे. अन्याय आणि असत्य चालवून घेणारा माणूस कितीही मोठा असो, त्याला शिंगांवर घेण्याची ताकद त्याच्यात असायला हवी. सत्यासाठी तो अवघ्या जगाशी लढायला उभा ठाकेल. सत्य बोलताना कधीच कुणाचं भय बाळगणार नाही. कटू सत्य बोलताना जराही कचरणार नाही. तो धैर्यशाली असेल. दुःखं, संकटं, अरिष्टं कोसळली, तरी तो सैरभैर होणार नाही; 'पॅनिकी' होणार नाही. आणि सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे, तो स्वाभिमानी असला पाहिजे, कुणाच्या धमकीला भीक न घालणारा, कोणत्याही लाभासाठी सत्ताधाऱ्यांपुढे लांगूलचालन न करणारा, हांजी हांजी न करणारा. चारित्र्यात या आणि अशा अनेक गुणांचा समावेश होतो. लैंगिक संबंधाबाबत निर्मळ तोच काय तो चारित्र्यवान, असं म्हणणं योग्य नव्हे. त्या बाबाला हवं तर सोवळा म्हणावं.

। ६२ ।

काही माणसं अगदी 'तत्त्वा'ची असतात. दुसऱ्याला ती नेहमी तत्त्वंच सांगत असतात.

त्यात त्यांचा दोष नाही. एकादं तत्त्व एखाद्याला पटलेलं असलं, की ते त्याला स्वस्थ बसू देत नाही, दुसऱ्यांनाही ते तत्त्व समजावून सांग, असा त्याच्यामागे लकडा लावतं; आणि जोपर्यंत तो माणूस ते दुसऱ्यांना सांगत नाही, तोपर्यंत त्याचं समाधान होत नाही. पण होतं वेगळंच. दुसरे त्याची परीक्षाच घेऊ लागतात. आपल्याला हा जे सांगतो आहे, ते तो स्वत: कितीसं आचरणात आणतो, हे पाहू लागतात; आणि मग कुठे तरी त्यांना त्याच्यात उणीव दिसते. मग 'हा साला आम्हाला तत्त्वं सांगतो... पहिल्यांदा तूच ती पाळून दाखव,' असं म्हणून ते त्याला नापास करतात.

आणि स्वत: वागत आले, तसेच वागत राहतात.

समजा, लोकांच्या या परीक्षेत तत्त्व सांगणारा पास झाला; 'बोले तैसा चाले' असं दिसून आलं तर, ''तू कुठे आणि आम्ही कुठे? तुला जमलं म्हणून आम्हाला जमणार आहे होय? तू महात्मा... तू काही चारचौघांसारखा नव्हेस.'' अशी ते त्याची स्तुती करतात. ''आहे खरा. माणूस मोठा बरं का!'' असं मोठ्या तोंडानं म्हणतातही. पण म्हणून तो सांगतो, तसं वागतील म्हणता? नाव नको. त्यांचं आपलं चालत आलंय, तसंच चालू राहतं.

चाळीस वर्षांवर घालवलेल्या सामाजिक जीवनात मी एक गोष्ट शिकलो. सुधारकानं, आपण चारचौघांपेक्षा वेगळे आहोत, असं चुकूनसुद्धा भासवू देऊ नये. इतरांसारखेच आपणही दुबळे, स्खलनशील माणूस आहोत, असं त्यानं इतरांना जाणवून देत राहिलं पाहिजे. 'आपण वागतो, तसं वागणं बरोबर नाही. अमुक रीतीनंच वागलं पाहिजे. तसं वागलं, तर आपलंही भलं होईल; दुसऱ्याचंही भलं होईल', असं सांगत राहिलं पाहिजे. म्हणजे मग लोक थोड्या-बहुत प्रमाणात तरी त्याच्या संगतीनं त्याच्यासारखं वागू लागतील. इतरांच्या बरोबर राहूनच सुधारणा घडवून आणता येतात. दुसऱ्यांपासून फटकून राहून आणि 'माझ्यामागून चला', असं सांगून सुधारणा होत नसतात.

। ६३ ।

ऋषिपुत्राला राग येतो. रागाच्या भरात तो शाप देतो. शाप देताच त्याला पश्चात्ताप होतो. आपण उगीचच शाप दिला, असं त्याला वाटतं आणि तो म्हणतो, ''काय करू? तोंडून शाप तर निघून गेला. मी जन्मात कधी खोटं बोललो नाही; त्यामुळे माझ्या तोंडून निघालेले उद्‌गार कधी व्यर्थ ठरणार नाहीत. त्याला शाप तर लागणारच. मला आता एकच करता येईल – उ:शाप देऊन त्याला शापमुक्त करायचं.''

पुराणात असल्या किती तरी कहाण्या सापडतात.

ज्याच्या तोंडून कधी असत्य वचन बाहेर पडलं नाही, त्याच्या तोंडून निघालेले उद्‌गार कधी खोटे ठरणार नाहीत. ते खरेच होणार. केवढा हा विश्वास या लोकांचा सत्यावर!

कोणाचा शब्द व्यर्थ जात नाही? - *केषां अमोघ वचनम्?* शंकराचार्य विचारतात आणि त्याचं उत्तर देतात, जो सदैव खरे बोलत आला, त्याचा. जो गरज पडल्यावरच बोलतो, त्याचा. जे बोलतो, ते मोजून-मापून बोलतो, त्याचा. बोलताना जो राग-लोभासारखे अवगुण आडवे येऊ देत नाही, त्याचा. अशाच माणसाचे शब्द कधी व्यर्थ जात नाहीत. ते अमोघ असतात. ते खरे होतातच होतात. आपल्या देशात वाचाशुद्धीला एवढं महत्त्व होतं.

ही जिह्वेची शक्ती. या शक्तीचा नीट काळजीपूर्वक उपयोग केला, तर जगात परिवर्तन घडवून आणण्यासाठी शस्त्रांची, अस्त्रांची, कसलीच गरज भासणार नाही.

। ६४ ।

कुणीसं म्हटलंय, माणूस जन्माला येताना मोकळा असतो; पण जन्मानंतर त्याच्या हाता-पायांत तऱ्हेतऱ्हेच्या बेड्या पडतात – काही लोखंडाच्या, काही रुप्याच्या, काही सोन्याच्या. कसल्या का असेनात; पण त्या बेड्याच. या बेड्या त्याला बंदिवान करतात; गुलाम करतात.

चारी दिशांनी फिरून या, तुम्हाला सर्वत्र गुलामच गुलाम पाहायला मिळतील. शिष्य गुरूंचे गुलाम, गुरू राजांचे गुलाम, राजा धर्माचा गुलाम, धर्म रूढींचा गुलाम.

जिब्रानचं एक गद्य-काव्य वाचलं होतं. अजून थोडं-फार लक्षात आहे. तो म्हणतो – मी जगात सर्वत्र आंधळी गुलामगिरी पाहिली – माणसाला पूर्वजांनी सांगितलेल्या कर्मकांडात जखडून ठेवणारी गुलामगिरी, जुने-पुराणे रीति-रिवाज त्याला पाळायला लावून त्याच्या तरुण देहात मरतुकडे आत्मे भरणारी गुलामगिरी. मी सर्वत्र मुकी गुलामगिरी पाहिली – ज्याचं दर्शनही नको वाटावं, अशा पुरुषाला एका स्त्रीचं जीवन अर्पण करायला लावणारी गुलामगिरी; आणि तिला नको असतानाही मुकाट्यानं आपलं शरीर त्याच्या वासनेच्या स्वाधीन करणारी गुलामगिरी पाहिली. मी जगात सर्वत्र बहिरी गुलामगिरी पाहिली – माणसाच्या कानांत बोळे कोंबणारी आणि त्याच्या मेंदूची कवाडं घट्ट बंद करून घेणारी, आत मोकळ्या विचारांच्या वाऱ्याला मज्जाव करणारी. मी विद्रूप गुलामगिरी पाहिली – माणसाची मान सुलतानाच्या मुठीत देऊन त्या माणसाला उठाबशा काढायला लावणारी. मी थोटी गुलामगिरी

पाहिली – श्रीमंत अडाण्यांच्या घरी निष्पाप मुलांना जन्माला घालून त्यांना भ्रष्ट, अपराधी बनवून लोकांच्या डोक्यावर बसवणारी. मी पालथी गुलामगिरी पाहिली – शिंदळकीचं बुद्धिमत्ता म्हणून कौतुक करणारी, पोकळ बडबडीला ज्ञान समजणारी, दुबळेपणाला विनम्रता म्हणणारी आणि भेकडपणाला सदाचार मानणारी. याचप्रमाणे पांगळी, उधळी अशी तऱ्हेतऱ्हेची गुलामगिरी पाहून मी थकून गेलो, अंग मोडून आलं. तेव्हा मी युगां-युगांच्या गह्वरांत एकटाच शिरलो आणि अंत आणि पार नसलेल्या दुःखांनी भरलेल्या नदीकाठी पोचलो. तिथे मध्यरात्रीच्या नासक्या चांदण्यात मी एका मरतुकड्या स्त्रीला पाहिलं. ती चंद्राकडे डोळे लावून बसली होती. मी तिच्या पुढ्यात उभा राहिलो आणि तिला विचारलं, "बाई गं, कोण तू?... तुझं नाव काय?"

"माझं नाव स्वतंत्रता." ती म्हणाली.

"तुला मुलं नाहीत?"

"आहेत की!"

"कुठे आहेत ती?"

डोळ्यांतली आसवं पुसत ती म्हणाली, "एकाला या चांडाळांनी क्रुसावर चढवलं, दुसरा वेड लागून मेला; आणि तिसरा अजून जन्मालाच आलेला नाहीय."

। ६५ ।

आज आणि उद्या यांच्यामधलं अंतर, सामान्य माणसाच्या दृष्टीनं फक्त एक दिवसाचं. कारण सामान्य माणसाचा उद्याचा दिवस हा त्याच्या आजच्या दिवसासारखाच असणार.

पण कर्तृत्ववान माणसाच्या दृष्टीनं आज आणि उद्या यांच्यामधलं अंतर खूप मोठं असतं. पेरल्याशिवाय उगवत नाही, या नियमानुसार त्याला उद्या ज्या पिकाची कापणी करायची असते, त्याची पेरणी तो आज करत असतो.

म्हणून त्याच्या दोन दिवसांदरम्यान अंतर पडतं ते –

१. यत्नाचं, २. श्रद्धेचं, ३. निष्ठेचं.

। ६६ ।

मला एक सवय होती. जिथे जायचो, तिथला एक लहानसा दगड घेऊन घरी यायचो. मी अशा प्रकारे किती तरी दगड जमा केले होते.

परवा वाराणसीला पोहोचलो. वाराणसीलादेखील एक राजघाट आहे. तिथे सर्व-सेवा-संघाच्या कॉलनीत एका मित्राकडे राहिलो. माझा हा मित्र जैन; पण बुद्धाचं त्रिपिटक कोळून प्यायलाय. तसाच, हिंदूंच्या धर्मशास्त्रांचाही त्याचा सखोल अभ्यास आहे. चार दिवस त्याच्याकडे राहिलो. त्यानं मला सगळीकडे फिरवून आणलं. अनेकांशी माझ्या ओळखी करून दिल्या. बाहेर पडलो, त्या दिवशी पहाटे दशाश्वमेध घाटावर जाऊन गंगेत स्नान केलं. म्हटलं, पुन्हा कधी यायला मिळेल, कुणास ठाऊक! याच खेपेस शेवटची डुबकी मारून घेतलेली बरी. स्नान करून घाटाच्या पायऱ्या चढलो. मला एक लहानसा गुळगुळीत दगड दिसला. उचलला आणि खिशात टाकला. मित्र म्हणाला, ''काल सारनाथलाही तू असाच तिथला दगड उचललास... तू दगड का जमा करतोस?''

''खूप जमवलेत मी.'' मी म्हटलं. ''जिथे जिथे जातो, तिथला एक दगड घेऊन येतो... आता म्हातारपण आलं. आतापर्यंत फिरलो, तसं यापुढे फिरणं जमणार नाही, असं वाटतं. म्हणून मी आता एक बेत केलाय. माझ्या घरापुढे कलमी आंब्याचं एक झाड आहे. त्याला एक पार बांधून घेईन म्हणतो. जमवलेले सगळे दगड त्या पारात घालून त्यावर एक फरशी बसवायची आणि तिच्यावर *'यत्र भारतम् भवति एक नीडम्'* अशी अक्षरं कोरून घ्यायची, असं म्हणतो... संध्याकाळी तिथे जाऊन बसेन आणि पाहिलेल्या सगळ्या ठिकाणांच्या आठवणी काढत राहीन...''

मित्र हसला. म्हणाला, ''जवाहरलाल नेहरूंनाही अशीच सवय होती. अलाहाबादच्या त्यांच्या आनंद भवनात त्यांनी जमवलेले किती तरी दगड मी पाहिले आहेत.''

''असं?'' मला आश्चर्य वाटलं. ''मला नव्हतं माहीत.''

घाट चढून घरी जायला म्हणून एका रिक्षात बसलो. तो म्हणाला, ''वाराणसीतली मातीच नव्हे; तर मातीचं भांडंदेखील वाराणसीबाहेर नेऊ नये, असा एक नियम आहे. माहीत आहे तुला?''

''नाही. कोणी केला हा नियम?''

''शास्त्रांनी...''

''का?''...

त्यावर उत्तर द्यायच्याऐवजी त्यानं मला प्रश्न केला. ''तू पावापुरीला गेलायस?''

''नाही.''...

''जैनांचं एक तीर्थस्थळ आहे ते... तिथे एक मोठं ऐसपैस तळं आहे आणि तळ्यात एक देऊळ आहे. 'जल-मंदिर' म्हणतात त्याला... त्याची एक आख्यायिका

आहे. महावीरांचा अंत्यसंस्कार त्याच ठिकाणी झाला. अंत्यसंस्काराच्या वेळी माणसंच नव्हे; तर देव, यक्ष, गंधर्व, किन्नरही आले होते. आलेल्या सर्वांनी जाताना एक-एक चिमूट माती आपल्याबरोबर नेली. त्यामुळे तिथे एक मोठा खळगा तयार झाला. मग या खळग्यात एक झरा फुटला आणि त्याचं हे तळं झालं.''

पावापुरीची ही आख्यायिका सांगून तो पुढे म्हणाला, ''अनेक युगं उलटली. वाराणसी हिंदूंचं एक तीर्थस्थळ म्हणून मान्यता पावलं. आयुष्यात एकदा तरी वाराणसीत यावं, काशी-यात्रा करावी, असं युगानुयुगं हिंदूंना वाटत आलंय. त्यामुळे वर्षानुवर्ष लाखो लोक इथे येतात आणि गंगेत स्नान करून पावन होऊन घरी परततात. नऊ खंड पृथ्वी; तर दहावा खंड काशी, असा या स्थळाचा महिमा... भारतवर्षात जितके धर्मविचार उदयाला आले, ते सारे या स्थळी येऊन राहिले... आपला सर्वोदयदेखील आता इथे येऊन राहिला आहे... समज, इथे येणाऱ्या प्रत्येकानं इथली चिमूट-चिमूट माती आपल्याबरोबर नेली, तर हे स्थळ शिल्लक तरी राहील का? ते गंगेत बुडून नाही जायचं?''

मला पटलं, मी लगेच खिशात हात घातला आणि दगड काढून वाटेतच टाकून दिला.

त्याला वाईट वाटलं. तो म्हणाला, ''तू दगड टाकून द्यावास, म्हणून मी तुला हे सांगितलं नाही.''

''मला माहीत आहे.'' मी म्हणालो, ''हा दगडच नव्हे; तर त्याबरोबर दगड जमा करायची सवयही मी आज टाकून दिलीय... काशीत माणसानं काही तरी सोडून द्यावं, असं म्हणतात नं? मी आज कित्येक वर्षांची दगड जमा करायची माझी सवय सोडून देतो...''

कित्येक वर्षांची माझी एक सवय या खेपेच्या माझ्या काशी-यात्रेत मी सोडून दिली.

। ६७ ।

माणसात एक पशू असतो, तसा त्याच्यात एक देवही असतो. त्याच्यातला देव त्याला दाखवून न देता फक्त पशू दाखवून देणं, ही चूक. त्याच्यातला देव दाखवून देताना त्याच्यातला पशू दाखवून न देणं, ही त्याहून मोठी चूक. दोन्ही बाबतींत त्याला अज्ञानात ठेवणं, ही सर्वांत मोठी चूक. त्याला त्याच्यातल्या पशूचीही ओळख करून द्यायला हवी आणि त्याच्यातल्या देवाचीही. तेव्हाच आपल्याला कुठून कुठे जायचं आहे, हे त्याचं त्याला कळेल.

। ६८ ।

कुणालाही देता येईल, अशी एक वस्तू आपल्याकडे असते. कोणती? एक कवी म्हणतो, 'a smile.' एक हसू. दारी कुणीही आलं, तर हसतमुखानं त्याचं स्वागत करा. त्याच्याशी हसून बोला. अशा प्रकारे त्याच्या काळजाला तुम्ही स्पर्श करू शकाल. तुमचं काही कमी होणार नाही, की काही जाणार नाही; पण ते देऊन तुम्ही आतून श्रीमंत व्हाल. 'A smile costs nothing but gives much. It enriches those who receive without making poorer those who give.' एक वेगळ्याच प्रकारचं गणित आहे हे. देऊन लाखो पटींनी घेण्याचं. आपला फक्त एक क्षण खर्च होतो, फक्त एक क्षण; पण ज्याला तुम्ही तो दिलात, त्याच्याकडे तो संपूर्ण आयुष्यभर टिकून राहतो. 'It takes but a moment, but the momory of it lasts forever.' तो क्षण देऊन गरीब झाला, असा जगात कुणीही नाही; आणि ज्याला त्याची गरज भासली नाही, इतका श्रीमंतही जगात कुणी नाही; 'No one is so rich or mighty that he can get along without it. And no one is so poor that he can't be made rich by it.' हसू घरातलं वातावरण प्रसन्न करतं. इतरांशी चांगले संबंध निर्माण करतं. मैत्री दृढ करतं. 'A smile creates happiness in the home, fosters goodwill in business and is the countersign of friendship.' माणूस जिवाला उबगला असेल, तर आपलं एक हसू त्याचा उबग नाहीसा करतं. तो निराश झाला असेल, तर त्याची निराशा कुठल्या कुठे पळवून लावतं. तो दु:खात असेल, तर त्याचं ते दु:ख एका क्षणात नाहीसं करतं. 'It brings rest to the weary, cheer to the discouraged, sunshine to the sad and is nature's best antidote for troubles.' लोकांचे सगळे त्रास, सगळे कष्ट, सगळी दु:खं नाहीशी करणारं हसण्यासारखं दुसरं औषध नाही. हे हसू विकत मिळत नाही, कुणाकडून ते मागूनही आणता येत नाही, उधार घेता येत नाही; आणि तुमच्याकडून ते कुणी चोरूनही नेऊ शकत नाही. 'It cannot be bought, begged, borrowed or stolen.' ते दुसऱ्याला दिल्याशिवाय त्याचं मोल कळत नाही. 'It is something that is of no value to anyone until it is given away.' ते दिल्यानंतरच त्याचं मोल कळतं. देणाऱ्यालाही कळतं; घेणाऱ्यालाही कळतं. मग का देऊ नये ते आपण दुसऱ्याला? देऊन टाकावं. कंजूषी करू नये. कवी म्हणतो, का देऊन टाकायचं, माहीत आहे? तुम्हालाच त्याची सर्वांत जास्त गरज आहे म्हणून. 'No one needs a smile so much as

ıe who has none to give.' मग पुढे कवी म्हणतो, आयुष्य सुखाचं असतं, ेव्हा हसू देऊ करणं सोपं असतं; पण आयुष्यात सगळं उलटं-पालटं झालेलं असताना दुसऱ्याला हसवू शकतो, तोच खरा. 'It is easy enough to be pleasant when the life flows along like a song. But the man worth-while is the one who will smile when everything goes dead wrong.'

पाठ करायला हवी ही कविता सगळ्यांनी. नाही?

। ६९ ।

माणूस एकटा असतो, तेव्हाच काही तरी निर्माण करू शकतो. सृजनाची प्रक्रिया एकटेपणाच्या जाणिवेतूनच सुरू होते आणि एकटेपणातच पूर्ण होते.

पण माणसाची वाढ एकटेपणात होत नाही. ती चारचौघांच्या संगतीतच व्हायला हवी.

चारचौघांच्या संगतीत राहूनच माणसाला एकटं राहता आलं पाहिजे.

नाही तर मग माणूस विक्षिप्त होतो.

। ७० ।

स्वभावानं आपण विभूतिपूजक. जो आपला 'हीरो' होतो, त्याच्याचसारखं आपण बोलू-चालू लागतो.

परवा दिल्लीला एकजण भेटला. अगदी लोहियाच. उठणं, बसणं, बोलणं, करणं, सगळं अगदी लोहियांसारखंच. लोहिया होतेच तसे. सर्वांना वेड लावणारे. तसंच यालाही त्यांनी वेड लावलं, असं म्हणायला हवं. लोहियांच्या व्यक्तिमत्त्वानं भारून जाऊन तो त्यांच्याप्रमाणेच वागू लागला असावा. पण लोहियांप्रमाणे उठू-बसू लागला, म्हणजे कोणी लोहिया नाही होत. मिथ्याचारच हा!

मुंबई-पुण्यात एके काळी असे अनेक साने गुरुजी दृष्टीस पडायचे, सर्वोदयवाद्यांमध्ये अनेक विनोबा पाहायला मिळायचे. हे सगळे मिथ्याचारी लोक.

मिथ्याचाराच्या आणखीही काही तऱ्हा असतात–

दुसऱ्याच्या मनात आपणच आपल्या कृत्यांनी आपली एक प्रतिमा तयार करतो; आणि मग ती भंगू नये, म्हणून आपणच तिला जपत राहतो. हाही मिथ्याचाराच.

दुसऱ्याला चांगलं वाटावं, दुसऱ्यानं आपल्याला चांगलं म्हणावं; म्हणून

माणूस कधी-कधी स्वत:च स्वत:वर अन्याय करत असतो. तेव्हाही तो मिथ्याचाराच करत असतो. काल एक बोललो आणि आज दुसरंच बोललो, तर दुसऱ्याच्या लेखी आपली किंमत कमी होईल, या भीतीनं माणूस काल जे बोलला, तेच आज बोलतो, तेव्हाही तो मिथ्याचारच करत असतो.

भोवताली असे किती तरी मिथ्याचारी पाहिले, की मन हळूच कानात पुटपुटतं – 'Dare to be yourself.'

। ७१ ।

व्हॉल्तेअर-रूसोसारख्या तत्त्वचिंतक ऋषि-मुनींनी मनुष्यमात्राला एक मंत्र दिला. जगात सुख नांदायला हवं असेल, तर तीन तत्त्वं पाळायला हवीत, असं त्यांनी सांगितलं. कोणती तीन तत्त्वं? Liberty, Equality आणि तिसरं Fraternity.

यापुढे राजे-महाराजांची सत्ता चालणार नाही. सत्ता लोकांची चालेल. लोकच स्वत: आपला राज्यकारभार पाहतील. कुणी कुणाचा गुलाम असणार नाही.

यापुढे कुणी कुणापेक्षा उच्च आणि कुणापेक्षा नीच असणार नाही. सगळे समान असतील. सगळ्यांना समान अधिकार असतील.

आणि तिसरी गोष्ट – कुणी कुणाला परका लेखणार नाही. सगळे एकमेकांचे बंधू. एकमेकांशी भावासारखेच वागतील.

आज या मंत्रानं कुणी फारसं भारावून जात नाही. पण ज्या काळात तो प्रथमच कानांवर पडला, त्या काळी लोकांची मनं उचंबळून आली होती.

परिणाम – पहिली क्रांती फ्रान्समध्ये झाली. फ्रान्समधल्या लोकांनी उठाव केला. त्यांनी राजाचं मुंडकं उडवलं आणि लोकांचं राज्य सुरू केलं. आणखी काही दिवसांनी लोकांचं राज्य गेलं आणि नेपोलियनसारख्या सरसेनापतीनं सारी सूत्रं हाती घेतली. फ्रेंच राज्यक्रांतीला प्रतिक्रांतीनं गिळून टाकलं. पण–

स्वातंत्र्याचं जे वारं तिथे वाहू लागलं, ते वाहायचं बंद झालं नाही आणि फक्त फ्रान्समध्ये बंदिस्तही राहिलं नाही. ते जगभर वाहू लागलं. आणि...

सगळीकडच्या राजेशाह्या संपल्या.

जिथे लोकांनी राजपद ठेवलं, तिथेही ते लोकांच्या हातातलं बाहुलं म्हणूनच राहिलं.

'लोकां'च्या स्वातंत्र्याविरुद्ध बोलायचं धाडस आज जगात कुणाला होत नाही. भले ते त्याविरुद्ध वागतात; पण बोलत नाहीत.

मंत्राचं दुसरं तत्त्व होतं – कुणी कुणापेक्षा उच्च आणि कुणी कुणापेक्षा नीच असणार नाही. ते प्रत्यक्षात आणण्यासाठी लेनिनला जन्म घ्यावा लागला. त्यानं रशियात क्रांती घडवून आणली. फ्रान्सप्रमाणेच रशियात राजाला (झारला) सत्तेवरून खाली खेचून त्यानं लोकांच्या हाती सत्ता दिली. कोणत्या लोकांच्या? समाजातल्या सर्वांत तळागाळातल्या लोकांच्या. युगानुयुगं तुडवल्या गेलेल्या पिडल्या-नाडल्या लोकांच्या. लेनिननं फक्त राजालाच सत्ताच्युत केलं, असं नाही; तर त्यानं लोकांचं शोषण करणाऱ्या भाडवलदारांची सत्ताही संपुष्टात आणली. देवा-धर्माच्या नावानं लोकांची फसवणूक करणाऱ्या चर्चची सत्ताही त्यानं निकालात काढली.

रशियात काल-परवापर्यंत कामगारांचीच सत्ता चालत होती. आज ती नसेल; पण म्हणून 'सर्वांना समान अधिकारां'चे जे वारे रशियात वाहू लागले होते, ते रशियापुरतेच मर्यादित राहिले नाहीत. ते जगातल्या सगळ्या श्रमजीवींच्या भोवती वाहत राहिले. आजही वाहत आहेत. समतेच्या तत्त्वाविरोधात बोलायचं धाडस आज जगात कुणालाही होत नाही. समतेच्या तत्त्वाविरोधात वागतील; पण बोलण्याचं धाडस करणार नाहीत.

व्यावहारिकपणे बोलायचं, तर फ्रान्सप्रमाणेच रशियातली क्रांतीही अपयशी ठरली. पण...

स्वांतत्र्याचं आणि समतेचं तत्त्व अपयशी ठरलं, असं म्हणता येईल काय? ते तर जगात सर्वत्र प्रस्थापित झालं.

ते प्रस्थापित करण्यासाठी रक्ताचे पाट वाहावे लागले, संघर्ष करावा लागला; आणि मोठी किंमत मोजावी लागली मनुष्यमात्राला.

कुणी कुणाला परका लेखणार नाही. सगळे एकमेकांचे बंधू. एकमेकांशी भावासारखेच वागतील, हे मंत्राचं तिसरं तत्त्व. ते अजून प्रस्थापित व्हायचं राहिलंय. ते कोण प्रस्थापित करणार? भारत नाही, तर मग कोण? इतिहासपुरुषानं हे 'मिशन' या देशासाठी राखून ठेवलं आहे. या देशात जगातल्या सगळ्या देशांतले लोक येऊन राहिले आहेत. सर्वांच्या आपापल्या परंपरा आहेत, आपापले धर्मविचार आहेत, आपापल्या चाली-रीती आहेत. असा वैविध्यानं भरलेला दुसरा देश जगाच्या पाठीवर नाही. फ्रॅटर्निटीची साधना आणि तिचा प्रयोग करायचा झाला, तर तो याच देशाला करायला हवा. हे आव्हान आहे, तशीच ही चांगल्यातली चांगली संधीदेखील आहे. हा देश हे आव्हान पेलून दाखवणार आहे का? या संधीचा लाभ घेणार आहे का?

हृदयातून एक आवाज येतो – होय, या देशाचंच काम आहे हे. तसं नसतं, तर महात्मा गांधी या देशात जन्माला आलेच नसते. बंधुत्वासाठी रक्त सांडावं

लागत नाही. समतेचा आणि स्वातंत्र्याचा फिरून-फिरून जप करावा लागत नाही. गांधी इथे जन्माला आले आणि बंधुभाव कसा बाणवायचा, त्याचा मार्ग दाखवून गेले.

त्यांचा जन्म आपण व्यर्थ जाऊ द्यायचा का?

स्वतंत्रतेची आणि समतेची क्रांती आंधळी होती; म्हणून रक्ताचे पाट वाहिले. बंधुत्वाच्या क्रांतीत आंधळेपणाला स्थान नाही. डोळे उघडे ठेवून करायची क्रांती आहे ही – धीरानं पाऊल उचलण्याची.

। ७२ ।

जे आपल्याकडे नसतं, तेच आपल्याला हवं असतं. सत्ता नाही? मग सत्ता हवी असते. संपत्ती नाही? संपत्ती हवी असते. ख्याती नाही? ख्याती हवी असते.

जे हवं, ते मिळालं, की आपण सुखी होऊ, असा आपला समज.

पण ज्यांच्याकडे सत्ता-संपत्ती-ख्याती सगळं असतं, ते खरंच सुखी असतात का?

दिवसाउजेडी दिवा घेऊन शोधावं लागेल.

सुख सत्ता-संपत्ती-ख्यातीत नाही; ज्ञानात आणि चारित्र्यात असतं.

गोवा स्वतंत्र नव्हता, तेव्हा आपल्याला गोव्याचं स्वातंत्र्य हवं होतं. ''एकदा स्वातंत्र्य मिळू तर द्या; मग बघाच तुम्ही, गोव्याचं आम्ही काय करून दाखवतो ते'', असं आपण म्हणत असू. *'सात लाख गोंयकर आमी युग नवें फुलयतलें'* असं आपण मोठमोठ्यानं गात असू.

स्वातंत्र्य मिळालं. गोव्याचं काय केलं आपण? कोणतं नवं युग फुलवलं? चोरांच्या, धोकेबाजांच्या आणि वाटमाऱ्यांच्या हातातच दिलं नं आपण गोव्याला?

स्वातंत्र्य मिळायलाच हवं होतं; पण तेवढ्यानं भागणार नव्हतं. स्वातंत्र्याचा उपयोग कसा करायचा, याचं ज्ञानदेखील गरजेचं होतं. त्यासाठी कोणत्या मार्गानं जायचं, याची जाणीव असणं आवश्यक होतं.

देशाकडे हवीत तेवढी अण्वस्त्रं नाहीत, त्याला अण्वस्त्रं हवी आहेत. विज्ञान आणि तंत्रज्ञान नाही, त्याला विज्ञान आणि तंत्रज्ञान हवं आहे. उद्योगधंदे नाहीत, त्याला मोठमोठे उद्योगधंदे हवे आहेत. त्यासाठी तो कर्ज घेतो. आंतरराष्ट्रीय नाणेनिधी आणि जागतिक बँकेचे पाय धरतो. मी म्हणतो, समजा, हे सगळं तुम्हाला मिळालं, तर पंजाब, काश्मीर, आसामचे लोक तुमच्याबरोबर राहतील, असं तुम्हाला वाटतं? मुसलमान, ख्रिस्ती तुमचे होतील, असं तुम्हाला वाटतं?

भ्रष्टाचार संपेल, असं तुम्हाला वाटतं?

देशाला गरज अण्वस्त्रांची नाही, विज्ञान-तंत्रज्ञानाची नाही, उद्योगधंद्यांची नाही; गरज आहे ती राष्ट्रभक्तीची, माणूसपणाची, एकमेकांना सांभाळून घेणाऱ्या दृष्टीची. गरज आहे, ती राष्ट्रीय चारित्र्याची आहे, आत्मशुद्धीची आहे. आत्मशुद्धीचं काम लेक्चरं देऊन होणारं नाही. ते शासनाच्या हातूनही घडून येणारं नाही.

फक्त आदर्श हवा.

आदर्श कोणाचा? तुमचा-आमचा. आपण जेव्हा एकमेकांबरोबर मैत्रीच्या भावानं, आदरभावानं, विश्वासानं चालायला लागू, तेव्हा कुणीही आपल्यात फूट पाडू शकणार नाही; देशाची अखंडता भंग करू शकणार नाही.

समजात धृती हवी, 'कोहेजन' हवं. लाडवात जसं तूप गरजेचं, तसाच समाजात 'स्नेह' गरजेचा. तो नसेल, तर देशाचे तुकडे व्हायला कोणतंही कारण पुरतं.

सैन्य, अण्वस्त्रं, विज्ञान-तंत्रज्ञान देशाला एकत्र आणू नाही शकणार.

। ७३ ।

गरजेचं-गरजेचं म्हणून आपण जे जमा करून ठेवतो, ते सगळं 'अर्थहीन' होय, हे आपल्याला केव्हा कळतं? मृत्यूच्या क्षणापाशी येऊन ठेपतो, तेव्हाच ना? हे जे जमा केलं, त्यातलं काहीही आपल्याबरोबर येणार नाही, हे आपल्याला त्याच वेळी कळावं ना?

किती निर्बुद्ध जीवन जगतो आपण!

। ७४ ।

विनोबांनी कुठेसं म्हटलंय–

अहिल्या शिळा होऊन पडली, अनेकांचे पाय या शिळेला लागले; पण रामाचा पाय लागला, तेव्हाच तिचा उद्धार झाला.

याउलट, अनेक शिळांना रामाचे पाय लागले. उद्धार फक्त अहिल्येच्याच शिळेचा झाला.

वाटेल त्या शिळेचा उद्धार होत नसतो. आपला उद्धार व्हावा, अशी तळमळ जिला लागलेली असते, त्या अहिल्येचाच होतो. तोही, कोणाचाही पाय लागून नव्हे; रामाचाच पाय लागायला हवा.

। ७५ ।

काहीजणांचं लिखाण सुंदर असतं, रोचक असतं; पण त्यात खोली नसते. लिखाणात खोली असायला हवी, 'डेप्थ' असायला हवी. पण लेखकाच्या जीवनातच ती नसेल, तर त्याच्या लिखाणात कुठून येणार?

जीवनात खोली – प्रगल्भता – यायला हवी, तर माणसानं म्हणे अपमान सोसलेले असायला हवेत, त्याच्यावर अन्याय झालेले असायला हवेत, त्याच्यावर संकटं, अरिष्टं कोसळली पाहिजेत, त्याला अपयश यायला हवं. दुःख सोसल्याशिवाय जीवनात खोली कशी येणार?

हे लोक दुःखाला फार महत्त्व देतात. दुःख हेच लेखकाचं खरं धन, असं मानतात.

दुःख माणसाला खोलात घेऊन जातं, ही गोष्ट खरी. दुःख माणसाचं मन खंबीर करतं, हीही गोष्ट खरी. पण दुःख ज्यांनी सोसलंय, असे सगळेच प्रगल्भ झालेले असतात, असं नाही. होऊ शकतात, असंही नाही. दुःख सगळ्यांनाच खंबीर बनवतं, त्यांचं काळीज घट्ट करतं, असं नाही. काहीजण तर दुःख सोसून-सोसून सैरभैर झालेले पाहायला मिळतात. दुबळे, दुर्मुखलेले, मत्सरी, दुस्वासी, हेकेखोर झालेले पाहायला मिळतात. काही जणांचा माणुसकीवरचा विश्वास उडून गेलेला पाहायला मिळतो.

दुःखी माणसाचं जीवन आणि त्याच्या भोवतालचा परिसर नरकाहूनही नरक झाल्याचं पाहिलं नाही होय आपण?

दुःखाला हे लोक देतात, तेवढं त्याचं महत्त्व खासच नाही.

मग माणसाच्या लिखाणात खोली कुठून येणार?

जीवनात आणि लेखनात खोली येण्यासाठी माणसात प्रज्ञा असायला हवी; आणि प्रज्ञा जागी व्हावी, यासाठी त्याचं चित्त प्रसन्न राहायला हवं. कल्पना करा, उन्हाळ्यात संध्याकाळी फुटबॉल खेळून घामाघूम होऊन तुम्ही घरी येता. विहिरीवर जाऊन डोक्यावरून भसाभसा पाण्याच्या कळशा ओतून घेता. आंघोळ करून येताच तुम्हाला कसं वाटतं? प्रसन्न वाटतं ना? दुसरी एक कल्पना करा, तुम्हाला काम केल्यावर कडकडून भूक लागली आहे. नेमकं याच वेळी सुग्राम अन्न पुढ्यात येतं. जेवून होताच तुम्हाला कसं वाटतं? प्रसन्न वाटतं ना?

ही प्रसन्नता महत्त्वाची. सुख-दुःखापलिकडची. ती चिंतनानं मिळवता येते. बुद्धाचं सगळं आयुष्य सुख-दुःखापलीकडे जाऊन चित्ताची प्रसन्नता कशी मिळवायची,

हे शिकवण्यात व्यतीत झालं आणि या प्रसन्नतेला त्यानं 'निर्वाण' असं नवीन नाव दिलं.

विमुक्ति-सुखाचा असा आनंद जे अनुभवू शकतं, अशाच चित्ताच्या प्रसन्नतेतूनच प्रज्ञा स्थिर होते. ही प्रज्ञाच आपल्याला प्रगल्भ बनवते आणि इतर कुणाहीपेक्षा वरच्या स्थानावर पोहोचवते.

खोली – प्रगल्भता – येण्यासाठी दु:खच सोसायला हवं, असं नाही.

आकाशाचं गहिरेपण मोजायला तळं कधी उडून आकाशात गेलं आहे? ते शांत राहतं, एकही लाट त्याच्या पाण्यावर उठू देत नाही, तेव्हाच प्रतिबिंबाच्या रूपानं आकाश त्याच्या गहिरेपणासहित त्यात पाहायला मिळतं.

। ७६ ।

तो असाच आहे, तो तसाच आहे; म्हणून एक जण कुणाचीशी निंदा करू लागला. ''म्हणजे तुझ्या-माझ्यासारखाच ना रे?'' मी मध्येच विचारलं आणि म्हटलं, ''आपण सगळे एकमेकांसारखेच. कुणीही कुणापेक्षा वेगळा नाही. दुसरा आपल्यासारखा आणि आपण दुसऱ्यासारखे – गुणावगुणांनी युक्त.

''डॉ. जेकिल आणि मि. हाइड सगळ्यांमध्ये असतात.

''त्यागी माणसात काय कधी आपल्याला भोगी माणूस दिसतच नाही? आदर्शवादी माणसात व्यवहारवादी माणूस आढळतच नाही? बारकाईनं पाहिलं, तर अहंकारी माणसातही आपल्याला एक विनम्र माणूस दिसतो. भित्र्या माणसातही एक धीट माणूस दिसतो. धीट माणसात त्याची किती तरी विविध रूपं दडलेली असतात. कधी कोणतं रूप वरचढ होईल, सांगता येणार नाही. माणूस म्हणजे काही दगडाचा पुतळा नव्हे. हाडा-मांसाच्या माणसाला स्वार्थी, दुस्वासी, आळशी, प्रेमळ, विनम्र, अहंकारी, धीट, भित्रा, अशा एकाच कोणत्या तरी विशेषणात बंदिस्त करून ठेवता येणार नाही आणि तो अमकाच आहे, असं एक नावही त्याला देता येणार नाही. 'I contain multitudes' असं वॉल्ट व्हिटमन म्हणायचा आणि वॉल्ट व्हिटमन हे काही स्वत:पुरतंच बोलत नव्हता. तो हे आपणा सर्वांविषयीच बोलत होता.''

एवढं सगळं त्याला सांगून मी म्हटलं, ''तू कधी स्वत:ला नीट न्याहाळून पाहिलंयस का? स्वत:ला न्याहाळून पाहण्याची माणसानं स्वत:ला सवय लावून घ्यायला हवी. दिवसाउजेडी त्याचं सुप्त मन जागं नसतं. सुप्त मन बहुधा खूप रात्रीच जागं होतं. समजा, रात्री दोन-तीनच्या सुमारास तुला जाग आली. बाहेर जाऊन येऊन तू परत अंथरुणावर पडलास. आता तुला परत झोप लागेपर्यंत मध्ये अर्धा-

एक तास जातो. या अर्ध्या-एक तासाभरात तुझं सुप्त मन जागं होतं आणि तुझ्य आत दबून राहिलेल्या अनेक गोष्टी पृष्ठभागावर येतात. कधी कोण तुला काय म्हणालं होतं, तुझ्याशी कसं वागलं होतं, सगळ्या-सगळ्या आठवणी जाग्या होतात आणि तू धुमसू लागतोस. अशा वेळी तू स्वत:ला न्याहाळून पाहू शकलास, तर आपल्यात काय कमतरता आहे, आपण किती क्षुद्र, किती कंजूष, किती दुष्ट, किती दांभिक, किती भ्रष्ट, किती अहंमन्य, किती पोकळ आहोत, याची तुला जाणीव होईल. तुझ्यातल्या या साऱ्या गोष्टींकडे तुला तटस्थपणे पाहता यायला हवं. दिवसाउजेडी तुला हे दिसणार नाही. रात्रीच दृष्टीस पडेल; आणि तेही उघड्या-नागड्या स्वरूपात. हीदेखील तुझीच काही रूपं. ती दिवसा पृष्ठभागावर आली नाहीत, म्हणून काय झालं? ती तुझ्यात आहेत, एवढं पुरेसं नाही का? तू दिसतोस तसा नाहीस, असा याचा अर्थ झाला ना? तुझी ही आत खोलवर दबून राहिलेली रूपं तुझ्या बाह्य रूपाइतकीच खरी. आपण कोण हे समजून घेण्यासाठी तुझ्या बाह्य रूपाबरोबरच या रूपांकडेही तुला पाहता आलं पाहिजे. तू एक creative artist – एक सृजनशील कलावंत – असशील, तर तुझ्या या रूपांकडेही तुला नीट पाहता यायला हवं. तरच तू दुसऱ्यांना ओळखू शकशील आणि तुझ्या लिखाणात तुला हवी आहे ती खोली, ती 'depth' आणू शकशील.

“ही रूपं तुला दुसऱ्यामध्ये दिसली, तर तू ‘तो असा आणि तो तसा’ म्हणून त्याला दूषणं कशी देतोस? तोही तुझ्यासारखाच. त्याची ही रूपं तुझ्या दृष्टीस पडतात, तुझी स्वत:ची तुझ्या दृष्टीस पडत नाहीत, एवढाच काय तो तुमच्यामधला फरक.

“मुदलात आपण सगळे सारखेच. तू माझ्यासारखा आणि ज्याची तू निंदा नालस्ती करतो आहेस, तोही तुझ्यासारखाच.

“माणसाला त्याच्या सुप्त मनासहित ओळखणं कठीण. म्हणून तर आपले वडीलधारे आपल्याला Know thyself – तू स्वत:ला ओळख – म्हणून सांगतात. तसं झालं, तरच तू दुसऱ्याला ओळखू शकशील, असं म्हणतात. झ्वाइग म्हणतो, 'To understand is to pity and forgive.' हे समजलं, तर मग कुणालाही दूषणं देण्याचा धीर कुणाला होणार नाही.

“तो असा, तो तसा, असं ज्याच्याविषयी तू मला सांगतो आहेस, त्यालाच ते जाऊन सांग आणि तुला काय वाटतं, तेही सांग. हवं तर भांडून ये. हे जमत नसेल, तर एक कर – त्याला तुझ्या डोक्यातून काढून टाक. त्याच्याविषयी बोलायचं, विचार करायचं बंद कर. पण...

“त्याच्या अपरोक्ष तिसऱ्याकडे त्याच्याविषयी वाईट-साईट काही बोलू

नकोस. आणि टोपणनावानं त्याच्याविरुद्ध काही लिहू नकोस.

"टोपणनावानं कविता लिही, कथा लिही, नाटक लिही. टीका करायची असेल, तर मात्र प्रचलित नावानंच तर."

टोपणनावानं आपण टीका करतो, तेव्हा आपल्यातला मि. हाइड डोकं वर काढतो आणि सगळं वातावरण विषारी करून सोडतो.

। ७७ ।

संत हे संत होऊ शकले. कारण...

१. परिस्थिती आनंद वाटण्यासारखी नव्हती, तेव्हाही ते आनंदानं जगले, म्हणून.
२. धीर धरायचा धीर कुणाला नव्हता, तेव्हा ते धीरानं वागले, म्हणून.
३. विश्रांती घेता येत होती, तेव्हाही ते समोरच्या वाटेनं चालत राहिले, म्हणून.
४. बोलता येत होतं, तेव्हाही ते गप्प राहिले, म्हणून.
५. कटू होता येत होतं, तेव्हाही ते गोड वागले, म्हणून.

। ७८ ।

मेल्यावर लोक आपल्याला विसरले, तर आपलं मोठेपण ते कसलं? आपण गेल्यानंतरही लोकांनी आपली आठवण काढली पाहिजे. आपण नसू, तेव्हाही आपला प्रभाव लोकांवर राहिला पाहिजे. आपल्या प्रेरणा सतत सक्रिय राहिली पाहिजे.

साहित्यिकानं तरी ही आकांक्षा बाळगायला हवी.

आपल्या लिखाणातून एक तरी पुस्तक असं व्हायला पाहिजे, की जे आठ-दहा-वीस पिढ्या आवडीनं वाचतील, अशी आकांक्षा साहित्यिकानं धरली पाहिजे. आपल्याला गीतेसारखं पुस्तक लिहिता न येवो, ज्ञानेश्वरी लिहिता न येवो, 'वॉर ॲण्ड पीस' लिहिता न येवो; पण 'गलिव्हर्स् ट्रॅव्हल्स्'सारखं तरी लिहिता येऊ नये? तेही आम्हा कुणाला लिहिता येत नाही.

आपलं सगळं साहित्य क्षणभंगुर – आपल्या क्षणभंगुर जीवनासारखंच!

। ७९ ।

वर्तमानपत्र वाचताना नतद्रष्ट नजर पडू नये, त्याच बातमीवर पडते; आणि मग जीव खाली-वर होतो. अशाच एका बातमीवर परवा नजर पडली.

उत्तर प्रदेशातल्या बांदा जिल्ह्यातल्या एका गावात चंद्रबली नावाच्या एका दहा वर्षांच्या मुलानं फास लावून घेऊन जीव दिला.

का? परीक्षेत नापास झाला, म्हणून? नाही. आई काही तरी बोलली, म्हणून? नाही. तर म्हणे रोज उठून कोरडी भाकरी मीठ लावून खावी लागते, त्याला तो कंटाळला होता. आयुष्यात एकच इच्छा होती, कोणत्या तरी भाजीशी भाकरी खायला मिळावी. आणि ही इच्छा काही पुरी झाली नाही. त्याची आई विधवा. तिला भाजी करण्याची चैन पडवडणारी नव्हती. चंद्रबली आदल्या दिवशी गुराख्यांबरोबर रानात गेला होता. गुराखी दुपारी जेवायला बसले. ते भाकरीबरोबर भाजी खाऊ लागले, ते त्यानं पाहिलं. भाजीचा वास नाकात गेला. आपल्यालाही थोडी भाजी मिळावी, असं चंद्रबलीला वाटलं. पण गुराखी त्याला 'घे' म्हणीनात आणि त्याला मागायचा धीर होईना. संध्याकाळी घरी येताच तो आईकडे हट्ट धरून बसला – ''आज मला भाजी करून दे.'' आई बिचारी काय करणार? ती रडू लागली.

चंद्रबलीला हे सहन झालं नाही. आई रडते आणि खायला भाजी मिळत नाही, यापेक्षा जीव दिलेला बरा, असं म्हणून त्यानं जीव दिला.

ही बातमी वाचून माझ्या जिवाची घालमेल झाली.

किती चंद्रबली असतील आपल्या या देशात? हजारो? लाखो? कोट्यवधींनी असतील. स्वातंत्र्य मिळून आता अर्धशतक होऊन गेलं. अजूनही चंद्रबली असावेत ना या देशात? गेली पन्नास वर्षं करतोय काय हा देश? फ्रीज, टीव्ही, स्कूटर, मारुती गाड्या आणि असल्याच वस्तू बाहेर धाडून फॉरिन एक्स्चेंज मिळवायचं काम? फॉरिन एक्स्चेंज मिळवणं महत्त्वाचं, की चंद्रबलीसारख्या लोकांना भाजी मिळवून देईल, असा विकास करणं महत्त्वाचं? दिल्लीत राहतात ते 'लॉर्ड' देशाचं 'प्लॅनिंग' करतात; आणि...

फॉरिन एक्स्चेंज कसं कमवावं, याच विवंचनेत सगळी शक्ती खर्च करतात.

देशात फ्रीज बनतील, टीव्ही बनतील, शॅम्पू-साबण बनतील, स्कूटर-मोटारी तयार होतील, हवं तेवढं फॉरिन एक्स्चेंज मिळेल; फक्त चंद्रबलीला भाजी काही खायला मिळणार नाही.

। ८० ।

मागे एकदा एका टूरिस्टनं विचारलं, ''गोव्यात कुठेही जा, सगळे कोकणीत

ोलतात. मराठीचा एक शब्ददेखील ऐकायला मिळत नाही. मग इथे वाण्याच्या दुकानांचे बोर्ड मराठीत कसे?''

"मला माहीत नाही.'' मी म्हटलं.

परवा आणखी एका टूरिस्टनं विचारलं, "गोव्याची भाषा मराठी म्हणून ऐकलं. मग गोव्यात जे केरळी, मराठी, पंजाबी लोक येऊन राहिले आहेत, त्यांची मुलं एकमेकांशी कोकणीतून का भांडतात?''

"मला माहीत नाही.'' मी म्हटलं.

काल आणखी एक जण आला. माझ्या टेबलावर एक सरकारी निमंत्रण पडलं होतं – मुक्तिदिनाच्या समारंभाचं. निमंत्रण चार भाषांत छापलेलं पाहून त्यानं विचारलं, "चार भाषा का? गोव्याची राजभाषा कोणती?''

"मला माहीत नाही.'' मी म्हटलं.

। ८१ ।

'बाईल' हा शब्द 'अबला' या शब्दावरून आला, असं काही जण म्हणतात. 'अबला' म्हणजे दुबळी.

परवा 'अबला' या शब्दाचा एक नवाच अर्थ वाचायला मिळाला. 'अबला' म्हणजे जिच्या बळाचा अगदी अंदाजच लागायचा नाही, अशी.

तिची तुलना केली होती झाडाच्या मुळांशी. मुळं दिसायला नाजूक असतात. कशी तरी हाताळली, तर ती तटकन तुटतील. मुळांना त्यांच्या पद्धतीनं वाढू द्यावं. जमिनीत पाण्याचा वेध घेत ती खोल खोल शिरत जातील आणि खडकाळ भूमीदेखील भुसभुशीत करून सोडतील.

दुबळी, नाजूक मुळं हे एवढं कर्तृत्व कसं काय करू शकतात, असा प्रश्न पडतो.

बाईच्या अंगीही असंच बळ असतं. खडकासारखं काळीजही तिला नरम करता येतं. कोरड्या हृदयांतही तिला मायेचे पाझर फोडता येतात. परक्याच्या घरात गेली, की पाहता-पाहता ती त्या घराला आपलंसं करून टाकते. ती घराचा ताबाही घेते. दुबळी म्हणून तिला अबला म्हणायचं, की तिच्या बळाचा अंदाज आपल्याला नाही; म्हणून तिला अबला म्हणायचं?

देऊन टाका देशाचा सगळा कारभार तिच्या हाती आणि पहा देश कसा बदलतो ते.

एक बातमी ऐकली होती.

एका बाईला ब्रेस्ट कॅन्सर झाला होता. कॅन्सर आहे म्हणून कळलं, त्यावेळी ती गर्भवती होती. पाच महिने झाले होते. कॅन्सरचं ऑपरेशन शक्य तितक्या लवकर करून घे, म्हणून सगळ्यांनी तिला सांगितलं. ''नाही. चार महिन्यांनंतर करीन... आताच ऑपरेशन केलं, तर बाळावर काही तरी वाईट परिणाम व्हायचा. नकोच ते!'' असं ती सर्वांना सांगू लागली. चार महिन्यांनी ती प्रसूत झाली. मुलगा झाला. बाईनं आपल्या धाकट्या बहिणीला बोलावून घेतलं, मुलगा तिच्या स्वाधीन केला आणि ती स्वत: ऑपरेशनसाठी गेली. ऑपरेशन झालं. तरीही वीस महिने तिला कॅन्सरशी झुंजावं लागलं. झुंजली-झुंजली आणि अखेर गेली.

कुणी म्हणतं, कॅन्सर झाल्याचं कळल्याबरोबर लगेचच ऑपरेशन केलं असतं, तर मूल दगावलं असतं; पण ती वाचली असती. तिला हे माहीत होतं. पण तिला आपल्यापेक्षा मुलाची जास्त काळजी होती. आपण गेलो तरी चालेल; पण मूल वाचलं पाहिजे, असं तिचं म्हणणं होतं. शेवटी आईच ती – मुलासाठी प्राणांचीही पर्वा न करणारी. जगातल्या साऱ्या माता अशाच असतात.

परवा फ्रान्समधल्या एका आईविषयी बातमी वाचली. तिलाही कॅन्सर झाला होता. ट्रीटमेंट घेत होती. पण या ट्रीटमेंटनं काही होणार नाही, असं तिच्या मनानं घेतलं. नवरा वारला होता; पण लहान दोन मुलं होती. त्यांच्यासाठी ती काही ना काही काम करी. पण तेवढ्यानं भागत नसे. अगदी गरिबीत दिवस काढत होती. (होय, फ्रान्समध्येदेखील असे लोक असतात.) मुलांना मऊ पाव देऊन 'हा केक आहे' म्हणून तिला सांगावं लागे. मुलंही केक म्हणून तो पाव खात. तिला हे सहन होत नसे. काळीज कळवळे. ती रडे. काय करावं, ते तिला कळेनासं होई.

अशात नाताळचे दिवस आले. पॅरिसमध्ये जिथे-तिथे मिठाईच्या दुकानांतून केक विकायला ठेवलेले तिनं पाहिले. पण घ्यायला पैसे नव्हते. दोन्ही मुलं तिच्या डोळ्यांसमोर उभी राहिली. आधी ती स्वत:च्या नशिबाला दोष देत राहिली. मग एकाएकी तिनं एक निर्णय घेतला. कुणी पाहत नाही, असं पाहून तिनं दुकानातून एक केक चोरला; आणि ती चोरी करताना सापडली.

न्यायाधीशानं विचारलं, तेव्हा तिनं खरं ते सांगितलं. म्हणाली, ''माझ्याकडे पैसे नव्हते. केक घ्यायला मला परवडत नव्हतं. नाताळच्या या सणाला सगळी

मुलं केक खाणार. माझ्याच मुलांना तो मिळणार नाही, या विचारानं काळीज तुटत होतं; म्हणून मी केक चोरला.''

न्यायाधीशानं तिला सोडून दिलं. ''तुम्ही असं का केलंत?'' कुणी तरी त्या न्यायाधीशाला विचारलं. न्यायाधीशानं त्याला उत्तर दिलं – ''माणसानं केलेल्या कायद्याशिवाय दुसरेही काही कायदे जगात चालतात. माणसानं केलेल्या कायद्यानुसार चालायचं, तर तिला शिक्षा द्यावीच लागली असती... पण मी दुसऱ्या कायद्याला अनुसरलो. आई आहे ती दोन मुलांची. मुलांना केक देता येईना, म्हणून तिचं काळीज तुटत होतं; आणि म्हणून तिनं केक चोरला. माझ्या या दुसऱ्या कायद्यानुसार ही चोरी चोरी नव्हे; म्हणून मी तिला सोडून दिलं.''

। ८३ ।

देशी भाषा, देशी साहित्य, देशी कला, देशी संगीत, देशी नृत्य, देशी खेळ – देशी संस्कृतीची जेवढी म्हणून अंगं असू शकतात, त्या सर्वांना स्वातंत्र्याच्या या चार दशकांत बेसुमार प्रोत्साहन मिळालं आहे. या अंगांची वाढ व्हावी म्हणून केंद्र, तसंच राज्य सरकारंही पाण्यासारखा पैसा खर्च करत असतात. कित्येक अकादम्या कार्यरत आहेत; पण कोणत्याच प्रयत्नात जीव आहे, असं वाटत नाही.

असं का? कारण लोकांचं मन देशी राहिलेलं नाही. ते विदेशी होत चाललंय, म्हणून.

कुठूनही पहा, आज इंग्रजी भाषा, इंग्रजी संगती, इंग्रजी नाच, इंग्रजी खेळ, इंग्रजी चाली-रीती, इंग्रजी व्यवहार यांचीच बेसुमार वाढ झाल्याचं पाहायला मिळेल. एवढंच कशाला, भगवद्गीता आणि उपनिषदांसारख्या देशी ग्रंथांवरची चिन्मयानंदांची प्रवचनंदेखील आज आपल्याला इंग्रजीत ऐकावी लागतात. का? कारण मध्यमवर्गीय भारतीय माणसाच्या मनानं आज इंग्रजीचं दास्यत्व पत्करलंय. आणि लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे, देशाचं हे इंग्रजीकरण घडवून आणण्यासाठी देशात एकही अकादमी कार्यरत नाही.

तोंडानं देशी संस्कृतीची स्तुती करायची; आणि अनुकरण मात्र इंग्रजी संस्कृतीचं करायचं, हे मध्यमवर्गीय भारतीयाचं खास वैशिष्ट्य होऊन बसलंय.

देशाच्या इंग्रजीकरणाच्या प्रयत्नात थोडी जरी कसूर झाली, तरी आपण मागे पडू, आपलं स्टँडर्ड खालावेल, अशी बोंबाबोंब सगळीकडे सुरू होते. इंग्रजीकरणाच्या बाबतीत आपण मागे पडू नये, म्हणून करायच्या प्रयत्नांना आपण 'मॉडर्निझम्' मानू लागलो आहोत.

इंग्रजी संस्कृतीकडून जे घेण्यासारखं आहे, ते जरूर घ्यावं. जपाननं ह होतं, ते घेतलं; पण आपली संस्कृती न सोडता घेतलं. आणि जे घेतलं, त्याचं जपानीकरण करून घेतलं. त्यामुळे जपानी संस्कृतीतलं कोणतं अंग जपा आणि कोणतं इंग्रजी (युरोपियन), हे शोधून काढणं कठीण होऊन बसलं आपल्यालाही असं करता आलं असतं. मन देशी राखून इंग्रजी संस्कृती भारतीयीकरण करता आलं असतं, कठीण नव्हतं. असं केलं असतं, तर आपण खऱ्या अर्थानं मॉडर्न होऊ शकलो असतो.

आज? ना धड इंग्रजी, ना धड भारतीय, असे धेडगुजरी होऊन बसले आहोत आपण. गावठी साहेब झालो आहोत.

गांधी म्हणत असत – "No country can become a nation by producing a race of imitators." खोटं नाही. संस्कृतीच्या क्षेत्रातलं इंग्रजांचं हे शिष्यत्व फार महाग पडणार आहे या देशाला.

। ८४ ।

हिंदुस्तान स्वतंत्र झाल्यावर प्रश्न उभा राहिला – स्वतंत्र हिंदुस्थानच राज्यकारभार आता कोणत्या भाषेतून चालणार?

त्या आधी दीडशे-दोनशे वर्षांपासून इंग्रजी भाषा राजभाषेची जागा बळकावून बसली होती. प्रशासन या भाषेतून चालत होतं. शिक्षणही याच भाषेतून दिले जात होतं. न्यायदान याच भाषेतून व्हायचं. सार्वजनिक क्षेत्रांत हीच भाषा प्रमुख भाषा होऊन राहिली होती.

पण ही गुलाम हिंदुस्थानची भाषिक अवस्था होती. स्वतंत्र हिंदुस्थानच राज्यकारभार गुलाम हिंदुस्थानच्या भाषेत चालता उपयोगी नाही – इंग्रजील आजच्या जगात कितीही महत्त्व असलं, आम्हाला पुढे जाण्यासाठी तिची कितीह गरज असली, तरीही.

राज्यकारभार या भाषेत चालणार नाही. केंद्रात तो हिंदुस्थानी भाषेत चालेल आणि राज्यांतून तो तिथल्या-तिथल्या प्रादेशिक भाषांतून चालेल, असं म्हणणार एक मोठा वर्ग त्या काळी होता.

या वर्गाचं नेतृत्व महात्मा गांधी करत होते.

गांधींना राज्यकारभारातच नव्हे; तर शिक्षणातही, न्यायव्यवस्थेतही आणि सार्वजनिक क्षेत्रातही मुळापासून बदल घडवून आणायचे होते. इंग्रजीचं महत्त्व त्यांना चांगलं माहीत होतं, एक विषय म्हणून ते इंग्रजीची सक्ती करायलाह

तयार होते; पण देशी भाषांचा बळी देऊन इंग्रजी राहू देणं त्यांना अजिबात मान्य नव्हतं.

गांधींच्या या पक्षाविरुद्ध तीन शक्ती सक्रिय होत्या.

१. इंग्रजीतून प्रशासन चालवत आलेल्या प्रशासकांची – आय्. सी. एस्. मंडळींची.
२. इंग्रजीत शिक्षण घेऊन पुढारलेल्या पांढरपेशा मध्यम वर्गाची.
३. हिंदू-मुसलमान यांच्यामधील फुटीची.

पहिल्या दोन शक्तींना इंग्रजी मुळीच जायला नको होती. तिसऱ्या शक्तीतल्या हिंदूंना उर्दू राहायला नको होती; तर मुसलमानांना हिंदी यायला नको होती.

परिणाम : निर्णय घ्यायची वेळ आली, तेव्हा आपल्या पुढाऱ्यांनी 'धुसफूस नको', असं निमित्त पुढे करून एक निर्णय घेतला–

तूर्तास राज्यकारभार चालतो आहे, तसाच इंग्रजीतून चालत राहील. दहा वर्षांनी केंद्र सरकार एका official language commission ची नेमणूक करील. त्यानंतर या प्रश्नाचा नव्यानं विचार होईल.

त्यानंतर पन्नास वर्षं सरली. सरकारनं कमिशनं नेमली. सगळ्या कमिशनांनी, इंग्रजीची जागा देशी भाषांनी घ्यायला हवी, म्हणून शिफारशी केल्या. तरीही...

इंग्रजी जी डोक्यावर बसली, ती बसलीच. इतकंच नव्हे; तर दिवसेंदिवस ती अधिकच घट्ट चिकटत गेली.

चुकलं कुठे?

गतानुगतिक शक्ती समाजात कोणताच बदल घडवून आणू देत नाहीत. त्यांच्याशी तडजोड करता कामा नये... कोणत्या ना कोणत्या प्रकारे त्यांच्याशी तडजोड केली, तर त्या कमकुवत न होता उलट आणखीच आग्रही होतात आणि 'सध्या अमुक करू' असं म्हणत तेच कायमचं चालवू पाहतात. ही गोष्ट आपल्या पुढाऱ्यांच्या लक्षात आली नाही, हीच सर्वांत मोठी चूक झाली.

गांधी त्या वेळेस नव्हते. असते, तर त्यांनी या शक्तीशी कधीही तडजोड केली नसती. गतानुगतिक शक्तीचं बळ त्यांनी नेमकं ओळखलं हेतं. त्यांनी त्यांना कोणत्याही प्रकारे प्रोत्साहन दिलं नसतं. तुर्कस्तानातल्या केमाल पाशाप्रमाणेच त्यांनी विचारलं असतं–

इंग्रजीला हटवून तिची जागा देशी भाषांना मिळवून द्यायला किती वर्षं लागतील? दहा? तसं असेल, तर दहा वर्षं आज संपली, असं समजूया आणि पुढची आखणी आजच करूया.

। ८५ ।

'आपल्या मुलांना कोणत्या माध्यमातून शिक्षण द्यायचं, हे ठरवण्याचा अधिकार आमचा – आई-बापांचा.' – 'कुणी दिला हा अधिकार तुम्हाला?' – तर म्हणे लोकशाहीनं.

लोकशाही काय फक्त भारतातच आहे? जगात इतर कुठेच नाही? लोकशाही मानणारी दोन तरी राष्ट्रं आपल्याला माहीत आहेत. एक इंग्लंड आणि दुसरं अमेरिका. या राष्ट्रांतले लोक मुलांना कोणत्या माध्यमातून शिक्षण देतात? कोणत्या माध्यमातून मुलांना शिक्षण द्यायचं, हे तिथे कोण ठरवतं? लोक? की राष्ट्राचे कर्ते-धर्ते? 'आम्ही ठरवू, त्याच माध्यमातून (या राष्ट्रांनी) मुलांना शिकवलं पाहिजे.' असं सांगणारे तुमच्या-आमच्यासारखे आई-बाप तिथे असतात का? नाही ना? का नसतात?

आपल्याकडे चालतं, तसं अराजक कोणत्याच देशात चालत नाही. आपल्याही देशात चालता कामा नये. लोकशाही म्हणजे अराजक नव्हे. 'आम्हाला हवं, ते आम्ही करू' असं म्हणणाऱ्या लोकांना लोकशाही म्हणजे काय, हे कळतं, असं म्हणता येणार नाही.

इंग्लंडमधल्या मुलांचं शिक्षण इंग्लिश माध्यमातूनच चालतं – इंग्लंडमध्ये तीन-चार भाषा असूनही. अमेरिकेतलं शिक्षण इंग्लिश भाषेतूनच चालतं – तिथे शेकडोंनी भाषा आहेत, तरीही. शिक्षण कोणत्या भाषेतून द्यायचं, कोणत्या प्रकारचं शिक्षण द्यायचं, अभ्यासक्रमात काय काय असायला हवं, हे या देशांत लोक ठरवत नाहीत; सरकार ठरवतं. सरकारही काही आपली मनमानी करत नाही; तर तज्ज्ञांना पाचारण करून त्यांना विचारतं, 'काय केलेलं चांगलं?' आणि मग तज्ज्ञ जे सांगतात, त्याच्या आधारे सरकार आपलं धोरण ठरवतं.

इंग्लंड-अमेरिकेतच नव्हे; तर फ्रान्स, जर्मनी, इटली, जपान, चीन, रशिया – जगातल्या कोणत्याही देशानं मुलांच्या शिक्षणाचं माध्यम मुलांच्या आई-बापांना विचारून ठरवलेलं नाही; तज्ज्ञांना विचारून ठरवलं आहे.

तसंच या देशातही व्हायला हवं.

माध्यम ठरवायचा अधिकार जर घटनेनं आई-बापांना दिला असेल, तर ती घटनाच बदलायला हवी. कोर्टानं हा निर्णय दिला असेल, तर कोर्टानं चूक केली, असंच म्हणावं लागेल.

माध्यम टरवायचा अधिकार आई-बापांना असता कामा नये.

ज्यांना अराजक आणि लोकशाही यातला फरक कळत नाही, ते खऱ्या अर्थानं लोकशाहीसाठी लायकच नसतात.

दुसरा प्रश्न–

मुलांची मातृभाषा अमकीच म्हणून ठरवलं असताना, ती त्यांची मातृभाषा नाही, त्यांची मातृभाषा आम्ही सांगतो तीच, असं खोटं सांगून तुम्ही मुलांना शाळेत घालणार? असत्याच्या दरवाज्यानं विद्यामंदिरात प्रवेश करणार? आणि याला तुम्ही 'शिक्षण' म्हणणार? कुणाचा अधिकार हा? कुणी दिला?

जगात कुणाला हा अधिकार मिळालाय?

फक्त तुम्हालाच? जावई की काय तुम्ही सरकारचे?

## । ८६ ।

ज्वर हा आजार नव्हे. आजाराचं एक लक्षण. तिचं एक सिम्प्टम.

शरीराला कुठे तरी इन्फेक्शन झालं, की शरीर 'मला इन्फेक्शन झालंय, मला इन्फेक्शन झालंय... काही तरी औषध-पाणी करा, लवकर करा', असं सांगू लागतं. हे ते ज्वराच्या – तापाच्या – भाषेत सांगतं.

ज्याला ही भाषा समजते, तो तापावर औषध-पाणी करत नाही; तर इन्फेन्शन कुठे झालंय, ते शोधून काढतो आणि त्याच्यावर इलाज करतो.

क्रोसिन, ॲस्पिरिन वगैरे गोळ्या घेऊन ताप उतरवला, तरी मुळातलं इन्फेक्शन जात नाही. थोडंसं बरं वाटतं. पण मुळातल्या इन्फेक्शनवर इलाज केला, तरच माणूस पूर्ण बरा होतो.

आज शाळांच्या माध्यमाच्या प्रश्नाचा जो वाद चालू आहे, त्याचं स्वरूप असंच आहे. आपल्या राजकीय जीवनात कुठे तरी इन्फेक्शन झालं आहे आणि 'मला इन्फेक्शन झालं, इन्फेक्शन झालं' असं म्हणून आम्ही काही तरी इलाज करतो आहोत, तो या वादरूपी ज्वरावर. खरं तर इन्फेक्शन कुठे झालंय, ते शोधून काढायला हवं आणि इलाज त्याच्यावर करायला हवा. प्राथमिक शाळांच्या माध्यमाचा प्रश्न सोडवून आपल्या तात्पुरतं बरं वाटेल; पण मुळातल्या इन्फेक्शनवर इलाज केल्याशिवाय आपलं राजकीय जीवन पूर्ण बरं होणार नाही.

आपलं कुठे चुकलं? आपण कोकणीच्या शिरावर राजमुकुट चढवला; पण राजदंड तिच्या हाती दिला नाही. तो इंग्रजीच्या हातात दिला. इंग्रजीच्या हातातला राजदंड काढून घेऊन तो कोकणीच्या हातात द्यायला हवा, म्हणजे मग आजार जाईल.

आणि आपलं राजकीय जीवन पूर्णपणे बरं होईल.

ज्या भाषेच्या हातात राजदंड असेल, तीच भाषा पोटाची भाषा होते. पोटाची भाषा जोपर्यंत इंग्रजी आहे, तोपर्यंत शाळेची भाषा इंग्रजीच ठरणार. ती कुणालाच चुकणार नाही. पोटाची भाषा जोपर्यंत इंग्रजी असेल, तोपर्यंत संस्कृतीचा विचार करून मुलांना पहिली चार वर्षं कोकणीतून शिक्षण द्या. मानसशास्त्रीय दृष्टीनं मुलं मातृभाषेतून शिकतात, तेव्हाच ती खऱ्या अर्थानं शिकतात, असली सगळी तत्त्वज्ञानं *'परोपदेशे पांडित्यम्'* मध्ये मोडत राहतील. पोटाची भाषा बदला. संस्कृतीच्या भाषेला पोटाची भाषा बनवा. मानसशास्त्राचा आणि पोटाचा मेळ घाला, म्हणजे आपल्या राजकीय जीवनाला झालेल्या इन्फेक्शनवर योग्य तो इलाज केल्यासारखं होईल. नाही तर...

लिहून ठेवलेलं बरं – एक-दोन पिढ्यांमध्ये, केवळ दोन पिढ्यांमध्येच लोकांची मातृभाषाच बदललेली पाहायचा प्रसंग सगळ्यांवर येईल.

। ८७ ।

डेमॉक्रसीत सगळे सारखे. सगळ्यांना एकच मत. पंतप्रधानांनाही एक; त्यांच्या चपराशालाही एक. सरसेनापतीलाही एक; त्याच्या फौजेतल्या 'जवाना'लाही एक. श्रीमंतालाही एक आणि गरिबांतल्या गरिबालाही एक. ऐंशी वर्षांच्या वडीलधाऱ्यालाही एक आणि अठरा वर्षांच्या मुलालाही एकच.

ही डेमॉक्रसी. लहान, मोठे इथे कुणी नाही. सगळे सारखे.

सगळे सारखे असायला हवेत. कुणीच कुणाच्या डोक्यावर चढून बसून चालणार नाही. कुणीही दुःखी असू नये. कुणाला अपमानित जिणं जगायला लागू नये. कुणी मागास राहू नये. सर्वांना अन्न-पाणी सारखं मिळावं. सर्वांना प्रगतीची समान संधी मिळावी. *'सर्वेऽपि सुखिनः सन्तु ।'* हीच आपली प्रार्थना असायला हवी. पण... समानतेपेक्षाही चांगला असा दुसरा आदर्श माणसाकडे नसावा? माझ्याकडे आहे एक आदर्श – समानतेपेक्षाही वरच्या दर्जाचा. आत्मीयतेचा.

घरात नवरा-बायकोव्यतिरिक्त वृद्ध आई-वडील असतात. लहान मुलंही असतात. सगळी 'सारखी.' तरीही लहान मुलांकडे आणि वृद्धांकडे आपण अधिक लक्ष देतो. मुलं मोठी होऊन आपली कामं आपण करू लागतात, स्वावलंबी होतात; स्वतःच्या पायावर उभी राहतात. वृद्ध मात्र दिवसांगणिक परावलंबी होत जातात. म्हणून त्यांच्याकडे आपल्याला सर्वांत जास्त लक्ष द्यावं लागतं आणि आपण ते आनंदानं देतो. 'घरंदाज' घरातलं वातावरण असं असतं.

समाजाला या नियमानुसार चालवता येणार नाही का? यायला हवं.

। ८८ ।

त्याला हल्ली कविता 'येऊ' लागल्या आहेत. कशा? कुणास ठाऊक. त्यालाही सांगता येत नाही. आश्चर्यच वाटतं या मुलांचं. ना व्यासंग, ना अभ्यास, ना साधना, ना तप. तरी त्यांना काय काय 'येतं!'

कौतुकच वाटतं.

मागे एकदा आला होता. म्हणू लागला, ''कोकणी कवींमध्ये अमका-अमका सर्वांत श्रेष्ठ कवी. एवढा मोठा कवी मराठीत नाही.''

मी म्हटलं, ''असं कधी म्हणू नये. Comparisons are odious... तू मराठीतले सगळे कवी कुठे वाचले आहेस?''

त्या कवींशी माझी ओळख करून द्या, म्हणून म्हणायला लागला. मी म्हटलं, ''कविता वाचून त्याची जी प्रतिमा तुझ्या मनात तयार झाली आहे, तिचीच पूजा कर. त्याच्या जवळ जाऊ नकोस. निराशा पदरी पडेल. आपल्यातली श्रेष्ठ माणसं ही आपल्यासारखीच असतात. कधी-कधी ती आपल्यापेक्षाही लहान वाटू लागतात. ती मोठी असल्यामुळे त्यांच्यातले अवगुणही आपल्याला आपल्यापेक्षा मोठे वाटू लागतात आणि आपली निराशा होते.''

तो ऐकेना. मी एक चिठ्ठी लिहून दिली.

दोन महिन्यांनी परत आला आणि म्हणू लागला, ''माणूस अगदीच क्षुद्र.''

माझ्या डोळ्यांपुढे गटे उभा राहिला.

जर्मन भाषेतला हा एक मोठ्यांत मोठा कवी. मोठ्यांत मोठा नाटककार. मोठ्यांत मोठा कादंबरीकार. त्यानं आत्मकथा लिहिली, तीही चांगल्यात चांगली! प्रवासवर्णन लिहिलं, तेही चांगल्यात चांगलं! त्याची तेरा हजार पत्रं प्रसिद्ध झाली आहेत, तीही श्रेष्ठच! एक्करमान नावाचा त्याचा एक चाहता होता. त्यानं त्याच्याशी केलेल्या संभाषणांचं एक पुस्तक लिहिलं. 'Conversations with Goethe' या नावानं ते इंग्रजीत प्रसिद्ध झालं आहे. नीत्शेच्या मते ते जर्मन भाषेतलं 'चांगल्यातलं चांगलं' पुस्तक! शॉ म्हणतो, एकेका काळात साहित्याच्या क्षेत्रात असा एक माणूस जन्माला येतो, 'Who reaps the whole harvest and reduces those who come after to the rank of mere gleaners.' एकटाच सगळ्या पिकाची कापणी करून घेऊन जातो. बाकीच्यांना वेचायला उरले-सुरले थोडे दाणे राहतात. तसं गटे जर्मन साहित्यातलं सगळं सत्त्व, सगळं मोठेपण घेऊन गेला; मागून येणाऱ्यांना त्यानं काही ठेवलंच नव्हतं.

पण माणूस म्हणून म्हणे तो स्वार्थी, दुसऱ्याचा दुस्वास करणारा, आत्मकेंद्रित, अहंमन्य होता. तो कुणालाच मोजत नसे. कुणाला पुढे जाऊ देत नसे. कुणी वर चढायला लागला, तर हा त्याचे पाय ओढी.

सॉमरसेट मॉमनं गटेवर एक निबंध लिहिला आहे. त्यात त्यानं गटेचे गुण सांगितले आहेत, अवगुणही दाखवून दिले आहेत आणि असल्या माणसाकडे पाहताना कोणत्या आरशातून पाहायचं, ते सांगण्यासाठी एक परीकथा कथन केली आहे.

एक होती राजकन्या. अत्यंत रूपवती. खूप म्हणजे खूपच सुंदर... तिला एक शाप होता. 'तू सूर्याच्या किल्ल्यात कैदेत राहशील. तुझ्यासाठी स्वत:चा जीव संकटात टाकून जर कुणी तिथे पोहोचला, तरच तुझी सुटका होईल.' कित्येकांनी स्वत:चा जीव संकटात टाकून तिला सोडवायचा प्रयत्न केला; पण कुणालाच यश आलं नाही. कुणालाही राजकन्या मिळाली नाही. अखेर अनेक वर्षांनी एकजण तिथे पोहोचला; आणि...

तिला पाहून त्याला प्रचंड धक्का बसला.

तिचे केस पिकले होते. चेहऱ्यावर सुरकुत्या पडल्या होत्या. कातडी सुरकुतली होती. डोळे खोल गेले होते. त्यानं राजकन्येला विचारलं, ''तूच का ती राजकन्या? सारं जग जिची प्रशंसा करत आलं, ती?''

ती म्हणाली, ''होय, तीच मी. पण तू पाहतोस, त्या डोळ्यांनी तुला माझं खरं रूप दिसणार नाही. हा आरसा घे. यातून माझ्याकडे बघ. तुला माझं खरं रूप दिसेल. आरसा कधी खोटं बोलायचा नाही.''

राजपुत्रानं आरशात पाहिलं. आरशात त्याला जगातली सर्वांत सुंदर अशी अप्सरा दृष्टीस पडली.

कवीचं खरं रूप आपल्याला त्याच्या कवितेच्या आरशात पाहता यायला हवं. कवी प्रत्यक्षात आहे कसा, ते पाहायला जाऊ नये.

। ८९ ।

कौरवांचं सैन्य अकरा अक्षौहिणी. पांडवांचं फक्त सात अक्षौहिणी. तरीही भारतीय युद्धात जय पांडवांचाच झाला. का? याचं उत्तर भीष्मानं दिलं. पांडवांच्या पक्षात श्रीकृष्ण होता आणि जिकडे श्रीकृष्ण असेल, तिकडेच विजय असणार.

पण हे उत्तर नीतिशास्त्राचं, धर्मशास्त्राचं. युद्धशास्त्रानं काय उत्तर दिलं असतं?

पांडवांचं सैन्य संघटित होतं, या सैन्यातलं कुणी कुणाला फितुर झालं नाही, सगळे एकमेकांना सांभाळत होते, पायदळ, घोडदळ, सारे सैनिक सेनापतीच्या आदेशांचं पालन करत होते, सगळ्यांनी पांडवांच्या विजयाचाच ध्यास घेतला होता; आणि सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे, कोणत्या प्रसंगी काय करायचं, हे सांगणारा श्रीकृष्ण त्यांच्या पक्षात होता.

सैन्य जेव्हा अशा प्रकारे संघटित असतं, तेव्हा ते संख्येनं कमी असलं, तरी विजय नेहमी त्याचाच होतो.

युद्धशास्त्राचा हा नियम आपल्याला आपल्या जीवनाला लावता येईल का? जीवन म्हणजे एक प्रकारचं युद्धक्षेत्रच. यात इंद्रियं हे आपलं सैन्य, मन सेनापती; आणि बुद्धी सारथी. तिघांची एकी व्हायला हवी. इच्छा, वासना, क्रोध, लोभ, मद, मत्सर, भयादी घरभेद्यांना आपल्यामध्ये शिरू देता कामा नये.

आपण क्रोधाच्या आधीन झालो, तर आपलं सैन्य आंधळं होईल. भयाच्या आधीन झालो, तर ते भिऊन वाट फुटेल तिकडे पळत सुटेल. वासनेच्या आधीन झालो, तर ते विस्कळित होईल. मत्सरग्रस्त झालो, मोहवश झालो, तर ते गोंधळून जाईल. या साऱ्या घरभेद्यांना जीवनातून बाहेर हाकललं पाहिजे आणि जीवनाला अंत:करणातल्या श्रीकृष्णाच्या स्वाधीन करायला पाहिजे.

मग आपल्या जीवनाच्या रणांगणावर विजय आपलाच आहे.

। ९० ।

आपली परंपरा म्हणे आपण जपायला हवी. आपण आपल्या परंपरेचा म्हणे लोप होऊ देता कामा नये. कोणती परंपरा जपायची?

परंपरा जपायचे अनेक प्रयत्न या देशानं केले आहेत.

परंपरेनं आपल्याला जात मिळाली होती. ती जपण्यासाठी आपण, याच्या हातचं खायचं नाही, त्याची सावलीदेखील पडू द्यायची नाही, अशा प्रकारचे नियम केले. पदरी काय पडलं? ज्यांच्या हातचं आपण खातं नव्हतो, ज्यांना जवळ येऊ देत नव्हतो, ते आपल्याला सोडून दुसऱ्यांच्या पंथात गेले.

परंपरेनं आपल्याला एक भाषा मिळाली होती. जगातल्या भाषांमधली सर्वांत सुंदर अशी भाषा! चांगल्यातल्या चांगल्या साहित्यानं युक्त अशी भाषा! ती ब्राह्मणांव्यतिक्ति इतरांच्या जिभेवर घोळू लागली, तर भ्रष्ट होईल, अशी भीती आपल्याला वाटू लागली. भाषा जपण्यासाठी, ती 'परक्या लोकां'च्या जिभेवर चढू नये, ती त्यांच्या कानांवरदेखील पडू देऊ नये, अशा प्रकारचे कडक नियम

आपण केले. पदरात काय पडलं? 'परके लोक' अशिक्षित राहिले. त्यांना दुसऱ्या लोकांनी आपल्या भाषा शिकवल्या आणि आपलंसं करून घेतलं.

परंपरेनं आपल्याला एक धर्म मिळाला होता. तोही तसाच – सर्वांना आपल्यात सामावून घेणारा, सर्वांना आपापल्या इच्छेनुसार उपासना करण्याची मोकळीक देणारा. तो आपल्याला जपायचा होता. आपण परदेशात गेलो, तर तो बुडणार; म्हणून मग आपण काय केलं? परदेशगमन करायचंच नाही, असा नियम केला. समुद्र-यात्रा करायची नाही, असं ठरवून टाकलं.

पदरात काय पडलं? परदेशांतले लोक इथे आले. त्यांनी आपला धर्म आमच्या लोकांना देऊन त्यांना आमच्यापासून फोडलं.

परंपरा जतन करण्यासाठी या देशानं जे जे केलं, ते ते सारं अंगलट आलं. आपण जपू शकलो, ती केवळ आपली दुबळी अंगं. आपण कोत्या मनाचे आणि संकुचित दृष्टीचे लोक होऊन राहिलो.

एकच माणूस होऊन गेला या देशात, ज्यानं सांगितलं – परंपरा जतन करायची, तर एक करा : उघडून टाका तुमची सगळी दारं आणि खिडक्या. फिरू द्या वेगवेगळ्या संस्कृतीचे वारे तुमच्या घराभोवती. तुमच्या परंपरेत जे टिकण्यासारखं असेल, ते टिकून राहील; आणि उडून जाण्यासारखं असेल, ते उडून जाईल. उडून जातंय, ते जाऊ द्या. जे टिकून राहील, ते जगापुढे ठेवा. जगाला देण्यासारखं तुमच्याकडे जे आहे, ते या खुल्या वातावरणात देऊन टाका. जे घेता येईल, ते घेऊन मोकळे व्हा. फक्त एकच करा – आपण पार भिरकावले जाणार नाही, हे पहा. 'Refuse to be blown off by any of these cultures.'

परंपरा जतन केली पाहिजे म्हटलं, की आपण नासकं-कुजकंही सगळं सांभाळून ठेवतो आणि परंपरा तोडली पाहिजे म्हटलं, की जे चांगलं आहे, ते ते सारं आपण मोडून-तोडून टाकतो.

विवेकाला स्थानच नाही का आपल्या आयुष्यात?

। ९१ ।

परवा एकजण भेटला. दात-ओठ खात म्हणू लागला, "हिंदू धर्मात किती तरी वाईट, कुजकं-नासकं भरलेलं आहे. त्याला सुधारताच येणार नाही. सुरुंग लावून उडवून द्यायला पाहिजे. Blow off करून टाकलं पाहिजे."

मी म्हटलं, "शंकाच नाही. हिंदू धर्मात वाईट, कुजकं-नासकं खूप भरलेलं

आहे. पण असलं वाईट, कुजकं-नासकं तुला ख्रिस्ती धर्मातही पाहायला मिळेल. एवढंच कशाला, बौद्ध धर्मातही पाहायला मिळेल. तू म्हणतोस, तसे हेही धर्म तुला सुरुंग लावून उडवून द्यावे लागतील.''

आधुनिक संस्कृती म्हणून आज जिची सगळेच स्तुती करू लागले आहेत, तिच्यातही वाईट, कुजकं-नासकं खूप भरलेलं आहे. असं सगळं वाईट, कुजकं-नासकं भरलेलं असताना हिंदू धर्मानं रामकृष्ण, विवेकानंद, रवींद्रनाथ, गांधी, अरविंद यांच्यासारखे युगपुरुष जगाला कसे काय दिले? बुद्धदेखील हिंदू धर्मानंच दिला जगाला. हिंदू धर्मात फक्त वाईट, कुजकं-नासकं तेवढंच नाही. असंही काही तरी त्यात आहे, ज्यामुळे या श्रेणीचे महापुरुष यात जन्माला येऊ शकतात. ते काय आहे, हे शोधून काढूया आणि लोकांपुढे ठेवूया. लोकांना ते नीट समजू लागलं, की सारं वाईट, कुजकं-नासकं आपसूक गळून पडेल.

रवींद्रनाथांनी एके ठिकाणी म्हटलंय, ''वातीचं वरचं टोक पेटतं, म्हणजे संपूर्ण वातीतच पेटायची क्षमता असते. तिच्या खालच्या टोकातही ती क्षमता असते, असं धरून चाललं पाहिजे. निराशेचं कारण नाही. खालचं टोक पेटणारच नाही, असं म्हणता येणार नाही.''

कोणत्याही धर्माची परीक्षा त्याच्या वाईट बाजूवरून करणं बरोबर नाही. त्याची चांगल्यात चांगली अंगं पाहूनच ती करायला हवी.

सेक्युलरिस्टही या माणसासारखेच. धर्माचं नाव काढताच त्यांचं डोकं उठतं. ते हिंदू धर्मालाच नव्हे; तर सगळ्याच धर्मांना सुरुंग लावायला हवा, असं म्हणतात आणि धर्माचं स्थान संस्कृतीला, कल्चरला देऊया, म्हणतात. त्यांचाही दोष नाही. कारण धर्मावर कब्जा केला आहे, तो धर्मपीठांनी. धर्माचा अर्थ लावण्यासाठी, त्यावर भाष्य करण्यासाठी त्यांनी धर्मगुरू तयार केले आणि सगळ्यांना कोणत्या ना कोणत्या तरी धर्मग्रंथात गुंतवून टाकून त्यांच्यातलं माणूसपणच नष्ट करून टाकलं. धर्मच जिथे धर्माचे शत्रू होऊन बसले, तिथे आधुनिक सेक्युलरिस्ट त्याचं नाव घेताच दात-ओठ खाऊ लागले, तर त्यात नवल कसलं?

पण धर्माची जागा संस्कृती कशी घेऊ शकेल? संस्कृती म्हणजे एक फळ – धर्माच्या वृक्षाला आलेलं. वृक्षच नकोसा झाला, तर फळ कुठून चालेल?

संस्कृतीला धर्मपीठं लागत नाहीत, हे खरं. ती कोणत्याच धर्मगुरूला मानत नाही, ती कोणत्याच धर्मग्रंथाला चिकटून बसून राहिलेली नसते, हेही खरं. धर्मापेक्षा संस्कृती उदार. पण संस्कृतीचं फळ लागतं ते धर्माच्याच वृक्षाला, हे विसरून कसं चालेल?

संस्कृती म्हणजे नाच-गाणी नव्हे, नाटक-सिनेमा नव्हे आणि कवि-सम्मेलनंही नव्हेत. काळजी घ्यायला हवी, ती वृक्षाची. त्याला कीड लागली, तर ती मारून टाकायला हवी. त्याच्या मुळांना दुखापत झाली असेल, तर त्यावर उपाय करायला हवा. त्याला खत-पाणी मिळतं की नाही, हे पाहायला हवं. थोडक्यात, धर्म सुधारायला हवा.

चार गोष्टींची गरज आहे ही सुधारणा करण्यासाठी – विवेकाची, तेजस्वितेची, संस्कारितेची आणि निष्पाप असण्याची. पण या चार गोष्टीदेखील धर्मच आपल्याला देतो, त्याचं काय करायचं?

। ९२ ।

समाजाच्या नजरेतून आपण उतरू नये; म्हणून माणूस नेहमीच जपत आलाय.

समाज त्याला नेहमी नीट ओळखेलच, याची खात्री नाही. कधी-कधी तो नाहीच ओळखत त्याला. कधी गैरसमजही करून घेतो. पण माणूस स्वतःशी प्रामाणिक असेल, तर गैरसमजांपायी तो खंत करत बसणार नाही.

त्यांची फारशी पर्वाच तो करणार नाही. तो म्हणेल, ''गैरसमज कायम राहणार नाहीत. ते ढगांसारखे आज आकाशात जमतील आणि उद्या उडून जातील. 'तू करतोस ते योग्यच आहे', असं माझं हृदय जोपर्यंत मला सांगतंय, तोपर्यंत मी माझ्या हृदयाचंच ऐकणार.'' असं म्हणून तो गैरसमज पसरलेले असतानाही छाती पुढे काढून चालत राहील.

पण समजा, समाज त्याला मानतो आहे; मात्र त्याच्या स्वतःच्या लेखीच त्याची किंमत कमी झाली, त्याचं मन त्याला म्हणू लागलं, 'तू करतो आहेस, ते योग्य नाही, तुला हे शोभत नाही,' तर?

माणूस छाती पुढे काढून कधीच चालू शकणार नाही. लोक आपल्याला महान समजत असतील; पण खरं तर आपण क्षुद्र, लहान आहोत, असंच त्याला वाटत राहील आणि तो मान खाली घालून चालू लागेल.

याचा अर्थ समाजापेक्षा हृदय श्रेष्ठ, असाच झाला ना? समाजाच्या नजरेतून आपण उतरू नये, म्हणून माणूस जेवढं जपतो, त्याहून जास्त काळजी आपल्या स्वतःच्या नजरेतून आपण उतरू नये म्हणून घेतो का? समाजाला माणूस फसवू शकतो. स्वतःला कसं फसवता येईल?

। १३ ।

एक मुसलमान – बादशाह खान यांच्या परंपरेतले; दिवसातून पाच वेळा नमाज पढणारे.

त्यांनी कुराणाची पारायणं केली आहेत. पण सूर, तुलसी, मीरा, कबीरही त्यांच्याच पुढ्यात बसून वाचले आहेत. अत्यंत निर्मळ, पावन मनाचा माणूस. इतका निर्मळ मनाचा हिंदू गोव्यात तरी मला पाहायला मिळालेला नाही. पाच वर्षं आम्ही एकमेकांच्या शेजारी राहिलो आहोत.

एक दिवस ते मला म्हणाले, ''मी हिंदू व्हायला तयार आहे. करून घेतोस?''

मी म्हटलं, ''आर्यसमाजी लोकांना सांगून करून घेता येईल. बोलावून घेऊ?''

''मग हिंदू झाल्यावर माझा समावेश तू कोणत्या जातीत करशील?'' त्यांनी विचारलं.

मी विचारात पडलो. मग विचारलं, ''मुसलमान होण्यापूर्वी तुमच्या पूर्वजांची जात कोणती होती?''

''महार.'' ते उत्तरले. मी पार गारच पडलो. म्हटलं, यांना हिंदू करून घेतल्यावरही जर हे महारच गणले जाणार असतील, तर यांना हिंदू कशाला करून घ्यायला हवं? असेनात का मुसलमान. मानानं ती जगतील तरा!

केवढ्या क्रांतीची वाट पाहतोय हिंदू समाज, अंदाज तरी आहे हिंदुत्ववाद्यांना?

। १४ ।

परवा एका ख्रिस्ती बांधवानं विचारलं, ''ख्रिस्ताविषयी तुम्हा हिंदूंना काय वाटतं?''

म्हटलं, ''प्रथम मला काय वाटतं, ते सांगतो. चाळीस वर्षांपूर्वी मी 'When I survey the wondrous cross on which the prince of Glory died.' हे ख्रिस्ती भजन ऐकलं, तेव्हा माझं मन उचंबळून आलं होतं. या भजनातलं–

See from His head, His hands, His feet,
Sorrow and love flow mingling down;
Did ever such love and sorrow meet;
Or thorns compose so rich a crown?

हे कडवं ऐकलं, तेव्हा डोळ्यांतून घळघळा अश्रू वाहू लागले आणि काळजाच्या तळातून शब्द वर आले–

Were the whole realm of nature mine,
That were an offering far too small;
Love so amazing, so divine,
Demands my soul, my life, my all.

तेव्हापासून आता चाळीस वर्षं होत आली, ज्या ज्या वेळी कानांवर हे भजन पडतं, त्या त्या वेळी माझं मन त्या दिवसासारखंच उचंबळून येतं आणि त्या दिवसासारखेच डोळ्यांतून घळघळा अश्रू वाहू लागतात.

ख्रिस्त तुमचा; ख्रिस्ती बांधवांचा! असू दे; पण तो तितकाच माझाही आहे. माझ्या काळजाच्या देव्हाऱ्यात त्याला मी सदैव विराजमान झालेला बघतो, मला तो नेहमीच प्रेरणा देत असतो.

हे झालं 'ख्रिस्ताविषयी मला काय वाटतं?' या प्रश्नाचं उत्तर. पण तुमचा प्रश्न 'इतर हिंदूंना काय वाटतं?' हा होता.

या प्रश्नाच्या उत्तरानं मात्र तुम्ही थोडे दुखावाल; पण त्याला उपाय नाही. सांगून टाकतो.

परवा माझ्या भाचीनं मला एक गोष्ट सांगितली. तिची मुलगी केजीत शिकते. केजीत तिला एक ख्रिस्ती मैत्रीण मिळालीय. तिच्याच वयाची. गुड फ्रायडेच्या दिवशी ही मैत्रीण चर्चमध्ये गेली. तिथून परतल्यावर ती माझ्या भाचीला म्हणाली, "You know, we cried a lot in our church; because our God died."

"Who is your God?" माझ्या भाजीनं तिला प्रश्न केला.

"Our God is the English God Jesus Christ. जीझस ख्राइस्ट.'' तिनं उत्तर दिलं.

"Jesus christ is my God also." माझी भाची म्हणाली.

"Ya... must be; because you also speak English." ती म्हणाली.

हिंदूंपुढे ख्रिस्ताचं रूप आहे, ते हे – 'इंग्लिश गॉड'चं. यामुळे हिंदूंना तो परका वाटला, तर नवल नाही. तो आमचा नाही. त्याला परके लोक इथे घेऊन आले आहेत, आम्हाला बाटवण्यासाठी वा फसवण्यासाठी, असं सामान्य हिंदूंना वाटलं, तर दोष त्या हिंदूंना देता येणार नाही. ज्यांनी ख्रिस्ताला 'इंग्लिश गॉड'चं रूप दिलं, त्यांना दोष द्यायला हवा. त्याला हे रूप कोणी दिलं, याचा विचार करून पहा, म्हणजे मगच कोण कुठे चुकतं, ते तुम्हाला नीट कळेल.

वीस-पंचवीस वर्षांपूर्वी एका सेमिनरीत गेलो होतो – 'गांधी आणि धर्म' या विषयावर बोलण्यासाठी. तिथे मी सेमिनरीतल्यांना मोकळेपणानं सांगून टाकलं – एक तर ख्रिस्ती धर्माला युरोपच्या प्रभावातून मुक्त करायला हवं आणि हे होण्यासारखं नसेल, तर ख्रिस्ताला तरी ख्रिस्ती धर्मातून वेगळं काढायला हवं.

ख्रिस्ताला 'सर्वांचा' होण्यात आडवं येतं, ते हे 'इंग्लिश गॉड'चं रूप.

। १५ ।

बुद्धी आणि भावना या दोहोंमध्ये द्वंद्व कशाला असायला हवं? जीवनात दोन्हींचं स्थान आहे. दोघींनी हातात हात घालून चालायला हवं.

बुद्धी निर्णय देते, 'अमुक एक गोष्ट बरोबर आहे' म्हणून.

पण त्यानुसार चालायचं, तर माणसाला फक्त बुद्धीच्या बळावर चालता येत नाही. ती उपयोगात आणण्यासाठी त्याच्यात एक शक्ती असावी लागते. त्या शक्तीचं नाव भावना.

भावना-शक्ती दुबळी पडली, तर माणूस अकर्मण्य होतो. बुद्धीनं सांगितलं त्याप्रमाणे मानून चालताना त्याची चलबिचल होत राहिली वा तो अकर्मण्य झाला, तर ऐन परीक्षेच्या वेळी तो निर्वीर्य होईल; केविलवाणा होईल. याउलट माणसापाशी फक्त भावना असली, तिच्यावर बुद्धीचा, विवेकाचा अंकुश नसला, तर ती विकाराधीन होईल आणि माणसाला कुठच्या कुठे भरकटवत नेईल.

म्हणून जीवनात बुद्धी हवीच; पण ती चालवण्यासाठी तिच्याबरोबरच भावनाही हवी. जीवनात भावना हवी; पण तिला विवेकाचे डोळे देणारी बुद्धीही हवी.

मला नुसते बुद्धिवादी आवडत नाहीत. नुसते भावनाविवश लोकही आवडत नाहीत.

दोन्हीचा समन्वय ज्यांच्या जीवनात झाला आहे, असेच लोक आवडतात.

बुद्धिवादी माणूस खरोखरीच बुद्धिवादी असेल, तर बुद्धीच्या पलीकडे एक गोष्ट आहे; आणि तिला श्रद्धा म्हणतात, हे त्याला बुद्धीच सांगेल.

जिथे बुद्धी पोहोचत नाही, तिथे श्रद्धा पोहोचते. बुद्धीचं स्थान डोक्यात; तर श्रद्धेचं हृदयात.

बुद्धीच्या बळापेक्षा हृदयाचं बळ हजार पटींनी अधिक. कर्तृत्ववान माणूस हा जास्त श्रद्धावान असतो. श्रद्धा 'can move mountains.' श्रद्धावंताला

कोण पराजित करू शकेल? बुद्धिमान माणूस पावला-पावलाला पराजित होतो. प्रल्हादात अशी कितीशी बुद्धी होती? पण श्रद्धा? ती मेरू पर्वतासारखी अचल होती.

बुद्धीनं भौतिक ज्ञानाची वाढ होते; श्रद्धेनं अंतर्ज्ञानाची. ही वाढ होण्यासाठी अंत:शुद्धीची गरज असते. किती तरी बुद्धिमान; पण चारित्र्यहीन माणसं मी पाहिली आहेत. श्रद्धावंत कधी चारित्र्यहीन झालाय?

। १६ ।

उठता-बसता अहिंसेचा जप करणाऱ्या बुद्ध, महावीर, गांधींच्या या देशात गुरांना मारणारे किती कत्तलखाने चालावेत? छत्तीस हजार? रोज सकाळी या देशात लाखो गुरांची कत्तल होते.

याचा पर्यावरणावर काहीच परिणाम होत नाही, असं म्हणता येईल का? झाडं तोडल्यावर होतो, जंगलतोड केल्यावर होतो, जंगलातले पशु-पक्षी मारल्यावर होतो, एवढंच काय; कृमी-कीटक मारल्यानंही होतो. मग गायी, कोंबड्या, बकरे यांचा जो संहार चालतो, त्यानं काहीच परिणाम होणार नाही? होणारच. निसर्गातल्या कशालाच दुसऱ्या गोष्टींपासून वेगळं काढता येत नाही. सगळे एकमेकांशी बांधलेले असतात. निसर्गाच्या कोणत्याही एका अंगास दुखापत झाल्यास भोवतालच्या संपूर्ण सृष्टीवर त्याचा कोणता तरी परिणाम हा व्हायलाच हवा.

परिणाम आपल्याला दिसला नाही, म्हणजे तो झालाच नाही, असं कसं म्हणता येईल? जे आपल्याला समजत नाही, ते अस्तित्वातच नाही, असं म्हणता येईल का?

बरं, माणूस फक्त गाय, डुक्कर, कोंबड्या, बदकं एवढंच मारतो का? माणसं एकमेकांच्या अंगावरही धावून जातात. माणसासारख्या माणसालाही – तो दुसरा धर्म मानतो, दुसऱ्या देशात राहतो, दुसरी भाषा बोलतो म्हणून – माणूस मारू लागला आहे. हल्ली तर त्याचं डोकंच फिरलेलं दिसतंय. याचा पर्यावरणावर काहीच परिणाम होत नाही, असं म्हणता येईल का?

*'जीवो जीवस्य जीवनम् ।'* हा निसर्गाचा नियम. या नियमाला अनुसरून जीव दुसऱ्या जिवाला मारून खातात, हेही खरं. निसर्गनियमानुसार जीव म्हातारे होऊन मरतात, हेही खरं. काही 'ॲक्सिडेंट'मध्ये मरतात, हेही खरं. हे सगळं निसर्गचक्राचा भाग म्हणून घडतं, 'स्वाभाविक'पणे घडतं; पण माणूस माणसाला

निसर्गनियमानुसार मारतो, असं म्हणता येणार नाही. शेवटी प्राण म्हणजे प्राण. मग तो कृमी-कीटकांचा असो, गुरा-कोंबड्या-बदकांचा असो, की माणसाचा असो. प्राणाच्या नैसर्गिक, स्वाभाविक गतीमध्ये माणूस अडथळा आणू लागला, तर निसर्गाचं तन-मन थरथरणारच. त्याच्या लहरी सर्वत्र उमटणारच. 'जग' म्हणजे जगतं, ते. जीवन. आणि जीवनाचं कोणतंच अंग दुसऱ्या कोणत्या अंगापासून वेगळं काढता येत नाही. एक ब्रह्मपट आहे हा – तऱ्हेतऱ्हेच्या आडव्या-उभ्या धाग्यांनी विणून काढलेला.

आजपर्यंत माणूस निसर्गाचा विचार चार मंडळांना (स्फियर्सना) धरून करत आला. स्थलमंडळ, वायुमंडळ, जलमंडळ आणि जीवमंडळ – लिथॉस्फियर, ॲटमॉस्फियर, हायड्रोस्फियर आणि बायोस्फियर. या चारांपलीकडे आणखी एक मंडळ असतं, ज्याला ज्युलियन हक्स्ले, तैयार द शार्दांसारखे शास्त्रज्ञ 'नोओस्फियर' म्हणतात. 'नोओस्फियर' म्हणजे चित्तमंडळ – चैतन्यानं भरलेलं, असं. त्याचा परिणाम पहिल्या चार मंडळांवर होतो.

त्याअर्थी जगात चाललेल्या हिंसेचा परिणाम पर्यावरणावर कुठे ना कुठे तरी व्हायलाच हवा.

परवा अचानक एकाच्या तोंडून 'बिस' सिद्धांताविषयी ऐकायला मिळालं. बिस म्हणजे बजाज, इब्राहीम, सिंह या तिघांचा सिद्धांत. तिघेही देशातले श्रेष्ठ शास्त्रज्ञ. जगदीशचंद्र बोस यांच्या परंपरेतले. तिघेही दिल्ली विद्यापीठात अध्यापन करतात. ते म्हणतात–

"हिंसेचं तांडव ज्या ज्या वेळी आणि जिथे जिथे चाललं आहे, त्या त्या वेळी तिथे पृथ्वीचा थरकाप झालाय. तिला ही हिंसा सोसली नाही. जगात जे भूकंप होतात, त्यांच्या मुळाशी पृथ्वीचा हा थरकापच असतो." आणि मला एकदम आठवलं. गांधींची अस्पृश्यता-निवारणाची चळवळ बिहारमध्ये जोरात चालली होती, त्याच वेळी बिहारात भूकंपाचा धक्का बसला. "पाहिलंत? तुम्ही अस्पृश्यता पाळता; म्हणून हा भूकंप झाला. ईश्वराला सोसत नाही ही अस्पृश्यता." असं त्या वेळी गांधीजी म्हणाले होते. काहीजण गांधींना हसले होते; तर काहीजण ते असली अवैज्ञानिक विधानं करतात, म्हणून दुःखी झाले होते. कितीही झालं, तरी तो राजकारणातला माणूस! अस्पृश्यता नष्ट करण्याच्या तुमच्या प्रयत्नांपायीच भूकंप झाला, देवाला तुमचा हा प्रयत्न सहन झाला नाही, असं कुणी म्हणायच्या आधीच 'तुम्ही अस्पृश्यता पाळता; म्हणूनच हा भूकंप झाला', असं आपणच म्हणून टाकलेलं बरं, असा विचार करून गांधींनी ते विधान केलं, असं काहीजणांना वाटलं.

गांधी राजकारणी होते हे खरं; पण आपल्या राजकारणासाठी वाटेल त्या साधनांचा उपयोग करणारे नव्हते. साध्यापेक्षा त्यांचं लक्ष साधनांकडे अधिक असे. नैतिक चुकांचा परिणाम भौतिक जगावर झालाच पाहिजे, असं खरोखरीच त्यांना वाटत असावं.

पुढल्या खेपेस दिल्लीला जाईन, तेव्हा बजाज, इब्राहीम आणि सिंह यांना जाऊन भेटावं आणि त्यांचा हा सिद्धांत समजून घ्यावा म्हणतो.

। १७ ।

चीनच्या पेकिंग शहरात आणि त्याच्या भोवतालच्या परिसरात एकही पक्षी दृष्टीस पडला नाही. तेच कशाला, उघड्या-बोडक्या डोंगरांमधल्या निर्जन प्रदेशातून जाणाऱ्या ग्रेट वॉलला लागून असलेल्या परिसरातही पक्षी ना पाहायला मिळाले, ना ऐकायला मिळाले. 'हे असं कसं?' म्हणून आश्चर्यानं विचारलं, तर माओच्या सरकारनं सगळे पक्षी मारून टाकले, असं उत्तर मिळालं. का मारून टाकले, तर म्हणे ते शेतात पिकणारे दाणे खातात, म्हणून.

मी म्हटलं, "पक्षी दाणे खातात, त्यापेक्षा किती तरी अधिक धान्याची नासाडी पिकावर पडणारी कीड करते." त्यावर, 'हे आता आमच्या लक्षात आलं', असं उत्तर मिळालं.

कीड मारण्यासाठी काय केलं? डी.डी.टी.सारखी औषधं मारली. परिणाम काय झाला, तर फुलपाखरंही मेली. फुलपाखरं एका फुलावरून उडून दुसऱ्या फुलावर बसायची आणि फुलातला मध खाता-खाता परागीकरण – म्हणजे पॉलिनेशनही करायची. त्यामुळे फुलांतून फळं यायची. फुलपाखरं मेल्यामुळे फळं येईनाशी झाली.

अमेरिकेत एके काळी सर्प-सत्र आरंभण्यात आलं होतं. सगळे सर्प मारून टाकण्यात आले. परिणामी, उंदीर वाढले आणि अमेरिकेला नको जीव करू लागले.

आता म्हणे अमेरिकेनं वेगवेगळ्या ठिकाणांहून साप आणून त्यांना पोसायला सुरुवात केली आहे. चीनमध्येही आता सरकार वेगवेगळ्या ठिकाणांहून पक्षी आणून सोडू लागलं आहे.

निसर्गात एक संतुलन असतं–

उंदीर वाढले, तर त्यांना खाणारे वेगवेगळ्या प्रकारचे सर्प असतात. साप वाढले, तर त्यांना खाणारे मुंगुस असतात. निसर्गातला प्रत्येक जीव

निसर्गाला काही ना काही देत आला आहे आणि त्या बदल्यात निसर्गाकडून काही ना काही घेत आला आहे. सजीवाच्या कोणत्याही जातीची वाढ प्रमाणाबाहेर झाली, तर तिला आळा घालण्याचं काम निसर्गातलाच दुसरा कोणता तरी जीव करत आला आहे. ज्याचा काही उपयोग नाही, असा एकही जीव निसर्गात नाही.

माणसानं कोणत्याच जीवाची हत्या करता कामा नये. जगण्याचा हक्क जसा आपल्याला आहे, तसाच त्यांनाही तो आहे. ईश्वरानं धरती काही फक्त माणसासाठी निर्मिलेली नाही; त्यांच्यासाठीही निर्माण केली आहे.

ज्ञानानं माणूस शहाणा होण्याऐवजी कधी-कधी आंधळा होतो आणि निसर्गातलं एक दुखणं दूर करता-करता दुसरी दहा दुखणी निर्माण करून ठेवतो.

आपल्या वडीलधाऱ्यांनी निसर्गाच्या संतुलनाला 'यज्ञचक्र' असं नाव दिलं होतं. आणि हे यज्ञचक्र सुरळीत चालत राहावं म्हणून त्यांनी आपल्याला एकीकडे गोरक्षणाचा संदेश दिला; तर दुसरीकडे तुळशीची पूजा करायला शिकवलं. गाय हे मुक्या जनावरांचं प्रतीक; तर तुळस हे वनस्पतिसृष्टीचं प्रतीक. जीवसृष्टी आणि वनस्पतिसृष्टीच्या संगतीनं माणूस जगू लागेल, तेव्हाच तो माणूसपणाला जागू लागेल.

। १८ ।

जगाचे आज दोन भाग झाले आहेत–

एक विकसित – डेव्हलप्ड्; आणि दुसरा विकसनशील – डेव्हलपिंग.

विकसित देश कोणते? युरोपातले – इंग्लंड, फ्रान्स आणि जर्मनी, आशिया खंडातला जपान; आणि अमेरिका खंडात युनायटेड स्टेट्स् ऑफ अमेरिका. जगातले फक्त चोवीस टक्के लोक या देशांतून राहतात.

हे चोवीस टक्के लोक किती खातात?

जगात शंभर लीटर दुधाचं उत्पादन होत असेल, तर यांच्या वाट्याला येतं ७२ लीटर. मांस-मासळीचंही तसंच. शंभर किलोमधलं ७२ किलो. अन्न शंभर किलोमधलं ७५ किलो. कागद शंभर रिमं तयार होत असेल, तर ८१ रिमं हे लोक वापरतात. तांबं शंभर किलोतलं ८६ किलो, लोखंड ८५ टक्के, वाहनं शंभरातली ९७, ऊर्जा ७५ टक्के हे लोक वापरतात; आणि कार्बन-डायॉक्साइड सर्वात जास्त प्रमाणात (७० टक्के) हेच लोक वातावरणात सोडतात.

विकसित आणि विकसनशील देशांत केवढं मोठं अंतर हे!

। ९९ ।

संन्यासी म्हणजे सर्व-संग-परित्यागी. घर-दार, बायको-मुलं, सगे-सोयरे यांच्यापासून, एवढंच नव्हे; तर समाजापासूनही दूर गेलेले.

त्यांना समाजाचे कोणतेच नियम लागू होत नाहीत.

पण एक गोष्ट महत्त्वाची – ते समाजाला सोडून जात नाहीत. होता होईल, तेवढी समाजाची सेवा करतात. ते उपदेश करतात, भक्ती शिकवतात, होता होईल तेवढं करतात; बदल्यात काही घेत नाहीत.

समाजावर त्यांचे हे जे उपकार होतात, ते पाहून समाजानं एक नियम केला – त्यांच्या जेवण्या-खाण्याची व्यवस्था समाजानं करायची. ते गावात आले, की त्यांचं अतिथ्य करायचं. किमान तीन दिवस तरी त्यांची सरबराई करायची.

समाजाचा हा 'धर्म' होय, असं पूर्वसुरींनी सांगितलं.

या धर्माचं पालन केल्यानं समाजाच्या वाट्याला जे काही पुण्य यायचं, त्यांच्याशी संन्याशांना काही देणं-घेणं नसायचं. देवानं दिलं, ते घेतलं, असं मानून ते एका गावातून दुसऱ्या गावात निघून जायचे.

अशा या संन्याशांनाही आपल्या वडीलधाऱ्यांनी एक नियम घालून दिला होता. तुम्ही कुणाकडेही राहा, कुणाच्याही हातचं खा, उच्च-नीच असं काही तुम्हाला लागू नाही. पण...

राजाकडे जाऊन तुम्ही त्याचं अन्न सेवन करू नका.

का? तर, *'राजान्ते नरकः।'* राजा कुणीही असो, अंती तो नरकात जातो, असा एक समज आहे.

विचार करण्यासारखी गोष्ट आहे ही.

सध्याच्या काळात मी एक पाहिलंय–

ज्या स्वयंसेवी संस्था सरकारी मदतीवर चालतात, त्या अंती तेजोहीन होतात. संस्था नेहमी लोकांच्या आधारावर चालल्या पाहिजेत; सरकारच्या नव्हे. 'अ-सरकारी' हेच 'असर-कारी', हा काकासाहेबांचा मंत्र म्हणजे संन्याशानं राजाचं अन्न खाऊ नये, या पुरातन नियमाचाच नवा अवतार होय.

। १०० ।

प्रसिद्धी म्हणजे आमच्या महालसेसारखी. तिच्या नाना कळा. काल-परवापर्यंत जे नाव कुणी ऐकलंही नव्हतं, ते अकस्मात लोकांच्या जिभेवर घोळू लागतं.

फूलनदेवीला असली प्रसिद्धी मिळाली. दरोडे घालणारी ही बाई. पोलिसांच्या हाती सापडली आणि देशातल्या वृत्तपत्रांच्या 'फ्रंट पेज'वर झळकली. किती तरी नियतकालिकांनी तिच्यावर 'खास अंक' काढले आणि काही महिने संपायच्या आत ती विस्मृतीच्या काळोखात लुप्त झाली.

जवाहरलाल नेहरूंना लाभली, ती प्रसिद्धी दुसऱ्या प्रकारची. ती जी एकदा मिळू लागली, ती आयुष्यभर वाढत गेली होती. मृत्यूनंतरही वाढतच राहिली.

बुद्धाला आणि ख्रिस्ताला मिळाली, तीही याच जातीतली; पण अधिक वरच्या दर्जाची – दोन-दोन तीन-तीन हजार वर्षांनंतरही टिकून राहणारी; जगाच्या अंतापर्यंत राहणारी.

जवाहरलाल नेहरूंना ती इतकी मिळेल, असं वाटत नाही. हे फार फार तर अकबर आणि अशोकाच्या पंगतीला बसतील, कदाचित लेनिनच्या पंगतीला बसतील; पण बुद्ध आणि ख्रिस्त यांच्या पंगतीला बसणार नाहीत. बुद्ध आणि ख्रिस्ताच्या पंगतीला गांधी बसतील, एवढं नक्की!

पण प्रसिद्धीची आणखी एक तऱ्हा आहे–

जग सोडून गेल्यानंतर मिळते, ती. साहित्यविश्वात काफ्काला अशा प्रकारची प्रसिद्धी मिळाली आहे. तो हयात असताना त्याच्याकडे कुणाचंच लक्ष गेलं नव्हतं. ते त्याच्या मृत्यूनंतरच गेलं. आणि आता ते दिवसागणिक वाढत चाललं आहे. हिंदी साहित्य-जगतात गजानन माधव मुक्तिबोध यांच्या वाट्यालाही अशा प्रकारची ख्याती आली आहे. हयात असताना त्यांनी कुणी विचारलं नाही. आता त्यांच्यावर प्रबंध प्रसिद्ध होऊ लागले आहेत. फेर्नान्दु पेस्सोअ हा पोर्तुगीज कवीही याच जातीतला.

आमच्या परिचित जगात या प्रकारची प्रसिद्धी शणै गोंयबाब यांना मिळाली आहे. त्यांच्या काळातले लोक त्यांना मानत होते की नाही, माहीत नाही; पण त्यांच्या पश्चात पाच-सहा पिढ्यांवर त्यांचा प्रभाव दिसून येतो आहे. अजूनही तो प्रेरणा देतो आहे.

अशा लोकांना ओळखायला लोक जरा उशीर लावतात. पण एकदा का जगाला त्यांची ओळख पटली, की मग जग त्यांना विसरत नाही.

कोणत्या प्रकारच्या प्रसिद्धीची आकांक्षा धरावी?

बुद्ध आणि ख्रिस्ताला मिळाली, त्या प्रकारची प्रसिद्धी आवाक्यापलिकडची. जवाहरलालना मिळाली, तशी मिळावी; पण ती आकांक्षा पुरी होणं कठीण. पण काफ्का, मुक्तिबोध, शणै गोंयबाब यांना मिळाली, तशा प्रकारच्या प्रसिद्धीची तरी आकांक्षा धरावी.

आम्हा दळभद्री लोकांना आकांक्षा असते ती फूलनदेवीला मिळाली, तसल्या प्रसिद्धीची.

। १०१ ।

सव्वाशेवर काही वर्षं झाली. वालावलीकरांच्या घरात, पुढे शणै गोंयबाब म्हणून प्रसिद्धीस आलेल्या एका मुलाचा जन्म झाला. त्या दिवशी गोव्यात आणखीही शंभर-दीडशे मुलं जन्माला आली असतील. त्यापैकी या एकाचीच आठवण आपण काढतो. ती का?

गेल्या कित्येक वर्षांत गोव्यात हा एवढा एकटाच मोठा माणूस होऊन गेला, असं म्हणता येणार नाही. किती तरी मोठी माणसं होऊन गेली. मोठे कलावंत, मोठे संगीतकार, कवी, विद्वान, पत्रकार, राजकीय पुढारी, समाजसुधारक – विविध क्षेत्रांत इथे मोठमोठी माणसं होऊन गेली. शणै गोंयबाब याची आठवण काढतो, तशी त्यापैकी किती जणांची आठवण आपण काढतो? हा कोण आमचा? आजा, पणजा, खापरपणजा? याची आठवण आपण काढतो, ती का? प्रश्नाचं उत्तर एकच–

इतर सर्वांनी, ते स्वत: कोण आहोत, किती महान होते, ते आपल्याला दाखवून दिलं. यानं, आपल्याला आपण कोण आहोत, आपण किती महान आहोत, ते दाखवून दिलं. इतर सर्वांची आपण स्मारकं बांधली; याचं स्मारक नाही उभं केलं. का? कारण हा अजून मृत्यू पावलेला नाही. तो अजूनही आपल्याला प्रेरणा देत असतो. अजून आपल्याला पुढे नेत असतो. तो अजून आपल्यामध्ये जगते आहे. बाकीचे सारे काळाच्या पोटात गडप झाले.

जे मरतात, त्यांचीच स्मारकं बांधवी लागतात.

जिवंत असतो, तो आपल्याबरोबर जगतच असतो.

शणै गोंयबाबांनी जेव्हा कोकणीचा झेंडा हाती घेतला, तेव्हा त्यांच्याबरोबर कुणीच नव्हतं. त्यांच्या काळातले लोक त्यांना वेड्यात काढत होते. पण या 'वेड्या'कडे काळापलीकडे पाहणारी नजर होती. जे अजून जन्मालादेखील आलेले नाहीत, त्यांच्यासाठी काही करण्याची ताकद होती. 'त्यांच्याकडून काम करून घेण्याची' जिद्द होती. म्हणून...

तो आपल्या पुढच्या पाच पिढ्यांना प्रभावित करू शकला.

शणै गोंयबाबांना युगपुरुषच म्हटलं पाहिजे. नुसतं महापुरुष नाही; युगपुरुष – अनेक पिढ्यांना प्रभावित करणारा या अर्थानं.

। १०२ ।

उन्हात फिरून थकायला झालं. पाय आपसूक मांडवी हॉटेलच्या दिशेला वळले. तिथल्या बुकस्टॉलमध्ये शिरलो. 'एअर कण्डिशण्ड्' वातावरणात पुस्तकं पाहू लागलो. एक पुस्तक घेतलं आणि बाहेर सोफ्यावर बसून ते चाळू लागलो.

इतक्यात एक मित्र आत शिरला. मला बघून माझ्यापाशी आला आणि विचारू लागला, ''कुणाची वाट पाहतोयस की काय?''

''नाही. नुकतंच एक पुस्तक घेतलं आहे, ते चाळून पाहतो आहे.'' मी म्हटलं.

त्याच्याबरोबर आणखी एकजण आला होता. 'मीट माय फ्रेंड अमुक अमुक' म्हणून त्यानं आमची दोघांची एकमेकांशी ओळख करून दिली. नाव गोंयकारासारखं वाटलं म्हणून मी विचारलं, ''गोव्याचे का?''

''हो, अमुक ठिकाणचा...'' असं म्हणून तो मला काही विचारणार, इतक्यात तिसरा एकजण आत आला आणि ''अरे, तू इथे आहेस? मी तुला शोधतोय.'' असं म्हणून त्याला आपल्याबरोबर घेऊन गेला.

माझा मित्र मला म्हणाला, ''केवढा मोठा माणूस आहे, माहीत आहे तुला? अमक्या अमक्या कंपनीचा डायरेक्टर... किती बडे बडे गोंयकार गोव्याबाहेर असतात, गोंयकारांना माहीतदेखील नसतं.'' त्यानं आणखी दोन-तीन नावं घेतली. तिन्ही मला नवी होती.

''गोंयकाराला मोठी माणसं ओळखता येत नाहीत.'' मी म्हटलं.

''खरंय तुझं!'' त्यानं माझ्या म्हणण्याला दुजोरा दिला.

थोडा वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा मारून तो 'बरंय, भेटूया' म्हणून निघून गेला. वर त्यांची पार्टी होती.

मी पुन्हा सोफ्यावर बसून पुस्तक चाळू लागलो; पण लक्ष लागेना. मनात माझा आणि त्या 'बड्या गोंयकारा'चा संवाद सुरू झाला.

'तुमचं वय काय?' मी त्याला मनातल्या मनात विचारलं. त्यानं मला आपलं वय सांगितलं. मी हिशेब करून पाहिला. हा पंचवीस वर्षांचा असताना गोवा-मुक्तीचा लढा सुरू होता. यानं त्यात भाग घेतला होता का? नाही. घेतला असता, तर कुठे ना कुठे तरी गाठ पडली असती. गोव्यातून फिरंग्यांनी निघून जावं, म्हणून यानं काहीच केलं नाही. एवढी भली थोरली चळवळ; पण ती याच्या जगण्याला स्पर्श करू शकली नाही. गोवा मुक्त झाल्यानंतर इथे सर्वांत मोठी चळवळ झाली, ती महाराष्ट्राचं आक्रमण परतवून लावण्यासाठी. अख्खा

महाराष्ट्र एक होऊन गोव्यावर चाल करून आला होता. हा हल्ला परतवून लावण्यासाठी एवढी-एवढीशी मुलं शिक्षण सोडून, करिअर सोडून, जिवावर उदार होऊन पुढे सरसावली होती. हा त्यावेळी कुणाच्या बाजूनं होता? महाराष्ट्राच्या? छे! गोव्याच्या? अजिबात नाही. गोवा महाराष्ट्रात गेला काय, वेगळा राहिला काय, याला कशाचंच काही सोयर-सुतक नव्हतं. आपण, आपली बायको-मुलं, आपली करिअर, आपली मिळकत यापलीकडे यानं कशाचंच काही आपल्या मनाला लावून घेतलं नव्हतं. गोवा आपल्या अस्तित्वाच्या लढ्यात गुंतला असताना हा अलिप्तच होता. कोकणीच्या चळवळीत तरी हा पडला होता का? कोकणीला तिचं योग्य स्थान मिळावं, म्हणून यानं काही केलं का? कोकणी राहू नये, म्हणून यानं काय केलं? एखादा तरी रुपया खर्च केला आहे? कधी एकदा तरी याची झोप उडाली आहे? नाही. याला प्रश्नाचं काही सोयर-सुतक नव्हतं. गोव्याचा कोणताच प्रश्न यानं आपल्या मनाला लावून घेतला नव्हता.

मग हा कसला 'मोठा गोंयकार'?

याला गोंयकारांनी का म्हणून ओळखावं? ज्याला गोव्याशी काहीही कर्तव्य नाही, त्याच्याशी गोव्यालाही काही कर्तव्य नाही. गोव्यात कुणीच त्याला ओळखलं नाही, तर कुणी कुणाविरुद्ध तक्रार करायची?

आपण, आपली बायको-मुलं, आपली करिअर, आपली इस्टेट सोडून जे कोणत्याच 'भानगडी'त पडत नाहीत, ते माझ्या या मित्राच्या मते – त्याच्याच काय, अनेक गोंयकारांच्या मते – 'मोठे गोंयकार'; आणि ज्यांनी गोवा मुक्त करण्यासाठी हातभार लावला, तुरुंगवास भोगला, ज्यांनी गोवा गोवाच राहावा म्हणून रक्त आटवलं, ज्यांनी त्याला एक भाषा दिली आणि त्याला त्याचं एक व्यक्तिमत्त्व मिळवून दिलं, ते कोण? खोटारडे? रस्त्यावर पडलेले? गोंयकारांना मोठी माणसं ओळखता येत नाहीत, असं जे मी म्हटलं ते खोटं का? गोवा लहानसा. मोठेपणाचे त्याचे आदर्शही किती लहान!

। १०३ ।

काकासाहेब कालेलकर गुजरात विद्यापीठाचे कुलगुरू होते, तेव्हाची उमाशंकर जोशी यांनी सांगितलेली एक गोष्ट.

'वीणा' नावाचा एक वार्षिक अंक गुजराती भाषेत प्रसिद्ध होत असे. त्याचा संपादक एक तरुण मुलगा होता. एकदा तो काकासाहेबांकडे एक लेख मागायला आला.

काकासाहेबांना हातानं लिहायची सवय नव्हती. कुणी लिहून घेणारा मिळाला, तर ते 'डिक्टेट' करायचे. त्यांचं सगळं लेखन या प्रकारेच झालं आहे. त्यांनी सांगितलं; आणि कुणी तरी ते लिहून घेतलं, असं. पण त्या काळात त्यांना याही कामाला वेळ मिळत नव्हता. गांधींनी त्या काळात 'सर्वमेधस् यज्ञ' सुरू करण्याचं ठरवलं होतं. त्यात आपलं सर्वस्व देऊन टाकायचं होतं. या यज्ञात विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांना बलिदानाची दीक्षा देण्याच्या कामी काकासाहेब गुंतले होते. तरी या तरुण संपादकाला रिकाम्या हातांनी परत पाठवायचं नाही, म्हणून त्यांनी आपली डायरी पाहिली आणि म्हटलं, ''आज मला अजिबात वेळ नाही. पण तुला एक दिवस देतो. त्या दिवशी ये आणि मी सांगतो, ते लिहून घे.''

त्यांनी दिवस आणि वेळ ठरवली.

तरुण संपादक 'बरं' म्हणून उठला.

मग एकाएकी त्याला काय सुचलं, कुणास ठाऊक! त्यानं एक वही काढून काकासाहेबांच्या हाती देत म्हटलं,

''तुम्ही सांगाल, त्या दिवशी लेख न्यायला मी येईन. पण आज मला एक संदेश द्या. एका ओळीचासुद्धा चालेल. खाली तुमची सही हवी.''

आणि काकासाहेबांनी त्याच्या वहीत एक वाक्य लिहून दिलं – *'सलामती शोधतां पुरुषार्थ हणाय छे.'* – सुरक्षितता शोधायला जातो, तेव्हा पुरुषार्थाचं हनन होतं.

'वीणा'चा संपादक हे वाचून हर्षभरित झाला. एवढंच नव्हे; तर त्यानं आनंदानं उडीच मारली आणि तो काकासाहेबांना म्हणाला, ''काकासाहेब, मला जे पाहिजे होतं, ते मिळालं. तुमच्या लेखाची आता आणखी मला गरज नाही. या वाक्यात सगळं आलं.''

आणि तो तसाच उठून गेला.

त्या वर्षी 'वीणा'चा अंक प्रसिद्ध झाला, तेव्हा त्याच्या मुखपृष्ठावरच काकासाहेबांचं हे वाक्य त्यांच्या हस्ताक्षरात छापून आलेलं होतं.

माझं विचारचक्र सुरू झालं.

'सलामती' म्हणजे सिक्युरिटी, सुरक्षितता – एक आधार, ज्याला माणूस घट्ट पकडून ठेवतो, ती. भीतीचंच हे दुसरं नाव.

माणूस घाबरतो – आपण एकदम हरवून तर जाणार नाही ना? वाऱ्यावर तर पडणार नाही ना? आपली उगाचच फजिती तर होणार नाही ना? आपण लुटले-फसवले तर जाणार नाही ना? या भीतीनं तो ज्याला घट्ट धरून राहतो, तिला सिक्युरिटी म्हणतात. मग ती सिक्युरिटी नोकरीच्या रूपातली असेल,

जमीन-जुमल्याच्या रूपातली असेल किंवा देवा-धर्माच्या रूपातली. महिन्याच्या महिन्याला माणसाला पगार मिळायला हवा, मधून-मधून प्रमोशनंही मिळत राहायला हवीत; आणि शेवटी निवृत्त झाल्यावर पेन्शन मिळायला हवी. पे, प्रमोशन, पेन्शन या तीन 'पी'च्या जाळ्यात माणूस स्वत:ला गुंतवून घेतो आणि पोझिशन, प्रेस्टिज आणि पॉवर मिळवतो.

त्याला वाटतं, समाजात आपलं खास असं एक स्थान असायला हवं. आपल्याला लोकांनी मान द्यावा, आपला आदर करावा. या दोन गोष्टी मिळाल्या, की दुसऱ्यावर वर्चस्व गाजवण्याइतकी सत्ता आपल्या हाती आली, या प्रकारचा एक आनंद त्याला होतो.

आतून आपण इतके पोकळ असतो की, या तीन गोष्टी आपल्याला मिळाल्या नाहीत, तर आपल्याला हरवल्या-हरवल्यासारखं वाटू लागतं. परिणाम – माणूस कशाला तरी घट्ट धरून राहतो.

पक्ष्याला पंख मिळतात, ते उडण्यासाठी. समजा, उडण्याऐवजी तो फांदीलाच घट्ट धरून बसला, तर त्याची काय गत होईल? तीच गत माणसाची होते सिक्युरिटीच्या मागे लागल्यानं. किती तरी मोठमोठे लोक कर्तृत्वहीन होऊन पडले आहेत या एका भीतीपोटी. अंगातले मोठमोठे गुण मातीमोल करून टाकणारी भीती असते ही.

जो सिक्युरिटीमागे लागला, तो संपला. तो काहीच करू शकत नाही आयुष्यात. कसलंच कर्तृत्व गाजवू शकत नाही. एवढंच कशाला, स्वत: त्याच्यावरच अन्याय झाला, तरी तो उसळून उठू शकत नाही.

मला अनेक वेळा वाटलंय – मुंजीच्या वेळी मुंज्या मुलाच्या कानात गायत्री मंत्र सांगतात, तसा हा काकासाहेबांचा मंत्र *('सलामती शोधतां पुरुषार्थ हणाय छे ।')* मुलगा तारुण्यात पदार्पण करत असताना त्याच्या कानात सांगितला पाहिजे. बाबा रे, सिक्युरिटीच्या भीतीला काळजाला स्पर्श करू देऊ नकोस. आयुष्यात काही तरी भव्य-दिव्य करायचं असेल, तर आगीत उडी घ्यायची तयारी असू दे.

आगीत उडी घे, काळोखात उडी घे, संकटं अंगावर घे – सोनं होईल तुझ्या आयुष्याचं.

। १०४ ।

आई-वडील दोघं भांडू लागले. मुलीला ते सहन होईना. ती मध्ये पडली. बापाची बाजू घेत आईच्या अंगावर ओरडली, "काय बोलतेस गं तू?

पपा तसे नाहीत.''

"तू काय त्यांना माझ्यापेक्षा जास्त ओळखतेस होय गं?'' आई खेकसली.

"हो. मी त्यांना माझ्या जन्मापासून ओळखते.'' मुलगी म्हणाली.

मुलांवर आई-बाप दोघांचा सारखाच प्रभाव पडायला हवा. पण बरेचदा मुलावर आईचा; तर मुलीवर बापाचा प्रभाव जास्त दिसून येतो. आईला मुलाची; तर बापाला मुलीची जास्त ओढ असते.

माता-पुत्र आणि पिता-पुत्री यांच्याइतकं निर्मळ आणि पवित्र नातं दुसरं नाही.

भावा-बहिणीमधलं नातंही असंच.

स्त्री-पुरुष संबंधातली ही खऱ्या अर्थानं उत्कट आणि विशुद्ध नाती. कामवासनेशी कोणताच संबंध नसलेली. लिबिडो-बिबिडो असली काही तरी नावं देऊन त्यांचा कामवासनेशी संबंध जोडणं, हा अत्याचारच एक प्रकारचा. मग 'वैज्ञानिक' असे ना का तो! पण तो 'विज्ञाननिष्ठ' नव्हेच.

विज्ञान एवढं आंधळं असता कामा नये.

हल्ली मी कादंबऱ्या फारशा वाचत नाही. वेळ वाया जातो. पण या खेपेस दिल्ली-मुंबईहून काही नव्या कादंबऱ्या घेऊन आलो. फुटपाथवर दहा-दहा रुपयांत मिळतात आणि हल्लीची मुलं खूप वाचतात तसल्या – अमेरिकन लेखकांनी लिहिलेल्या आणि 'बेस्ट सेलर्स्' म्हणून गाजलेल्या. या कादंबऱ्यांतून या लेखकांनी या पवित्र आणि निर्मळ संबंधांना नर-मादी संबंधांच्या पातळीवर आणून सोडलंय. धरबंधच राहिलेला नाही. ते पाहून मी शहारलो. म्हटलं, अमेरिकन समाजात या प्रकारची विकृती कशामुळे आली? औद्योगीकरणापायी तर नाही ना? औद्योगीकरणामुळे अमेरिकन समाज 'डीह्यूमनाइज्ड्' होत गेला. त्यानं माणसाला माणूसपणापासून दूर नेलं. यामुळेच जर ही विकृती त्या समाजात आलेली असेल, तर ती या देशात यायलादेखील वेळ लागायचा नाही. कारण या देशातही आता अमेरिकेप्रमाणेच औद्योगीकरण सुरू झालं आहे आणि ते आपल्या समाजाला नाही म्हटलं, तरी हळूहळू माणूसपणापासून दूर नेत चाललं आहे.

फ्रॉइडच्या 'लिबिडो'नं अमेरिकन समाजात ही विकृती रुजवली? फ्रॉइडनं आपल्या शोधानं मानवजातीची खूप सेवा केली; पण तितकीच अप-सेवाही केलीय. माणसाची दृष्टी विकृत करणं, ही मानवजातीची अप-सेवाच म्हणायला हवी.

। १०५ ।

पंचवीसेक वर्षांपूर्वी युनेस्कोनं जगाला विचारलं होतं, तुम्ही विकास, विकास

म्हणून ज्याच्या मागे लागला आहात, तो कोणाचा विकास, कशाचा विकास, हे तुम्हाला स्पष्टपणे कळलंय का? विकास हे साधन की साध्य? साधन असेल, तर साध्य कोणतं?

माणूस आज आहे, त्यापेक्षा तो अधिक सुसंस्कृत व्हावा, अधिक चांगला व्हावा, सुखी व्हावा, हे तुमचं साध्य आहे का? असेल, तर सगळ्यात प्रथम तुमच्यासमोर नव्या माणसाचं सुस्पष्ट चित्र असायला हवं. तो कसा असेल, काय करील, कोणासाठी जगेल, *'किम् प्रभाषेत, किम् आसीत, व्रजेत किम्'* हे तुम्ही स्पष्ट केलं पाहिजे. त्यानंतरच तुम्ही तुमच्या अर्थतज्ज्ञांना, शिक्षणतज्ज्ञांना, प्रशासनतज्ज्ञांना बोलावून सांगितलं पाहिजे की, हे पहा, आपल्याला नव्या जगात अशा-अशा तऱ्हेचा एक नवा माणूस घडवायचा आहे. त्यासाठी काय करायला हवं, कसलं इन्फ्रास्ट्रक्चर उभं करायला हवं, ते सांगा. तुमच्यापुढे नुसता 'डेव्हलपमेंट प्लॅन' असून उपयोग नाही; 'डिझाइन फॉर लिव्हिंग' तयार असायला हवं. नुसत्या 'स्टँडर्ड ऑफ लिव्हिंग'चा विचार करून भागणार नाही; 'क्वालिटी ऑफ लिव्हिंग'चा विचार मुख्यत: करायला हवा.

यानंतर या चित्रात शिक्षणाचं स्थान काय, उद्योगाचं स्थान कोणतं, व्यापाराचं स्थान कोणतं, हे ठरवून त्या त्या गोष्टीला ते ते स्थान दिलं पाहिजे.

पण युनेस्कोच्या या म्हणण्याचा कुणीच विचार केला नाही. काही विचार एका कानानं ऐकून घेतले आणि दुसऱ्या कानानं सोडून दिले. कारण, ऐकणारे सगळे 'तज्ज्ञ' होते, 'वैज्ञानिक' होते; आणि त्यांच्याकडे 'आकडेवारी' होती. ही आकडेवारी हिशेबात घेऊन त्यांनी आपल्या मनात आपल्या विज्ञानाला धरून औद्योगीकरणाचं एक चित्र उभं केलं; नव्या बाजारपेठेचं चित्र उभं केलं. नवी सरकारं कशी असायला हवीत, त्याचं चित्र त्यांच्याकडे होतं. फक्त ज्याच्यासाठी हे सारं चाललं होतं, तो माणूस कसा असावा, त्याचं चित्र त्यांच्या डोळ्यांपुढे नव्हतं.

'व्हिजन' कुणाकडेच नव्हती.

आता जगातले सगळे लहान-मोठे देश एकमेकांचे शेजारी झाले आहेत. तेच कशाला, आज माणूस वेगवेगळ्या ग्रहांच्या यात्रा करू लागला आहे; अंतराळाचा ठाव घेऊ लागला आहे. एवढ्या या विजयानंतर जे विचार जुने झाले आहेत, ज्या सामाजिक संस्था निरुपयोगी ठरल्या आहेत, त्यांना चिकटून राहणं त्याला परवडणारं नाही. त्यानं आपल्याभोवती ज्या भिंती उभ्या केल्या आहेत, त्या त्याला उपयोगी पडायच्या नाहीत. या सगळ्या गोष्टींचा त्याग केल्याशिवाय तो नवा माणूस म्हणून उभा राहू शकणार नाही.

माणसानं निसर्गावर विजय मिळवला.

आता स्वत:वर विजय मिळवणं, स्वत:ला नव्या जगाच्या अनुकूल बनवणं त्याला कठीण जाऊ नये.

पण कुणीच या गोष्टीकडे लक्ष दिलं नाही.

परिणाम काय झाला? – जग नवं झालं; माणूस जुनाच राहिला. जग आता एकविसाव्या शतकात पोहोचलंय; माणूस अश्मयुगातच जगतो आहे.

अजून उशीर झालेला नाही. विकासाच्या योजना आखणाऱ्यांनी आता माणसाकडेही थोडंसं लक्ष द्यावं. माणूस हा माणूस कसा होईल, याचा विचार करावा आणि माणसाला माणूसपणाचा धडा देण्यासाठी त्याची नासकी-कुजकी अंगं कापून टाकण्याचं काम करावं. नाही तर–

विकास महाग पडेल जगाला.

। १०६ ।

विश्वमित्र क्रोधानं पेटून उठला होता. वसिष्ठांनी आपल्याला ब्रह्मर्षी म्हणून संबोधलं नाही, तर आज त्यांचा प्राणच घ्यायचा, असं ठरवून तलवार घेऊन तो बाहेर पडला आणि वसिष्ठांच्या आश्रमात जाऊन त्यांच्या कुटीपाशी लपून बसला.

रात्रीची वेळ. पिठूर चांदणं पडलं होतं. वसिष्ठांनी अरुंधतीला हाक मारली. म्हणाले, ''माझं एक काम करतेस? विश्वामित्राकडे जा आणि थोडं मीठ घेऊन ये. मी मागितलंय म्हणून सांग.''

''काय?'' अरुंधती आश्चर्यानं त्यांच्याकडे पाहत राहिली. ''हे काम तुम्ही मला सांगताय? ज्यानं माझ्या शंभर पुत्रांचे जीव घेतले, त्याच्याकडे जाऊन मीठ मागायला सांगताहात तुम्ही मला?''

अरुंधती रडू लागली. काही काळापूर्वी विश्वामित्रानं तिच्या ब्रह्मनिष्ठ अशा शंभर पुत्रांची निर्दयपणे हत्या केली होती.

वसिष्ठ म्हणाले, ''होय. मीच सांगतो आहे तुला हे. तुला माहीत आहे, इतर कुणाहीपेक्षा मी विश्वामित्राला श्रेष्ठ मानतो.''

अरुंधती आश्चर्यानं त्यांच्याकडे पाहतच राहिली. तिला काही समजेनासंच झालं. तिनं पतीला विचारलं, ''तुम्ही त्याला इतकं मानता, तर मग त्याला 'ब्रह्मर्षी' म्हणून का संबोधत नाही? तुम्ही त्याला 'ब्रह्मर्षी' ही पदवी देऊन टाकली असती, तर मला माझे शंभर पुत्र गमवावे लागले नसते.''

"मी त्याला खूप मानतो; पण मी त्याला ब्रह्मर्षी म्हणत नाही. कारण, त्याचा अहंकार अजून कायम आहे."

वसिष्ठ-अरुंधतीचा हा संवाद लपून बसलेल्या विश्वामित्राच्या कानांवर पडला. त्याची मूठ सैल पडली आणि त्याच्या हातातली तलवार गळून पडली. मनातल्या मनात तो म्हणू लागला, "निर्मळ मनाच्या या ऋषीला मी किती दुःख दिलं. ...त्याच्या पुत्रांची मी हत्या केली... छे छे! हे काय केलं मी?..." पश्चात्तापानं त्याचं काळीज पोळू लागलं. तो धावत वसिष्ठांपाशी गेला आणि त्यांच्या पायांवर कोसळला... त्याच्या तोंडून शब्द फुटेनात. थोडा वेळ तसाच गेला. मग तो म्हणू लागला, "क्षमा करा, असं म्हणायलादेखील तोंड नाही मला... क्षमा मागण्याइतकीही योग्यता नाही माझी."

वसिष्ठ त्याला हात धरून उठवत म्हणाले, "ऊठ ब्रह्मर्षी, ऊठ आता."

"मला ब्रह्मर्षी म्हणून लाजवू नका."

"माझ्या तोंडून आजवर एकही मिथ्या शब्द बाहेर पडलेला नाही. तुझा गर्व आज नाहीमा झाला. तू आज खरोखरी ब्रह्मर्षी झालायस."

पुराणातली ही एक कथा.

या देशात एके काळी असे ऋषी होते. क्षमेचे असे दाखले पाहायला मिळत. अशा प्रकारचं तपोबल ऋषींमध्ये असे. असे ऋषी पुन्हा या देशात जन्माला येतील, तेव्हाच या देशाचा पुन्हा उद्धार होईल.

। १०६ ।

एका राज्यात एक सज्जन माणूस राहत होता. आपण बरं आणि आपलं काम बरं, म्हणून तो कधी कुणाच्या भानगडीत पडत नसे. म्हणून असावं, लोक त्याला सज्जन माणूस म्हणून ओळखत.

एकदा राजानं आपल्या राज्यातल्या शेतकऱ्यांचा छळ करायला सुरुवात केली. याला कुणी तरी ते सांगितलं. हा म्हणू लागला, "छे छे! राजानं असं करायला नको. चुकीचंच करतो आहे तो. गरीब बिचारे लोक हे. त्यांना छळू नये. पण मला काय त्याचं? शेतकऱ्यांचे कैवारी असतील, ते बघून घेतील." असं म्हणून तो गप्प राहिला.

काही दिवसांनी राजानं श्रीमंतांकडे आपला मोहरा वळवला. एकावर धाड घाल, त्याला धर, दुसऱ्याला धर, त्याला तुरुंगात डांब, तिसऱ्याला दंड ठोवाव, असं करू लागला.

"छे छे!" याच्या तोंडून शब्द आले, "अन्याय आहे हा. राजानं असं करू नये. पण मला काय त्याचं? श्रीमंत लोक हे. कुणाला धरलं, की हे सुटतील, हे आमच्यापेक्षा त्यांनाच चांगलं माहीत!" असं म्हणून याही खेपेस तो 'अलिप्त' राहिला.

आणखी काही दिवस गेले. गरीब आणि श्रीमंत या दोघांचा छळ करून झाल्यावर राजानं मध्यमवर्गियांचा छळ आरंभला. "छे! अन्यायाचा कळसच झाला हा!" हा म्हणाला. "हा अन्याय राजाला पचणार नाही." असं म्हणून आणि 'मला काय त्याचं?' असा विचार करत तो याही वेळेस राजकारणापासून दूरच राहिला.

करता-करता राजानं एक दिवस यालाच पकडून तुरुंगात टाकलं. यानं आकांत केला, "धावा रे, धावा! राजाचा अन्याय आता अगदी हाताबाहेर गेला..." म्हणून तो लोकांचा धावा करू लागला; पण कुणीच मदतीला आलं नाही. राजानं सर्वांना आधीच खच्ची करून टाकलं होतं.

राजकारण हे गलिच्छ म्हणून जे लोक त्याच्यापासून दूर राहतात, त्यांना आज ना उद्या अशी किंमत मोजावीच लागेल.

। १०८ ।

माणूस दारू का पितो?

गरीब पितो, ते आपण समजू शकतो. रंजला-गांजलेला तो! बिचारा मरेस्तोवर काम करतो; आणि उपाशीच मरतो. त्याला रोजची मजुरीदेखील पुरेशी मिळत नाही. तो दुसऱ्यांना मोठमोठे प्रासाद बांधून देतो; स्वतः मात्र झोपडीत राहतो. दुसऱ्यासाठी वस्त्रं विणतो; स्वतः जुनी-फाटकी चिरगुटं नेसतो. दुसऱ्यासाठी अन्न पिकवतो; स्वतः अर्धपोटी राहून दिवस काढतो.

तो ज्या जगात जगतो, ते वाटमाऱ्यांचं जग; स्वतःच्या गरजा भागवण्यासाठी दुसऱ्यांना फसवणाऱ्याचं जग. या जगाला त्याला विरोध करता येत नाही. त्याला काही उपायच सुचत नाही. जे काही कष्टाचं, त्रासाचं, मनस्तापाचं आणि उपेक्षेचं जिणं त्याच्या नशिबी आलंय, ते विसरण्यासाठी तो पितो.

दारूत दुःख विसरायला लावण्याची मोठी ताकद असते.

पण ज्याचं घर भरलेलं आहे, संपत्ती ओसंडून वाहते आहे, तोही पितो. ते का? विचारलं, तर तो म्हणतो, "तुला सांगण्यात काही अर्थ नाही. दारूत काय असतं, तुला कळणार नाही... कम्बख्त, तूने पी ही नहीं..." मग हळूच म्हणतो, "झिंग यावी, म्हणून पितो."

तो काहीही उत्तर देवो, तो दारू का पितो, याचं खरं उत्तर एकच – त्यालाही कसलं तरी दु:ख असतं. तोही गांजलेलाच!

कसलं दु:ख? त्याला 'हवं ते मिळत नाही' याचं.

त्याला काय हवं असतं? सुख. त्याला सुख मिळत नाही. त्यानं सुख मिळवण्यासाठी कर्ज काढ, हप्ते भर, याचा खिसा भर, त्याचे पाय धर, याला थापा मार, त्याला मस्का मार, असे जे उद्योग सुरू केलेले असतात, त्यानं त्याचं असलेलं सुखही नाहीसं झालेलं असतं. उद्योग वाढत चालल्यामुळे तो नीट झोपही घेऊ शकत नाही. ट्रँक्विलायझर घेतल्याशिवाय त्याला झोप येत नाही. तो कधी वेळेवर आणि चवीनं जेवू शकत नाही. संगीत ऐकायचं म्हटलं, तर एक तर त्याला वेळ तरी नसतो; नाही तर मग त्याचं लक्षच लागत नसतं. तेच कशाला, मुला-बाळांशी हसा-खेळायलाही त्याला उसंत मिळत नाही. तो एक 'मनी मेकिंग मशीन' झालेला असतो आणि पैशाचा धनी व्हायच्याऐवजी त्याचा गुलाम झालेला असतो.

त्याला हे सगळं माहीत असतं; पण कबूल करायचं नसतं.

तो सतत 'टेन्शन'मध्ये असतो, हे टेन्शन घालवण्यासाठी ती पितो.

एक गोष्ट खरी : पैसा हा माणसाला लागतोच. त्याच्याशिवाय जगातलं एक पानदेखील हलणार नाही. पण त्याचबरोबर हेही खरं की, पैशानं सगळं मिळत नाही. पैशानं दुसऱ्याचं प्रेम नाही मिळवता येत. पैशानं धीट माणसाला भेकड बनवता येत नाही, चारित्र्यवान माणसाला विकत घेता येत नाही; किंवा पैशानं भेकडाला धीट बनवता येत नाही. पैशाच्या ताकदीला मर्यादा असते. त्या मर्यादेत त्याला ठेवूनच त्याचा उपयोग करून घ्यायला हवा. पैसा जेव्हा ही मर्यादा ओलांडून पुढे जातो, तेव्हा तो आपला सेवक राहत नाही; आपला मालक होऊन बसतो आणि आपल्या सुखाचा नाश करतो.

हिमालयात काही तपस्वी पाहिले होते. कुणी वर्षानुवर्षं एका पायावर उभा राहून तप करत होता, कुणी झाडाला लोंबकळून; तर कुणी एक हात वर करून. कुणी डोक्यावर उभा राहून; तर कुणी लोळत-लोळत पर्वत चढून... कुणी डोळे फुटेस्तोवर सूर्याकडे पाहत; तर कुणी गंगेच्या बर्फासारख्या थंडगार पाण्यात तासन् तास उभा राहून तप करत होता. कशासाठी? तर ईश्वरप्राप्तीसाठी! ईश्वराची प्राप्ती कशी होते, मला माहीत नाही. पण 'बाबांनो, ईश्वरप्राप्तीचा हा मार्ग नव्हे,' असं त्यांना ओरडून-ओरडून सांगावं, असं त्या वेळी मला वाटलं होतं.

सुखप्राप्तीसाठी आपल्या उद्योगपतींची, व्यापाऱ्यांची ही जी तपश्चर्या चालू

आहे, तीही अशीच निरर्थक आहे. त्यांना याची कल्पना आहे. आपण वाट चुकलो आहोत, हेही त्यांना बरोबर कळलेलं असतं.

म्हणून स्वत:ला स्वत:चा विसर पडावा, यासाठी ते पीत असतात.

। १०९ ।

माझं एक मत झालंय. अमुक एक वय झालं, की माणसानं आपलं कार्यक्षेत्र बदलायला हवं. दुसऱ्या कुणी 'बाजूला व्हा' म्हणण्याआधी स्वत:च बाजूला व्हायला हवं.

अमुक इतकी वर्षं गृहस्थाश्रमाचं पालन केल्यानंतर माणसानं वानप्रस्थाश्रमात प्रवेश करावा, असं आपले पूर्वज म्हणत असत. याप्रमाणे तसं पाहिलं, तर पन्नासचं वय झालं, की माणूस 'वन-प्रवेश' करायचा. वन म्हणजे रान नव्हे; बा'वन्न', अठ्ठा'वन्न' यातलं वन. इंग्रजीत – फिफ्टीज्. या वयात पोहोचताच माणसानं आतापर्यंत करत आलेली सगळी कामं सोडून दुसरी कामं हाती घ्यायला हवीत.

विनोबांनी यानुसार एक नवं सूत्र तयार केलं होतं – *'पचपन के बाद बचपन'* म्हणून.

हे बचपन येताच आपण काय करायचं, हे माणसानं ठरवून ठेवलं पाहिजे. एवढंच नव्हे; तर त्याची सवयही त्यानं आधीपासूनच लावून घेतली पाहिजे. आपण 'रिटायर' झाल्यावर लेखन करणार, असं खूप जण म्हणतात. वाचनाची आणि लेखनाची सवय आधीपासून लावून घेतलेली असेल, तर ठीक. तसं नसेल, तर मग ते काहीच करू शकत नाहीत. सगळी स्वप्नंच ठरतात. हळूहळू त्यांच्या जीवनात एक प्रकारचं रितेपण येऊ लागतं. ते कसं भरून काढायचं, हे त्यांना समजत नाही. वेळ जात नाही, म्हणून आधी ते तक्रार करतात. मग एक दिवस त्यांचा आत्मविश्वास उडून जातो आणि अखेर ते अगदी निरुपयोगी होऊन जातात.

आजची संस्कृती व्यापाऱ्यांची. ज्याच्यापासून काही 'फायदा, नाही' ते 'स्क्रॅप'मध्ये – भंगारात – टाकून देण्याची.

म्हणून माणसानं आधीच सावध राहायला हवं आणि निवृत्तीनंतर त्याला जे करायचं आहे, त्याच्यामागे आत्तापासूनच झपाटून लागलं पाहिजे. निवृत्त झाल्यावर आपण काय करायचं, हे जो आधी ठरवत नाही आणि त्याची सवय जो आधीपासून लावून घेत नाही, त्याच्यासारखा करंटा कुणी नाही. त्याच्या वाट्याला उपेक्षा आली, तरी त्याला दुसऱ्याला दूषण देता येणार नाही.

करणं, हाच एकमात्र आदर्श नव्हे; होणं, हाच खरा आदर्श. शेतातली रोपं उन्हं, वारा, पाऊस सोसत शेतात उभी असतात, ती एक दिवस आपल्याला कणसं लागतील, म्हणूनच ना? ती लागणार नसतील, तर त्यांच्या तपश्चर्येला अर्थच उरणार नाही. कणसं आली, म्हणजेच त्यांच्या तपश्चर्येला फळ आलं, असं म्हणायचं. आणि कणसांच्या रूपातून ती तपश्चर्याच न बोलता बोलत असते, ते ऐकता यायला हवं.

जिथे थांबणं गरजेचं आहे, तिथे माणसाला थांबता यायलाच हवं. 'थांबणं' म्हणजे 'नाहीसं होणं' नव्हे. नदी जिथे वाहायची थांबते, तिथे एक समुद्र असतो. हे तिचं थांबणं म्हणजे 'नाहीसं होणं' नव्हे. फळ पिकलं म्हणजेच ते ज्या देठाला लटकत असतं, त्याला सोडून खाली पडतं. त्याचं हे पडणं म्हणजे 'नाहीसं होणं' नव्हे.

वयाला पन्नास वर्षं झाली, की माणसानं आजवर जे पाहिलं, ज्यावर विचार केला, जो अनुभव घेतला, जे मिळवलं, ते इतरांना वाटत निघालं पाहिजे. आतापर्यंत जे तो करीत आला, ते त्यानं आता या वयात करणं योग्य नव्हे. जी समुद्राला मिळत नाही, ती नदी आटते. जे फळ पिकून खाली पडत नाही, ते नासून जातं.

वयाला पन्नास वर्षं झाली, की माणसानं नवं काम सुरू करायला हवं.

निवृत्ती म्हणजे कामात बदल.

। ११० ।

सगळंच सरकारला विचारून करायचं की काय?

मूल जन्माला आलं, सरकारला कळवा; मूल आजारी पडलं, सरकारी दवाखान्यात घेऊन जा; लग्न झालं, सरकारला कळवा; लग्न मोडावं असं वाटलं, सरकारच्या मदतीनं मोडा; कसला धंदा करावासा वाटला, सरकारचं लायसेन्स घ्या; कोणता धंदा करावा, ते सरकारला विचारा; तयार माल कुठे विकायचा, सरकार सांगेल तिथे विका; धंद्यासाठी कर्ज काढायचंय, सरकारकडे मागा; पैसे जास्त मिळवले, त्यातला एक वाटा सरकारला टॅक्स म्हणून द्या; माणूस मरण पावला, सरकारला कळवा.

सगळंच सरकारला सांगून, विचारून करा.

शेतकरीही आता सरकारच्या तोंडाकडे पाहू लागला आहे. बियाणं त्याला सरकारनं द्यायला हवंय. पाणी सरकारनं द्यायला हवं. सारं सरकारनं द्यायला हवं.

शेतात जे पिकतं, ते विकायचं कुठे, ते सरकारला विचारायला हवं. दर? सरकार जो ठरवील, तोच घ्यायला हवा.

जीवनाची सगळी अंगं आपण सरकारच्या स्वाधीन करून टाकलीत.

मग भ्रष्टाचार माजणार नाही तर काय?

तलाठी, ग्रामसेवक, पोलीस... या वा त्या खात्यातले सेक्रेटरी, डायरेक्टर... आमदार, मंत्री मिळून सरकार होतं. चाकात चाक, चाकात चाक. याच्या पाया पड, त्याचा खिसा भर, तेव्हा कुठे काम होतं.

याला 'स्वातंत्र्य' म्हणायचं? मग गुलामी कोणती?

सरकार कमीत कमी झाल्याशिवाय भ्रष्टाचार संपणार नाही. सरकारचा सहभाग कमीत कमी करून सहकाराच्या तत्त्वानं जास्तीत जास्त चालायला हवं.

तरी नशीब! उपवर मुलींची लग्नं जुळवून द्या, म्हणून आपण सरकारला सांगत नाही.

। १११ ।

हिंदू धर्मात पावलोपावली सत्याचा महिमा गायिलेला पाहायला मिळतो.

कारण काय? सत्याच्या मार्गानं कुणीच चालत नाही, म्हणून तर नव्हे ना?

जे गुण समाजात स्थिरावले आहेत, त्यांच्यावर भर द्यायची फारशी गरज नसते. जे स्थिरावलेले नाहीत, जे मुळात रुजलेलेच नाहीत, त्यांचाच पाठपुरावा करावा लागतो.

या देशात सत्य कधी रुजलंच नाही की काय? रुजायला हवं होतं.

सामान्यतः माणसाला सत्य बोल, म्हणून सांगावं लागू नये. सत्य ही स्वाभाविक गोष्ट. माणूस स्वाभाविकतया नेहमी सत्यच बोलतो. कारणाशिवाय माणूस खोटं बोलत नाही.

अशी कोणती कारणं असतात, जी माणसाला खोटं बोलायला भाग पाडतात?

लाभ आणि नुकसान, हीच.

आपलं सगळं धार्मिक साहित्य बारकाईनं पाहिलं, तर दोन मोठ्या प्रेरणा सर्वत्र गुंफलेल्या पाहायला मिळतील. एक भयाची; आणि दुसरी प्रलोभनाची.

डॉ. इंद्रदेव शास्त्री परवा म्हणाले, ''हिंदू धर्मात जेवढा खोटेपणा भरलेला आहे, तेवढा दुसऱ्या कोणत्याच धर्मात तुला पाहायला मिळणार नाही.'' एका शास्त्र्याच्या तोंडून हे ऐकून मला वाईट वाटलं. सगळं पारखून, घासून-पुसून काढायला हवं, असं आतून वाटू लागलं.

आपले नीतिकार तरी कसले? 'सत्य बोला; पण मधात घोळवून बोला, कटू सत्य बोलू नका' असा उपदेश करणारे! सत्य स्वभावत:च कडू, त्याला आम्ही काय करणार? मधात घोळवून त्याचा कडूपणा नाहीसा तरी का करायचा? दुसऱ्याला बरं वाटावं म्हणून? दुसऱ्याला बरं कशासाठी वाटायला हवं? त्याला बरं वाटावं म्हणून काळजी कशाला करायला हवी?

नैतिक आरोग्य जर महत्त्वाचं असेल, तर सत्य हे कटू म्हणूनच स्वीकारायला हवं आणि कटू म्हणूनच द्यायला हवं. मेंदी बारीक वाटल्यावरच तिचा रंग चढतो. ऊस चरकातून काढल्यावरच त्याचा रस निघतो. तीळ नीट दळल्यावरच त्यातून तेल निघतं. जमीन नीट नांगरल्यावरच तिच्यातून चांगलं पीक काढता येतं. – या अर्थाचं एक सुभाषित वाचलं आहे.

सत्य कडू असतं, तेव्हाच ते अंगी लागतं; परिणाम करतं.

ज्या समाजात सत्य मूळच धरू शकत नाही, त्या समाजात सत्य बोलताना वा लिहिताना कोणाला काय वाटेल, याची मुळीच पर्वा करायला नको.

। ११२ ।

तो ऑफिसमध्ये भेटला नाही, म्हणून मी त्याच्या घरी गेलो.

"काय रे? बरं नाहीय की काय?" मी विचारलं.

"नाही."

"मग ऑफिसला का नाही गेलास?"

"रजा घेतलीय."

"कशासाठी?"

"बरीच ॲक्युम्युलेट झाली होती... म्हटलं, घेतली नाही, तर लॅप्स होईल..."

मी तिथेच मनातल्या मनात हिशेब मांडला. म्हटलं, याला आठवड्यातून दोन दिवस शनिवार-रविवार सुट्टी मिळते. वर्षांतून बावन्न शनिवार आणि बावन्न रविवार. त्याशिवाय वर्षातून अठरा 'पब्लिक हॉलिडेज्.' तीस दिवस 'प्रिव्हिलेज्ड् लीव्ह', तीस दिवस 'सिक लीव्ह', बारा दिवस 'कॅज्युअल लीव्ह' मिळून वर्षातले १९४ दिवस हा सुट्टी घेतो. १९४ दिवस म्हणजे साडेसहा महिने. याचा अर्थ हा वर्षातून फक्त साडेपाच महिनेच काम करतो आणि पगार मात्र बारा महिन्यांचा घेतो.

देशाला असले 'जावई' कसे काय परवडतात?

लंडनजवळच्या किन्फर्ड नावाच्या एका गावातल्या एका शाळेविषयी बरंच ऐकलं होतं. या शाळेतल्या मुलांना वर्षातून फक्त एकच दिवस सुट्टी मिळते. नाताळची. उरलेले ३६४ दिवस शाळा चालू असते. सकाळी आठ वाजता मुलं शाळेत येतात, ती तिन्ही सांजेपर्यंत शाळेतच असतात. तिथेच शिकतात, तिथेच खेळतात, तिथेच जेवतात-खातात. मुलं आणि शिक्षक बारा-बारा तास एकत्र राहतात. 'हेच आमचं जग,' या भावनेनं राहतात. 'दोघांनाही हेच आपलं जग आहे, असं वाटलं पाहिजे; नाही तर ती शाळा कसली?' याचं हे उदाहरण. पूर्वीच्या काळी भारतात गुरुकुलं असायची, त्याची आठवण होते.

जपानच्या विद्यापीठात गेली सतरा वर्षं काम करत असलेला एक प्राध्यापक भेटला. त्यानं सतरा वर्षांत फक्त सतराच सुट्ट्या घेतल्या होत्या. त्यानं सांगितलं, "जपानमध्ये कुणी मंत्री वा प्रधानमंत्री निधन पावला, तरी शाळा-कॉलेजांना सुट्टी देण्याची पद्धत नाही. सरकारी कार्यालयंदेखील बंद राहत नाहीत. बातमी कळल्यावर सर्वजण उभे राहतात, 'त्याच्या आत्म्याला शांती लाभो' म्हणून प्रार्थना करतात, एक मिनिट उभे राहून 'श्रद्धांजली' वाहतात; आणि त्यानंतर सगळे व्यवहार नेहमीप्रमाणे चालू होतात. मध्यंतरी एकदा सरकारनं पाच दिवसांचा आठवडा केला. शनिवार-रविवार सुट्टी द्यायची असं ठरवलं. आणि तुला माहीत्येय? अख्ख्या जपाननं विरोध केला आणि सरकारला आपला बेत रद्द करावा लागला.

मला हे ऐकून का कुणास ठाऊक; पण अतिशय लाज वाटली.

आठवड्यातला फक्त एक रविवार सोडून कुणालाच कसलीच सुट्टी मिळू नये. पुढारलेल्या देशांनाच जिथे सुट्ट्या परवडत नाहीत, तिथे आपल्यासारख्या मागासलेल्या देशांना त्या कुठून परवडणार?

आळशी, ऐदी लोकांच्या या साऱ्या मागण्या. निसर्गात कुणीच कधीच सुट्टी घेत नाही. ऋतु-चक्र सुट्टी घेत नाही. कृमी-कीटक, जीव-जिवाणू, पशु-पक्षी, कुणीच सुट्टी घेत नाही. माणसानंही घेऊ नये. आठवड्यातून एक रविवारची सुट्टी त्याला पुरे. आणखी सुट्ट्या हव्या असल्या, तर 'रिस्ट्रिक्टेड' सुट्ट्या द्यायच्या. ख्रिश्चनांना नाताळची मिळेल; गुड फ्रायडेची मिळेल. मुसलमानांना मोहरमची मिळेल; बकरी ईदची मिळेल. हिंदूंना गणेशचतुर्थीची वा दिवाळीची मिळेल. देश सेक्युलर झाला म्हणून काय झालं? सगळ्यांची धार्मिक पर्वं सगळ्यांवर लादायला हवीत, असं नाही. सरस्वतीपूजन, दसरा असल्या सुट्ट्या तर पूर्णपणे बंदच करून टाकल्या पाहिजेत. महावीर जयंती, बुद्धपौर्णिमा,

नानक जयंती हे सण सगळ्यांवर लादायची जराही गरज नाही. पंधरा ऑगस्ट, सव्वीस जानेवारी, दोन ऑक्टोबर, एक मे या राष्ट्रीय वा आंतरराष्ट्रीय सुट्ट्या बंद व्हायला हव्यात. देशातल्या कितीही मोठ्या माणसाचं निधन होवो, त्याची सुटी कुणालाही मिळता कामा नये. एक मिनिट उभं राहून त्याच्या आत्म्याला शांती मिळो, म्हणून प्रार्थना करायची. तेवढं पुरे.

शाळा-कॉलेजांनी 'सुट्टीचे' दिवस हे 'खास' दिवस म्हणून साजरे करावेत. समजा, पंधरा ऑगस्ट असेल, तर त्या दिवशी शाळेत राष्ट्रध्वज फडकवावा. शिक्षकांनी या दिवसाचं महत्त्व सांगणारी भाषणं करावीत. मुलांना त्या दिवसाचं महत्त्व सांगायला लावावं. याप्रमाणे हाही दिवस 'शिकवण्यासाठीच' उपयोगात आणावा.

ऑफिसमध्ये कोणीही सुट्टी मागायला आला, तर त्याला सांगावं, "जा तू; पण तुला आजच्या दिवसाचा पगार अर्धाच मिळेल." मग सुट्ट्या मागायला कुणी पुन्हा-पुन्हा येणार नाही.

फक्त आजारी पडल्यास भरपगारी सुट्टी द्यावी. त्याचप्रमाणे घरातलं कुणी आजारी पडलं असेल, तर सुट्टी द्यावी. अशा प्रसंगी विवेक जागृत ठेवूनच निर्णय घ्यावा.

परवा एकाला सुट्ट्यांसंबंधीचं माझं हे मत मी सांगितलं. त्यावर तो म्हणू लागला, "असं कसं होईल?"

मी म्हटलं, "थोडा विचार कर. समज, तू एक छोटासा व्यवसाय सुरू केलायस. लोकांना कामावर ठेवलंयस. तू घेतोस, तसे हे लोकही साडेसहा महिने सुट्ट्या आणि पगार मात्र वर्षाचा घेऊ लागले, तर तुझा व्यवसाय नीट चालू शकेल का? 'हो,' म्हणून उत्तर दिलंस, तर मग मी तुला काही म्हणणार नाही. 'नाही' म्हणालास, तर तुला सांगेन, आत्तापासूनच सावध हो. कधी तरी एक दिवस देश तुझ्याकडून तुझ्या कामाचा हिशेब मागणार आहे; आणि तो दिवस फार दूर नाही.'

। ११३ ।

काहीजण म्हणतात–

इतकी वर्षं राजकारणात घालवून तुम्ही अजून तत्त्वाच्याच गोष्टी करता. जरा डोळे उघडून भोवताली पाहिलंत, तर तुम्हाला दिसून येईल : तत्त्वं कुठेच दृष्टीस पडत नाहीत. दृष्टीस पडतो, तो फक्त व्यवहार. तुम्ही राजकारणात स्वतःला

हरवून बसलात, त्याचं कारण एकच : तुम्ही फक्त तत्त्वांना घेऊन बसलात; व्यवहाराकडे पाहिलं नाही. जो व्यवहाराशी जुळवून घेत नाही, तो राजकारणात हरवून जातो. तुम्ही व्यवहार कधी शिकणार?

एवढा उपदेश करून हे लोक गप्प बसत नाहीत. 'तुम्ही अगदी निरुपयोगी लोक. तुमचा कशालाच उपयोग नाही.' असं सर्टिफिकेटही आम्हाला देऊन हे लोक मोकळे होतात.

आम्हाला व्यवहार समजत नाही म्हणतात, ते खरं नाही. समजा, आम्ही डोळे मिटून बसलो. तसं केल्यावरही व्यवहार इतका ढळढळीतपणे समोर उभा ठाकतो, की त्याच्याकडे पाहायचं नाही म्हटलं, तरी नजर त्याच्याकडे जातेच. व्यवहार 'खरा'च असतो; पण तो 'बरा' असेलच, असं नाही म्हणता येणार. तत्त्वनिष्ठ माणसानं व्यवहाराबाबत डोळे मिटून घेऊ नयेत. त्यानं व्यवहार ओळखलाच पाहिजे. पण व्यवहार ओळखणं वेगळं आणि व्यवहाराशी जुळवून घेणं वेगळं. व्यवहार मोठा खट! त्याच्याशी जरा जुळवून घेतलं, की 'आणखी हवं, आणखी हवं' म्हणून तो मागत राहतो. तत्त्व जर त्याच्या मागण्या पुरवत राहिलं, तर हळूहळू तोच आपलं वर्चस्व तत्त्वावर गाजवू लागतो.

आणि मग एक दिवस तत्त्वाचा खून करून मोकळा होतो.

इतका 'व्यवहार' तत्त्वनिष्ठ माणसाला कळायलाच हवा. त्याला त्याची कल्पना असायलाच हवी. त्यानं सावध असायलाच हवं. जागरूक राहायलाच हवं. व्यवहाराची संगत कुठवर घ्यायची, कुठे मुळीच घ्यायची नाही, कोणत्या मर्यादेपलीकडे व्यवहाराची साथ स्वीकारायची नाही, हे ठरवण्याचा विवेक त्याच्यापाशी असायलाच हवा.

आपल्यामध्ये व्यवहारवादी लोक नाहीत, असं म्हणता येणार नाही. पूर्वीही होते; आजही आहेत. पण त्यांची परिस्थितीच पाहून घ्यावी. केविलवाणी अवस्था झाली आहे त्यांची! तत्त्वशून्य, सत्त्वशून्य होऊन ते सत्ताधाऱ्यांपुढे लांगूलचालन करीत राहिले आहेत. चुकून कधी सत्ताधाऱ्यांचं लक्ष गेलं, तर हाडकाचा एखादा तुकडा पडला आहे त्यांच्यासमोर. यापलीकडे याहून मोठा काही 'फायदा' काही त्यांना झालेला नाही. व्यवहारानं तो त्यांना मिळवू दिलेला नाही.

जे तत्त्वाला धरून राहिले, ते परिस्थिती जराही अनुकूल नसतानादेखील संघर्ष करीत राहिले, 'अंती विजय आमचाच आहे' या विश्वासानं झुंज देत राहिले; मनस्ताप, वेदना, संताप सारं सोशीत राहिले. त्यांना 'अपेशी' म्हणू नये. त्यांना जे हवं होतं, ते त्यांनी घडवून आणलेलं दिसून येईल. त्यांच्यासारखे 'यशस्वी' दुसरे कुणी आढळणार नाहीत.

ध्येयवाद्यांनी आपली ही वाट सोडायची जरासुद्धा गरज नाही. त्यांनी व्यवहार पाहायचा, त्याला नीट ओळखूनही घ्यायचं; पण त्याला शरण जायचं नाही. त्याचा पक्ष तर अजिबात घ्यायचा नाही.

अजून जे काही साधायचं राहिलं आहे, ते आपण तत्त्वनिष्ठ राहिलो, तरच साधू शकू. ज्या दिवशी आपण व्यवहाराशी जुळवून घेऊ, त्या दिवशी पूर्ण कोलमडून पडू आणि नाहीसे होऊ.

ज्या चळवळीत तत्त्वनिष्ठ लोकांची संख्या अधिक, त्या चळवळीच आजवर यशस्वी झाल्या आहेत. त्याच चळवळींनी समाजाचा उद्धार केला आहे. त्याच चळवळीत पडलेले लोक सदैव मस्तक उंचावून चालू शकलेले आहेत.

व्यवहारवादी लोकांनी समाजाला खाली ओढण्यापलीकडे कोणताच पुरुषार्थ केलेला नाही. कधीही, कुठेही त्यांनी तो केलेला नाही.

। ११४ ।

जवाहरलाल नेहरूंना एकच मत आणि त्यांच्या शिपायालादेखील एकच मत. का बरं? दोघे 'समान' म्हणून? कोणत्या अर्थानं दोघे समान म्हणायचे?

दोघांनाही भूक लागते, दोघांनाही तहान लागते, भूक आणि तहान भागताच दोघांचेही जीव तृप्त होतात. या अर्थानं दोघे समान. दोघांनाही दमायला होतं आणि दमले-भागलेले ते दोघे झोपले, झोपून उठले, की दुसऱ्या दिवशी सकाळी दोघेही ताजेतवाने – फ्रेश – झालेले असतात. या अर्थानंही ते दोघे समान. चोरी केली, खून केला, तर दोघांनाही एकाच प्रकारची शिक्षा होते, या अर्थानंही दोघे समान.

पण दुसऱ्या कोणत्याच दृष्टिकोनातून दोघे समान नव्हेत. ज्ञानानं, अनुभवानं, कर्तृत्वानं, प्रभावाच्या बाबतीत, योग्यतेच्या बाबतीत दोघे एकमेकांपेक्षा वेगळेच. अगदी वेगळे. दोघांत टोकाचं अंतर.

मग लोकशाहीनं दोघांना एकेकच मत का दिलं? कोणत्या दृष्टिकोनातून तिनं त्यांना समान मानलं? दोघांचा आत्मा एक. बुद्धीत फरक असला, शक्तीत फरक असला, तरी दोघांत आत्मतत्त्व एकच. त्यात अंतर नाही. या तत्त्वाला धरून तिनं त्यांना समान मानलं की काय?

पण हे तत्त्व तर वेदान्ताचं. लोकशाही कधीपासून वेदान्ताची भाषा बोलू लागली?

लोकशाहीत सारे समान, असं आपण म्हणतो, तेव्हा आपल्याला म्हणायचं असतं ते हे, की–

माणूस जन्मानं कुणी का असेना, ब्राह्मण असो की महार असो; आर्थिकदृष्ट्या कोणत्या का स्तरावरचा असेना, श्रीमंत असो की गरीब असो, त्याला स्वत:चा विकास साधायची समान संधी मिळाली पाहिजे. कुणाच्याही विकासात कुणाचाही अडथळा होऊ नये. सर्वांना समान लेखलं गेलं पाहिजे. कुणालाही कोणतेही विशेष अधिकार असता कामा नयेत.

जवाहरलाल आणि त्यांचा शिपाई समान आहेत, ते या अर्थानं.

। ११५ ।

लोकहिताची बरीच कामं आज आपण सरकारच्या डोक्यावर टाकून दिली आहेत. ही कामं सरकारनंच करायची, असं आपण ठरवून टाकलंय आणि सरकार आपण सामान्य लोकांच्या हाती सोपवून दिलंय. त्यामुळे होतं काय – ज्यांना आपण निवडून देतो, त्यांच्या हातात सरकार जातं. आपण निवडून कुणाला देतो? तर ज्यांना आपण 'आपलं' मानतो, त्यांना. आणि 'आपली' माणसं ही नेहमी आपल्या 'स्तरा'वरचीच असतात. म्हणजेच सामान्य असतात. सामान्य बुद्धीचे लोक नेहमी रूढिवादी, परंपरावादी; आणि कोणताही बदल करायला कुणी पुढे सरसावला, तर त्याला विरोध करणारे असे असतात.

म्हणजेच प्रतिगामी, प्रतिक्रियावादी.

व्हायला काय हवं?

ज्यांना समाजात बदल घडवून आणायचा असतो, त्यांनी सरकारमध्ये सामील होऊन आपला वेळ वाया घालवता कामा नये. सरकारमध्ये राहून कोणतेच बदल घडून येणार नाहीत. सरकारात जायचं, ते 'चाललंय, ते चालू द्या' अशा वृत्तीच्या माणसांनी. समाज बदलू पाहणाऱ्या लोकांनी सरकारबाहेरच राहिलं पाहिजे आणि सत्तेच्या राजकारणाऐवजी शक्तीचं राजकारण केलं पाहिजे.

श्रीकृष्णानं पाच साम्राज्यं जमीनदोस्त केली; पण एकही साम्राज्य त्यानं स्वत: हाती घेऊन चालवलं नाही. महात्मा गांधींनी पस्तीस वर्षांत स्वातंत्र्य मिळवून दिलं; पण स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ते स्वत: राष्ट्रपती झाले नाहीत, की प्रधानमंत्री झाले नाहीत. जयप्रकाश संकटकाळी सर्वोदय सोडून राजकारणात उतरले. इंदिरा गांधींच्या हुकुमशाहीनं पाय घट्ट रोवण्यापूर्वीच त्यांनी ती उखडून टाकली; पण सरकार त्यांनीही स्वत:च्या हातात घेतलं नाही. का? सरकारात राहून समाज बदलता येणार नाही, याची या सर्वांना खात्री पटली होती. त्यांना सरकार चालवायचं नव्हतं; समाज बदलायचा होता.

लोकशाहीत प्रज्ञावादी माणूस कधी सरकारात जाणार नाही. तो बाहेरच राहील आणि सरकारच्या सत्तेवर लोकांच्या सत्तेचा अंकुश ठेवील.

। ११६ ।

पंच्याऐंशी वय होईपर्यंत काकासाहेब कालेलकर सतत फिरत असायचे. ते एके ठिकाणी कधी बसून राहिले नाहीत. विचारांनीही ते ताजे, टवटवीत असत आणि केस पिकले तरी वार्धक्य त्यांना स्पर्श करू शकलं नव्हतं.

सर्वांना आश्चर्य वाटायचं.

कुणी तरी त्यांना विचारलं, "आजही नवी नवी कामं हाती घेऊन ती पुरी करायची ऊर्मी तुमच्यात दिसते, ती येते कुठून आणि कशी?" त्यावर ते म्हणाले, "जो एकसारखा फिरत असतो, त्याला म्हातारपण आणि मरण कधी गाठू शकत नाही. तो सदैव तरुणच राहतो. मी फिरत असतो; म्हणून ही कामं करू शकतो."

सतत फिरणारा माणूस मनानं ताजा, टवटवीत राहतो आणि मनानं ताजा असल्यामुळे तो कधी वेगानं म्हातारा होत नाही, हे खरं. पण काकासाहेबांच्या टवटवीतपणामागे आणखी एक कारण होतं–

जो समाज वारशानं त्यांना मिळाला होता, त्या समाजाच्या सुख-दुःखांशी ते समरस होऊ शकले. त्याचप्रमाणे, त्या सुख-दुःखांपासून ते अलिप्तही राहायला शिकले. त्यांच्याच शब्दांत सांगायचं, तर 'तादात्म्य' आणि 'ताटस्थ्य' या दोन्हीचा सुरेख मेळ त्यांनी आपल्या जीवनात घडवून आणला होता. जग जसं दुःखांनी भरलेलं आहे, तसंच ते सुखांनीही भरलेलं आहे, असं ते मानीत आणि या जगात जगायचं, तर हात-पाय हलवत, कर्म करीन जगलं पाहिजे, असं ते म्हणत.

जे सुख-दुःख, लाभ-हानी, यश-अपयश वाट्याला येतं, ते अलिप्तपणे भोगलं पाहिजे,. हे तत्त्वज्ञान काकासाहेबांनी अंगी पक्कं बाणवलं होतं. त्यामुळे त्यांना कधी निराशेनं ग्रासलं नाही की वैफल्यानं. ते सदा प्रसन्न असत.

ज्याचं मन प्रसन्न असतं, तो लवकर म्हातारा होत नाही.

। ११७ ।

काय झालंय आजच्या जगाला, कळेनासंच झालंय. मूल अजून जन्मालाही

आलेलं नसतं; पण त्याची नुसती चाहूल लागताच आई-बाप उठतात आणि एखाद्या नावाजलेल्या शाळेत त्याचं नाव घालून येतात.

आणि ही 'नावाजलेली' शाळा मुलाला के.जी.त ॲडमिशन दिल्यानंतर त्याला 'रिंगा रिंगा रोझीस, पॉकेट पुल ऑफ पोझीस, हाश्शा हुश्शा, ऑल फेल डाउन' अशी 'साँग्स' म्हणत इंग्रजीतून गायला-नाचायला शिकवते. पोर बिचारं काय शिकतं, त्याचं त्यालाच ठाऊक! इंग्रज मुलाला 'अरे अरे बाबू, कुठे तुझा साबू? साबू पडला कुळण्यात, बाबू हसला पाळण्यात ।' शिकवलं, तर तो जे काही शिकेल, ते आपली मुलं आज केजीत 'रिंगा रिंगा रोझीस' गाऊन शिकतात? याला 'शिक्षण' म्हणत नाहीत.

मूल शिकतंय, असं कधी म्हणता येतं? मुलाच्या तोंडून जे शब्द बाहेर पडतात, त्यांचा अर्थ त्याला कळायला लागतो, तेव्हा. चावीच्या बाहुल्याप्रमाणे मुलाच्या तोंडून इंग्रजी शब्द बाहेर पडू लागले, की मूल 'शिकू' लागलंय, असं ज्यांना वाटतं, त्या आई-बापांना अडाणी आणि शिक्षकांना मूर्खच म्हटलं पाहिजे. केजीतल्या मुलांना मिळायला हवं, ते त्यांच्या भोवतालच्या जगाचं त्यांनी आपणहून मिळवलेलं ज्ञान. पोपटपंची करून मिळवलेलं नव्हे.

पण कोण समजावून सांगणार मुलांच्या या अडाणी आई-बापांना?

मी विचारतो – हे आई-बाप तरी या केजीतल्या मुलांच्या वयाचे असताना कोणत्या शाळेत ज्ञान मिळवायला गेले होते? इतरांचं माहीत नाही; पण माझ्या भोवतालची सगळी मुलं दहा वर्षांची होईस्तोवर डोंगरावर जाऊन काजू तोड, मळ्यात जाऊन काकड्या चोर, कुळागारांत जाऊन पपनस काढ, तळ्यात पोहायला जा, असलाच सगळा वांडपणा करत असत आणि त्या वांडपणातूनच शिकत असत. आपण श्रीकृष्णाच्या परंपरेतले, असं मी मानतो. तो लहानपणी कोणत्या शाळेत शिकायला गेला होता? पंधरा वर्षांचा होईपर्यंत तर तो वांडपणाच करत होता. उन्हं, वारा, पाऊस सोसून जसं झाड वाढतं, तसा तो गुरांच्या, गोप-गोपींच्या, निसर्गाच्या सान्निध्यात वाढला. पंधराव्या वर्षी कंसाला मारून आणि तुरुंगात खितपत पडलेल्या आपल्या आई-वडिलांना सोडवून आणल्यानंतर तो सांदीपनींच्या आश्रमात शिकायला गेला. आणि मग किती भराभर त्यानं किती तरी विद्या संपादन केल्या. त्याच्यापेक्षा ज्ञानी कुणी झालाय तरी का?

श्रीकृष्णाच्या जीवनाचा हा भाग जरा नीट निरखून पाहिला, तरच शिक्षणाच्या नावानं आपण मुलांचं मूलपण कसं दाबून, चिरडून मारून टाकतो, ते लक्षात येईल.

कधी कधी वाटतं, शिक्षणाच्या नावानं सध्या मुलांचा छळ चालला आहे. सबब आजच्या शिक्षणावर बंदी आणावी, असं कोर्टात रिट पिटिशन करावं. कोर्ट कुणाच्या बाजूनं न्याय देतंय, ते तरी पाहायला मिळालं असतं. न्यायालयाचाच काय तो आधार उरलाय आजच्या भारत देशात.

। ११८ ।

मुलांना काही समजत नाही म्हणतात, ते खरं नाही. त्यांना सगळं समजतं. ती सगळं पाहतात, सगळं ऐकतात; आणि पाहतात-ऐकतात, त्यातून 'घ्यायला हवं' ते घेतात.

परवा एकानं एक गोष्ट सांगितली. त्याचं मूल पाळण्यात होतं. मुलानं डोळे मिटले होते. आई-बापाला वाटलं, ते झोपलं; म्हणून त्यांनी प्रणयचेष्टितं सुरू केली. मुलानं कधी तरी ते पाहिलं आणि कूस बदलली.

मी म्हटलं, "हॅ:! याच्यावरून तुम्ही करत होता, ते काय, हे त्याला कळलं, असं म्हणता येणार नाही. बोला-फुलाला गाठ पडते म्हणतात, तसं तुमची प्रणयचेष्टितं सुरू झाली आणि नेमकी त्याच वेळी त्यानं कूस बदलली. तुमची प्रणयचेष्टितं पाहून त्यानं कूस बदलली, असं म्हणणं बरोबर होणार नाही...'

तो म्हणू लागला, "तू मला सांगतोस? ...मीसुद्धा एकेकाळी लहान मूल होतोच की! मला चांगलं आठवतं... रात्री डोळे मिटून पडायचो. झोप आलेली नसायची. डोळे मिटलेले असले, तरी जागाच असायचो. मी एकदा माझ्या आई-वडिलांना प्रेम करताना पाहिलं. अडीच-तीन वर्षांचा असेन तेव्हा... हे काय चाललंय, ते मला कळलं-न कळलंसं काहीसं झालं. ते पाहायला मी रोज रात्री झोपेचं सोंग करायला लागलो. त्यांचं प्रेम सुरू झालं, की हळूच डोळे उघडून पाहायचो. मला काही समजत नव्हतं, असं नाही...'

मुलं लहान असली, तरी 'पूर्ण' असतात. भोवतालच्या लहान-मोठ्या गोष्टी बघून त्यातून 'घ्यायला हवं', ते ती घेतात आणि स्वत:ला घडवत जातात.

। ११९ ।

काळा पैसा बाहेर यायला हवा. तसं झालं नाही, तर आपल्या प्रगतीची एकही योजना पुढे सरकणार नाही. सुमारे एक लाख कोटी रुपये काळे झाले असल्याचा अंदाज आहे. (अर्थात, हेही हिमनगाचं वरून दिसणारं टोक आहे.)

हा काळा पैसा बाहेर कसा काढायचा? 'तुम्ही काळा पैसा जाहीर केलात, तर तुम्हाला अमुक सवलत देऊ, तमुक सवलत देऊ', अशी आश्वासनं सरकारनं देऊन काही काळा पैसा बाहेर यायचा नाही. मुळात खरेपणानं वागणाऱ्याला काळा पैसा जमवताच येत नाही.

हल्लीच्या काळात बरेच 'घोटाळे' उघडकीस आले आहेत. या दोन-चार वर्षांत सुमारे सतरा घोटाळे गाजले. शिक्षा कुणाला झाली नाही खरी; पण कुणा-कुणाचे हात या घोटाळ्यांत गुंतले आहेत, ते तरी जगाला कळलं. राष्ट्रीय चारित्र्य म्हणतात, ते कुणाजवळच नाही – सत्तेत असलेल्या पुढाऱ्यांत नाही, की विरोधी पक्षाच्या पुढाऱ्यांकडे नाही. प्रशासनातल्या अधिकाऱ्यांकडे नाही आणि पोलिसांकडेही नाही. वरपासून खालपर्यंत सगळे चोरच चोर भरले आहेत, असं स्पष्ट दिसून आलं.

आता ही एक उघडकीस आलेल्या घोटाळ्याची बातमी. पण उघडकीस न आलेले किती घोटाळे चालू आहेत, त्यांचा हिशेबही लागणार नाही.

हे आपल्याच देशात घडतं, असं नाही. दक्षिण कोरियाचे तीन राष्ट्राध्यक्ष अशा घोटाळ्यांत सापडले आहेत आणि त्यांना शिक्षाही झाल्या आहेत. जपानमधल्या दोन पंतप्रधानांवर चोरीचा आळ आल्यानं त्यांना पदावरून पायउतार व्हावं लागलं आहे. इटलीत तर पुन्हा-पुन्हा सरकारं – या एकाच कारणापायी बदलत राहिली आहेत. कुणी तरी 'खाऊ घालणारा' असतो आणि कुणी तरी 'खाणारा' असतो; म्हणून हे सारं चालतं. किंवा असं म्हणता येईल की, खाणारे असतात; म्हणून खाऊ घालणारे निर्माण होतात. बहुराष्ट्रीय कंपन्यांनी जिथे जिथे आपलं जाळं पसरलं, तिथे-तिथे असले – उघडकीस आलेले आणि न आलेले – घोटाळे चालू आहेत. आपला देश तर बुभुक्षित राजकारण्यांचा देश. किती खावं, याचा अंदाजदेखील नसलेल्यांचा देश. सत्तेचं पद कसं हस्तगत करायचं आणि एकदा ते हस्तगत केलं, की कसं टिकवायचं, याच विवंचनेत सदैव असलेल्यांचा देश. सत्तेवर जायचं, ते फक्त 'खाण्या'साठी, असं मनापासून मानणाऱ्यांचा देश. काळा पैसा हे लोकच निर्माण करतात आणि आपापल्या सीमित वर्तुळात फिरवत ठेवतात. त्यांना या सवलती दिल्या किंवा त्या सवलती दिल्या, म्हणून काळा पैसा थोडाच बाहेर येणार आहे? आणि समजा, बाहेर आला, तरी परत तो त्यांच्याकडेच जाणार नाही, याचा भरवसा काय?

उपाय करायचा, तर एकाच दगडात दोन पक्षी मारण्याचा करावा लागेल. म्हणजे, त्या उपायानं सगळा काळा पैसा तर बाहेर यायला हवा आणि त्याच बरोबर काळा पैसा निर्माण करण्याचे सारे मार्गही बंद व्हायला हवेत.

असा एकच उपाय आहे–

रिझर्व्ह बँकेनं चलनात असलेल्या सगळ्या नोटाच बदलून द्यायच्या. आता चालताहेत, त्या नोटा ३१ डिसेंबरपर्यंतच चालतील, त्यानंतर बदललेल्या नोटाच चालतील, जुन्या नोटा चालणार नाहीत, असा निर्णयच घेऊन टाकायचा. सगळा काळा पैसा बाहेर येईल.

काही वर्षांपूर्वी सरकारनं शंभराच्या नोटा बदलल्या होत्या. त्या वेळी भल्या-भल्यांच्या तोंडचं पाणी पळालं होतं. कित्येक जण ॲटॅक येऊन मेले. या खेपेस सगळ्याच नोटा बदलायच्या. दर वर्षी नोटा बदलतील, मागच्या कोणत्याच नोटा चालणार नाहीत, असा नियम करायचा. तेव्हाच सगळा काळा पैसा बाहेर येईल. सरकारला करता येईल हा उपाय योजण्याचं धाडस? करावंच लागेल. नाही तर...

देशातला काळा पैसा बाहेर येण्याची आणि राष्ट्रीय चारित्र्य सुधारण्याची आशाच नाही.

। १२० ।

रिक्षा सुरू झाली आणि रिक्षावाला गाऊ लागला–

*सत मत छोड़े सूरमाँ, सत छोड्या पत जाय ।*
*सत की बांदी लच्छमी, फेर मिलेगी आय ॥*

मी विचारलं, ''भैया, ये किसके शब्द हैं? कबीर के?''

''मालूम नहीं साब, मेरे दादा यह गाया करते थे, मेरे पिताजी भी गाते थे।'' तो म्हणाला.

''अर्थ तुला माहीत आहे का तू गातोयस त्याचा?''

''हां साब और कहानी भी मालूम है ।'' तो म्हणाला.

''तो सुनाओ...'' मी म्हटलं.

मग त्यानं ती कथा सांगितली.

एक शेठजी होते. सात पिढ्यांपासून घरात अपार वैभव नांदत होतं. कुणाचंही दुःख पाहिलं, की त्यांच्या काळजात कळवळा दाटे. सगळ्यांना ते मदत करीत असत. कुणाला कधी 'नाही' म्हणत नसत. एक दिवस त्यांना वाटेत अगदी मरायला टेकलेली एक स्त्री दिसली. अंगावर लक्तरं, केसांच्या जटा झालेल्या, धुळीनं भरलेली, अशी.

''कोण गं बाई तू? तुझी अशी अवस्था का झाली?'' शेठजींनी विचारलं,

"नाव काय तुझं?"

"लोक मला 'दरिद्रता' म्हणून हाक मारतात. कुणी मला जवळ करीत नाहीत. नजरेस पडले, तर हाकलून लावतात... भीक मागून मी दिवस काढते." ती म्हणाली.

"तू माझ्याकडे येऊन रहा. तुला तिथे काही कमी पडणार नाही." असं म्हणून शेठजी तिला आपल्या घरी घेऊन आले.

घरात पाऊल ठेवताच घरातून एका सुंदर स्त्रीला बाहेर पडताना शेठजींनी पाहिलं. "बाई, कोण तू? कुठे जातेस?" शेठजींनी तिला विचारलं.

"मी लक्ष्मी." ती म्हणाली, "सात पिढ्यांपासून या घरात मानानं आणि सुखानं राहत आले आहे. पण आज तू या दरिद्रतेला घेऊन आलास. माझं आणि तिचं पटत नाही. जिथे ती असेल, तिथे मी राहत नाही." असं म्हणून लक्ष्मी निघून गेली.

दुसऱ्या दिवसापासून दरिद्रतेनं शेठजींच्या घरात आपले हात-पाय पसरायला सुरुवात केली. शेठजींचं एक जहाज झांजीबारहून माल घेऊन येत होतं, ते मुंबईला पोहोचण्यापूर्वीच समुद्रात बुडालं. शेठजींना कर्ज काढावं लागलं. कर्ज फिटेना, तेव्हा कर्ज देणाऱ्यांनी शेठजींच्या दुकानाचा लिलाव केला. होता-होता घराचाही लिलाव व्हायची वेळ आली. शेठजी हवालदिल झाले. एक दिवस पाहिलं, तर शेठजींच्या घरातून एक दिव्य पुरुष बाहेर जाऊ लागला. त्याच्याबरोबर एक सुंदर स्त्रीदेखील होती.

"तुम्ही कोण? घर सोडून का जाताहात?" शेठजींनी त्यांना विचारलं.

"मी सत्य... सात पिढ्यांपासून या घरात राहत आलो. आता तुला मला या घरात ठेवणं परवडणार नाही; म्हणून तू मला सोडायच्या आधी मीच तुला सोडून जातो आहे." तो म्हणाला.

शेठजींनी त्याचे पाय धरले आणि म्हटलं, "मी लक्ष्मीला जाऊ दिलं, कीर्तीला जाऊ दिलं, पुण्याला जाऊ दिलं. मी सगळ्यांना सोडेन; पण तुला नाही सोडणार. तुझ्यासोबत राहण्यासाठीच तर मी जगातल्या सर्व सुखांवर आणि साऱ्या वैभवावर पाणी सोडलं. कितीही संकट कोसळली, तरी मी तुला नाही सोडणार."

शेठजींचे शब्द ऐकून सत्त्याच्या चेहऱ्यावर हसू फुललं. तो म्हणाला, "तुझ्यासारख्या सत्यव्रती माणसाला सोडून जाणं मला जमणारही नाही. मी जाणार नाही."

काही दिवसांनी लक्ष्मीनं विचार केला, "अशा माणसाला मी का बरं सोडून

आले?...मी असते, तिथे दारिद्र्य राहतच नाही.'' लक्ष्मी घरात परतली. पाठोपाठ कीर्तीही आली.

आणि त्याच क्षणी दरिद्रता घर सोडून गेली.

कहाणी सांगून रिक्षावाला म्हणाला, ''तीन पीढ़ियों से हम इसीको मान कर चलते आए हैं । हमारे यहाँ हद से ज्यादा पैसा नहीं आता, मगर ईमानदारी से, मेहनत करके खाते हैं । कोई भूखा नहीं रहता...''

मी त्याला म्हटलं, ''हिंदुस्थान जिवंत आहे, तो तुमच्यासारख्या लोकांच्या या संस्कृतीमुळेच.''

## । १२१ ।

कबीराचं एक भजन आहे–

*मोको कहाँ ढूँढ़े बंदे, मैं तो तेरे पास में ।*
*ना मैं मंदिर, ना मैं मस्जिद, ना काबे कैलाश में ।*
*ना तो कौनो क्रिया कर्म में, ना ही योग बैराग में ।*
*खोजि होय तो तुरतै मिलि हों, पल भर की तलास में ।*
*कहै कबीर, सुनो भई साधो, सब स्वासों की स्वास में ।*

कुणाला शोधतोस, बाबा? मलाच ना? मग कुठे शोधतोस? देवळात? मी देवळात नाही, मशिदीत नाही. तुला काय वाटतं, मी काबा-कैलाससारख्या तीर्थस्थळी असेन म्हणून? नाही. मी तिथेही नाही. मला मिळवण्यासाठी तू कितीही कर्मकांडं कर, देवळात जा, नाक घास, पूजा कर, यज्ञ कर, जप कर, व्रतं-वैकल्यं, उपास-तापास कर, योग कर, राना-वनांत जाऊन ध्यान कर, बैरागी हो, काहीही कर, मी तुला असा मिळणारच नाही. मी जिथे आहे, तिथे तू पोहोचूच शकणार नाहीस. मला जिथे शोधायचं, तिथे तू शोधतच नाहीस. तुला नीट शोधताच येत नाही. नीट शोधलं असतंस, तर एक क्षणात मी तुला सापडलो असतो बघ. कुठे माहीत आहे? अरे, तुझ्यातच. तुझ्याच हृदयात. इतका जवळ आहे मी तुझ्या. इतका पुढ्यात. कबीर म्हणतो, ऐक, तो आहे तुझ्या श्वासा-श्वासात. तिथे शोध त्याला. तिथे सापडला, की तो तुला इतरत्रही दिसू लागेल.

सोहिरोबानं म्हटलंय–

*जवळिं असून, तुझे हृदयिं वसून*
*भगवंत नये रे दिसून,*
*तरि तुझे काय जिणे रे असून.*

विल्यम लॉ म्हणतो–

Though God is everywhere present, he is only present to thee in the deepest and the most central path of your soul.

कबीर हेच सांगतो–

*इस घट* अंतर बाग-बगीचे, इसीमें सिरजनहारा* ।*
*इस घट अंतर सात समुंदर, इसीमें नौलख तारा ।*
*इस घट अंतर पारस मोती, इसीमें पारख हारा ।*
*इस घट अंतर अनहद* गरजै, इसीमें फुटत फुहारा ।*
*कहत कबीर सुनो भई साधो, इसीमें साईं हमारा ॥*

याच तुझ्या देहाच्या आत जरा नजर वळवून पहा, सुंदरातले सुंदर बाग-बगीचे, नंदनवनं तुला तुझ्या अंतरात आढळतील. आणि तिथेच तुला 'तो'ही भेटेल. तिथेच तुला सात समुद्र पाहायला मिळतील आणि तिथेच तुझ्या हृदयाकाशात नऊ लाख तारे तुझ्या दृष्टीस पडतील. जीवनाचं सोनं करणारा परीसही तुला तिथेच सापडेल आणि रत्नपारखीही तिथेच बसलेला आढळेल. अवघ्या विश्वात जो नाद निनादतो आहे, तोही तुला तिथेच ऐकू येईल आणि तिथेच तऱ्हे-तऱ्हेचे झरे फुटलेले तू पाहू शकशील. कबीर म्हणतो, बाबा रे, त्याला शोधायला तू इकडे-तिकडे फिरू नकोस. स्वतःच्या काळजातच डोकावून पहा. 'तो' तिथेच तुझ्या दृष्टीस पडेल.

## । १२२ ।

ईश्वरप्राप्ती करून घ्यायची म्हणजे नेमकं काय मिळवायचं? ईश्वरप्राप्तीची एक इच्छा आपल्या मनात खोलवर वसत असते. तिचं रूप आहे तरी कसं?

आयुष्यभर आपण काही ना काही तरी मिळवत असतो. पैसा मिळवतो, पद मिळवतो, सत्ता मिळवतो, नाव मिळवतो. मिळवायला हवं, असं आपण जेव्हा म्हणतो, तेव्हा असंच काय काय आपण मिळवू इच्छित असतो, असं वाटतं. रवींद्रनाथ म्हणतात, ईश्वरप्राप्ती ही अशा प्रकारातली मिळकत नव्हे.

---

* **घट** - शरीर, देह. **सिरजनहारा** - ईश्वर. **अनहद** - अनाहत नाद. योगविद्येतला हा पारिभाषिक शब्द. कुण्डलिनी म्हणे सामान्यतः खाली तोंड करून असते (अधोमुख). योगिक साधनेत ती वर तोंड करते (ऊर्ध्वमुखी होते), तेव्हा एक नाद निनादू लागतो. हा 'अनाहत नाद' वा 'अनहद नाद', जो संपूर्ण विश्वात भरून राहिलेला असतो.

जे जे मिळवायचं, त्या यादीतली आणखी एक गोष्ट नव्हे ही. आपण इतकं मिळवलं, की त्याचाच आपल्याला वीट येऊ लागला. त्यातून आता मुक्त व्हावंसं वाटू लागलं. यापेक्षा वेगळं काही तरी मिळवायची ओढ काळजाला लागली. जे नित्योऽनित्यानाम् - या साऱ्या अनित्य गोष्टींनी ज्याला नित्य म्हणून संबोधलं, ते मिळवायची, जे रसानाम् रसतमः – ते प्राप्त करायची ओढ लागली.

काळजाला लागलेल्या या ओढीचं हे रूप आपल्यापुढे ठेवून रवींद्रनाथ आपल्याला विचारतात, ईश्वर कुठे आहे, ठाऊक आहे तुम्हाला? तुमच्या अवती-भवती पसरलेल्या या विश्वातच त्याला पहा... जे जे या जगात जन्माला येतं, या जगी जगल्यासारखं वाटतं आणि पाहता-पाहता विनाश पावतं, जे जे अव्यक्तातून व्यक्त होतं आणि पुन्हा अव्यक्तात विलीन होतं, ते ईश्वरानंच घेतलेलं रूप. हे समजून घेऊन भोवतालच्या निसर्गाकडे तुम्ही पाहू लागलात, की झाडा-झुडपांपासून, कृमी-कीटकांपासून ते नक्षत्रलोकापर्यंत साऱ्या ब्रह्मांडात सर्वत्र तुम्हाला ईश्वर दिसू लागेल.

मग तुम्हालाच प्रश्न पडेल–

या साऱ्या चर-अचर विश्वाशी आपण अजून एकरूप का होऊ शकलो नाही? आणि एकरूप का होऊ शकलो नाही, याचा खोलात जाऊन जेव्हा तुम्ही शोध घेऊ लागाल, तेव्हा तुम्हाला कळून चुकेल की, आपल्यातलाच ओबडधोबडपणा, त्रुटी आपल्याला विश्वाशी एकरूप होऊ देत नाहीत.

मग तुम्हाला हे ओबडधोबडपण दूर करायची तळमळ लागेल. या तळमळीनं जेव्हा तुमचं काळीज रडू लागेल, तेव्हा तुमच्या लक्षात येईल–

ईश्वर तर आपल्याला देतच राहिला आहे. आपणच त्याला घेऊ शकलो नाही. तऱ्हेतऱ्हेच्या स्वार्थांच्या, तऱ्हेतऱ्हेच्या अहंकारांच्या, तऱ्हेतऱ्हेच्या क्षुद्रतांच्या भिंती आपण आपल्याभोवती उभ्या करून ठेवल्या आहेत आणि स्वतःलाच या भिंतींत कैद करून घेतलं आहे.

या भिंती पाडा. तुमच्या आणि त्याच्या मीलनात जे जे अडथळे तुम्ही निर्माण करून ठेवले आहेत, ते सारे कोसळू द्या आणि त्याला सर्वस्वी शरण या.

एवढं सांगून रवींद्रनाथ म्हणतात–

ईश्वराची उपासना ही खऱ्या अर्थानं ईश्वरप्राप्तीची उपासना नव्हे; तर स्वतःला समर्पित करण्याची, स्वतःला देऊन टाकण्याची उपासना होय. जीवन जगत असताना भक्ती, दया, क्षमा, संतोष, सेवा यांच्या आधारे ईश्वराच्या स्वाधीन होण्याची ही साधना. म्हणून अजून आपल्याला ईश्वरप्राप्ती का होत

नाही, याची चिंता करत बसू नये; तर अजून आपण स्वत:ला ईश्वरार्पण का करू शकलो नाही, याची चिंता करायला हवी.

मग 'साधने'चा सारा मार्ग आपल्यापुढे खुला होईल.

। १२३ ।

ईश्वराला कुणी जगदीश म्हटलं आहे, कुणी राजराजेश्वर; तर कुणी त्याला विश्वाचा धनी म्हटलं आहे. ईश्वराला अनेकानेक नावांनी लोकानी संबोधलं आहे. तात, मात, गुरू, सखा... एक-दोन नव्हे; हजार नावांनी.

गांधींनी? त्यांनी त्याला 'नम्रता के सम्राट' म्हणून संबोधलं आहे.

जगभरातल्या धार्मिक-आध्यात्मिक साहित्यात हे संबोधन अगदीच आगळं-वेगळं. ते म्हणतात–

*हे नम्रता के सम्राट ।*
*दीन भंगी की हीन कुटिया के निवासी*
*गंगा, यमुना और ब्रह्मपुत्रा के जलों से सिंचित*
*इस सुंदर देश में*
*तुझे सब जगह खोजने में हमें मदद दे;*
*हिंन्दुस्तान की जनता से*
*एकरूप होने की शक्ति और उत्कंठा दे ।*
*हे भगवान ।*
*तू तभी मदद के लिए आता है,*
*जब मनुष्य शून्य बनकर तेरी शरण लेता है ।*
*हमें वरदान दे,*
*कि सेवक और मित्र के नाते*
*जिस जनता की हम सेवा करना चाहते हैं,*
*उससे कभी अलग न पड जायें ।*
*हमें त्याग, भक्ति और नम्रता की मूर्ति बना ।*
*ताकि इस देश को हम ज़्यादा समझें*
*और ज़्यादा चाहें...*

वैदिक परंपरेतलीच ही एक प्रार्थना. वेदात म्हटलंय–

*नम इन् उग्रं नम आ निवासे*
*नमो दाधार पृथिवी उत् दयाम.*

- नम्रता मोठीच. मी नम्रतेची उपासना करतो. नम्रतेनेच धरती आणि स्वर्ग झेलून धरतो.

*तत् नम इत्युपासीत*
*नम्यन्ते अस्मै कामा:*

- नम्रतेनेच त्याची उपासना केली पाहिजे. जो नम्रतापूर्वक त्याची उपासना करतो, त्याच्या सगळ्या वासना, सगळ्या कामना नममस्तक होतात - तो निर्विकार होतो.

गांधींनी एकच कविता केली.

पण अर्थानं ओतप्रोत भरलेली.

। १२४ ।

गीतेत सांगितलंय, तेच कुराणातही सापडतं, तेच बायबलमध्ये येतं, तेच अवेस्तात आहे, असं आपण किती वेळा एकमेकांना सांगत राहणार? रामकृष्ण परमहंसांनी हे सांगायला सुरुवात केली होती, त्याला आता शंभरावर वर्षं उलटून गेली, तरीही आपण तेच एकमेकांना सतत सांगत राहिलो आहोत आणि तरीही धर्म एकमेकांच्या जवळ येऊ शकलेले नाहीत. असं का?

सगळ्या धर्मांची शिकवण एक आहे, हे खरं; सगळे धर्म खरे आणि बरे, हेही खरंच; पण त्यांनी एकमेकांच्या जवळ यावं, यासाठी एवढं पुरेसं नाही, असा त्याचा अर्थ. जवळ येऊन त्यांनी एकमेकांना प्रभावित करायला जे आणखी काही तरी असलं पाहिजे, ते त्यांना द्यायला आपण असमर्थ ठरलो आहोत, असं म्हणावं लागेल. आपण त्यांना फक्त एवढंच सांगितलं की, तुम्ही खरे आणि बरे; त्यामुळे आपण फक्त धर्म-साहिष्णुतेचंच वातावरण भोवताली उभं करू शकलो. हिंदू मुसलमानांना आणि मुसलमान ख्रिश्चन आणि हिंदूंना 'सहन करायला' शिकले. पण धर्मसमन्वयासाठी ज्याची गरज आहे, ते या 'सहन करण्या'तून मिळालं का?

एकच माणूस होऊन गेला या जगात, ज्यानं सांगितलं, "बाबांनो, सगळे धर्म खरे आणि बरे, हे खरं; पण सगळे अपूर्ण राहिलेत, अर्धे राहिलेत, कच्चे राहिलेत, हे विसरू नका. ते असेच राहिले, तर 'फॉसिलाइझ्ड्' होतील. त्यांना जिवंत राखायचं असेल, तर अपूर्ण धर्म पूर्ण झाले पाहिजेत; आणि ते पूर्ण व्हायला सर्व धर्मांनी एकमेकांच्या जवळ यायला हवं. या 'इंटरॲक्शन' विना कोणताच धर्म पूर्ण व्हायचा नाही.

सगळे धर्म खरे आणि बरे, असं सांगणारे उदंड धर्मपुरुष होऊन गेले जगात; पण सगळे धर्म अपूर्ण राहिलेत, अर्धे राहिलेत, कच्चे राहिलेत, हे सांगणारा हा एकच धर्मपुरुष.

आपल्याला घडवून आणायचा आहे, तो धर्म-समन्वय. कोणाच्याही आगळे-वेगळेपणाला – identity ला – बाध येऊ न देता सगळ्यांना एकत्र आणून त्यांचं एक धर्मकुटुंब सुरू करून देऊन ते आपल्याला चालवायचं आहे. या कुटुंबात हिंदू हिंदूच राहील; पण फक्त हिंदूंचा असणार नाही. तो सर्वांचा होईल. तसेच मुसलमान आणि ख्रिश्चन हे मुसलमान आणि ख्रिश्चनच राहतील; पण मुसलमान फक्त मुसलमानांचा आणि ख्रिश्चन फक्त ख्रिश्चनांचा, असं असणार नाही. दोघेही सगळ्यांचेच असतील.

किती भव्य आदर्श ठेवला त्यानं देशासमोर!

। १२५ ।

ज्या तत्त्वानं विश्वाची निर्मिती झाली, तेच तत्त्व माझ्यात आहे, या बाह्य आणि आंतरिक तत्त्वाला ओळखणं, जाणून घेणं, हेच खरं ज्ञान. हा विचार युगानुयुगं जगात चालत आला आहे. आपल्याच देशात नव्हे; तर सर्वत्र. ज्यांना आपण आदिवासी अवस्थेतले लोक म्हणतो, त्यांच्यातही.

या विचारात ‘काही अर्थ नाही’, ‘हे सगळं थोतांड आहे’, असं कितीही कुणीही म्हणालं, तरीही या विचाराला दडपून टाकणं अजून कुणाला जमलेलं नाही.

कारण ही आहे माणसाची आंतरिक ओढ. त्याची आतंरिक तृप्तीही त्यातच आहे.

ही आंतरिक तृप्ती मिळवण्यासाठी माणूस जेव्हा आधार शोधतो, तेव्हा तो विद्वानांनी लिहिलेली पुस्तकं हाती घेत नाही. तो आधार घेतो तुकाराम, कबीर, सूरदास अशाच कुणा संताचा.

मग तो कोणत्या का धर्माचा असेना!

श्री रामकृष्ण परमहंसांचा उपदेश माझे वडील जितक्या ओढीनं वाचत, तितक्याच ओढीनं ते जलालुद्दीन रूमीच्या कविता (फ्रेंचमध्ये अनुवादित झालेल्या) वाचत आणि तितक्याच भक्तिभावानं ते ‘इमितासांव दु क्रिश्तु’ (Imitation of Christ) वाचत.

मला डॉ. राधाकृष्णन् यांच्यापेक्षा गुरुदेव रानडे आवडतात. वामन पंडितापेक्षा ज्ञानेश्वर आवडतो. कबीर, सूर, मीरा, तुकाराम, नानक हेही आवडतात.

पंडितांपेक्षा या लोकांनाच ते तत्त्व अधिक चांगलं समजलं आहे, असं वाटतं; आणि ते समजून घेण्यासाठी त्यांचाच आधार मी घेतो. ते मला आधारच नव्हे; तर धीरही देतात.

ख्रिस्तानं म्हटलंय – 'Blessed are the pure in heart for they shall see God.' का ते सांगता येणार नाही; पण ज्याचं मन निर्मळ, ज्याचं हृदय पवित्र, त्यालाच परमेश्वराचं दर्शन होईल. त्याची जीवनाकडे पाहण्याची नजर वेगळी आणि व्यासंगी, विद्वान, संसारी माणसाची नजर वेगळी. कोण संत आणि कोण केवळ पंडित, हे सहज ओळखता येतं.

ब्रह्मविद्या ही विद्याच असली, तरी ती अवगत व्हायची, तर माणूस निर्मळ, प्रेमळ, नम्र, ऋजुहृदयी – Pure in heart – असायला हवा.

। १२६ ।

सकाळच्या स्वाध्यायासाठी हल्ली मी उपनिषदं घेऊन बसतो. हिमालयासारखा पर्वत नाही, तद्वतच उपनिषदांसारखा ग्रंथ नाही, असं विनोबांनी म्हटलंय. गेल्या चार दशकांच्या अनुभवातून माझंही हेच मत झालंय.

उपनिषदांत काव्य जेवढं ओतप्रोत भरलेलं आहे, तेवढंच तत्त्वज्ञानही.

शॉपेनहॉवरच्या हातात उपनिषदं पडली, तेव्हा त्याचं हृदय इतकं उचंबळून आलं, की तो ती माथ्यावर घेऊन नाचू लागला. 'मी शोधत होतो, ते सारं मला उपनिषदांत सापडलं... आयुष्यभर वाचायला मला आता हे एकच पुस्तक पुरे', असं तो म्हणत राहिला.

मला त्याचं आश्चर्य अजिबात वाटत नाही. उपनिषदं म्हणजे उपनिषदं. त्यांची गोडीच वेगळी. रवींद्रनाथ वाढले, ते उपनिषदांच्या वातावरणातच. 'जीवनदेवते'ची उपासना ते उपनिषदांकडूनच शिकले.

उपनिषदांची व्याख्या स्वत: उपनिषदांनीच केली आहे – माणसाला जेव्हा अंतरातून जाग येते, तेव्हा तो म्हणे उठून उभा राहतो आणि गुरूच्या शोधात निघतो. गुरूकडे जाऊन राहतो. त्याची सेवा करतो. त्याच्यापाशी बसून त्याच्या जीवनाचं निरीक्षण करतो. गुरू सांगेल, त्याचं श्रवण करतो, त्याचा विचार करतो, त्याचं चिंतन-मनन करतो, ते नीट समजून घेतो, आचरणात आणतो आणि अखेर *'विज्ञाता भवति'* - अनुभवातून जाणकार बनतो. ज्ञान मिळवतो.

उपनिषद म्हणजे गुरूकडे जाऊन, त्याच्याजवळ बसून निष्ठापूर्वक ज्ञान

संपादन करणं.

गुरू हा माणसाच्याच रूपात मिळायला हवा, असं नाही. माणसाच्या रूपातला गुरू कधी-कधी मिळतही नाही; पण प्रत्येकाच्या हृदयात एक गुरू वसत असतो. त्याला आपण 'अंतर्यामी' म्हणतो. तो आठही प्रहर आपल्याजवळच असतो. तो आपल्याला कधीही अंतर देत नाही. त्याच्यापाशी बसावं, तो सांगेल ते ऐकावं, त्याचं चिंतन-मनन करावं आणि त्याला सांगाती घेऊन चालावं.

ज्ञान संपादन करण्याची ही सर्वांत चांगली पद्धत. जगण्याचीही ही सर्वांत चांगली कला.

उपनिषदांना जाणकार लोक 'वेदान्त' या नावानंही ओळखतात. वेदान्त म्हणजे, वेद संपल्यानंतर वेदांबाहेर मिळतं, ते ज्ञान. वेदांचा त्याग केला, की ते मिळतं, असा याचा अर्थ.

आपल्याच वारशाचं या प्रकारे खंडन आणि त्याचा निषेध करणारा धर्मग्रंथ जगात कुठेही सापडायचा नाही. आपण सीमाबद्ध जगात जगत असतो. सीमेपलीकडच्याची – असीमाची – प्राप्ती करून घ्यायची, तर परंपरेनं मिळालेला वारसा त्यागून बाहेर पडावं लागेल, असं फक्त उपनिषदंच सांगू शकली आहेत.

वैदिक परंपरेच्या विरोधात फक्त बुद्धानंच बंड केलं, असं म्हणतात, ते खरं नव्हे. बुद्धापूर्वी उपनिषदांनी ते केलं होतं.

मला उपनिषदांविषयी ओढ निर्माण झाली, ती आणखी एका कारणानं–

जगातले सर्व धर्मग्रंथ, 'तू पापी आहेस, देवाला शरण जा. तोच तुला मार्ग दाखवील,' असं सांगत आले आहेत. या शिकवणुकीनुसारच, *'तू दयालू, दीन हौं, तू दानी हौं भिखारी । हौं प्रसिद्ध पातकी, तू पापपूँज हारी ।'* असं तुलसीदासासारखे संतही गात आले आहेत. उपनिषदं म्हणतात, ''छे छे! तू पातकी नाहीस, तू दीन नाहीस, तू भिकारी नाहीस... तू 'तो' आहेस (तत् त्वम् असि ।). 'त्या'चंच रूप तू – चैतन्यानं भरलेलं. तुझं हे रूप आधी नीट ओळखून घे. मग तुला पाप स्पर्शही करू शकणार नाही...''

आपण 'त्या'चंच रूप आहोत, हे एकदा कळल्यावर माणूस आत्मविश्वासानं भरून जाईल आणि मग अवघं जग जरी त्याच्या विरोधात गेलं, तरी तो धीरानं पावलं टाकीत पुढेच जाईल.

खरं आहे, हिमालयासारखा पर्वत आपल्याच देशात पाहायला मिळतो. गंगेसारखी नदीही आपल्याच देशात पाहायला मिळते. गिरसप्पासारखा (जोग) धबधबाही आपल्याच देशात पाहायला मिळतो.

उपनिषदांसारखा ग्रंथही आपल्याच देशात निर्माण होऊ शकला; म्हणूनच बहुधा हाच देश बुद्ध, गांधी यांच्यासारखा महापुरुषांना जन्माला घालू शकला.

उपनिषदं ज्यांनी वाचली नाहीत, ते अडाणी!

उपनिषदं ज्या भाषेत नाहीत, ती भाषा दरिद्री!

। १२७ ।

'तैत्तिरीय उपनिषद' वाचायला उघडलं. काय मिळावं मला? एक 'कॉन्व्होकेशन ॲड्रेस.' पुरातन. पण तरीही नवं, ताजं. सूर्य पुरातनातला पुरातन. पण उगवतो तेव्हा रोज तो नवा असतो, तसंच.

मुलाचं शिक्षण संपलं आहे, तो आश्रमातून घरी जायला निघाला आहे. तेव्हा आचार्य त्याला सांगतात–

तू आता इथून ज्या जगात प्रवेश करणार आहेस, तिथे तुला कोणत्या प्रकारची माणसं भेटतील, सांगता येणार नाही. ती माणसं चांगलीच असतील, असं नाही. पण तुझं आचरण मात्र चांगलंच असलं पाहिजे. माझ्या विद्यार्थ्याला शोभेल, असंच असायला हवं. म्हणून आज मी तुला चांगल्या वर्तनाची एक विभूती बांधून देतो. तुला ती आयुष्यभर उपयोगी पडेल.

पहिली गोष्ट – सत्यं वद । सदैव सत्याचंच आचरण करीन, नेहमी खरं तेच बोलेन, असा नियम कर. तुझ्या भोवतालच्या जगात खोटेपणा करून भरभराटीला आलेले लोक तुला असंख्य भेटतील. तू त्यांच्यासारखा होऊ नकोस. खोटं बोलून कितीही लाभ होणार असो आणि खरं बोलून कितीही संकटं कोसळोत, तू खोटं कधीही बोलू नकोस. सदैव खरं तेच बोल. जो कधी खोटं बोलत नाही, त्याच्या तोंडून बाहेर पडणारे शब्द कधीही खोटे ठरत नाहीत. जिथे खोटेपणाचंच वर्चस्व चालतं, तिथे एक तरी माणूस खरं बोलणारा असावा, सत्याला धरून चालणारा असावा. तो एकटाच समाजातला खोटेपणा नष्ट करू शकेल. समाजातला खोटेपणा नष्ट करण्याचा दुसरा मार्ग नाही. तू असा हो.

दुसरी गोष्ट – धर्मम् चर । माणुसकीला धरून चाल. कितीही मोठा लाभ होणार असला, तरी माणुसकी सोडणार नाही; माणूसपणाला बाध येईल, लाजेनं मान खाली घालावी लागेल, असं कोणतंच कृत्य आपल्या हातून कधी घडू नये म्हणून प्रयत्न करीन, असा निश्चय कर. जिथे सगळे माणुसकी सोडून वागत असतात, तिथे एक तरी माणूस माणुसकीला धरून चालणारा

असायला हवा. समाजाला माणूसपणाच्या मार्गावर आणण्याचा दुसरा मार्ग नाही. तू असा हो.

तिसरी गोष्ट – स्वाध्यायात् मा प्रमदः । स्वाध्यायाच्या बाबतीत आळस करू नकोस. शिकायचं ते सगळं शिकून झालं, आता काय शिकायचं राहिलंय, असं म्हणू नकोस. शिकण्यासारखं जगात एवढं काही आहे की, त्याचा लाखावा अंश जरी शिकून घ्यायचा म्हटला, तरी एक जन्म पुरणार नाही. म्हणून आयुष्यभर शिकत राहायला हवं. सतत नवीन काही ना काही शिकत राहायचं; असा नियम केला पाहिजे.

तैत्तिरीय उपनिषदातला हा गुरू स्वाध्यायाला आणि प्रवचनाला – शिकण्या आणि शिकवण्याला – एक महान, उच्च आणि जातिवंत व्यवसाय मानतो. कारण, यापूर्वी तो नेहमीच मुलांना सांगत आला आहे की, तुम्ही काहीही करा, सत्य आचरणात आणण्याचा प्रयत्न करा, तप करा, इंद्रियनिग्रह आणि मनोनिग्रह करा, विवाह करा, घर-संसार थाटा, सगळे लौकिक व्यवहार करा, पै-पाहुण्यांची सरबराई करा; पण शिकण्यात आणि शिकवण्यात खंड पडू देऊ नका. – *सत्यं च स्वाध्याय प्रवचने च, तपश्च स्वाध्याय प्रवचने च, दमश्च स्वाध्याय प्रवचने च, शमश्च स्वाध्याय प्रवचने च ।*

जो शिकत नाही आणि शिकवत नाही, त्याच्या बुद्धीला गंज चढतो, ती निद्रिस्त होते, तिची धार जाते; आणि यामुळे माणूस मतिमंद होतो. माणसाची बुद्धी सदैव तरतरीत असायला हवी. म्हणून हा गुरू मुलांना *'स्वाध्यायात् मा प्रमदः ।'* असं सांगतो. आयुष्यभर नवं-नवं वाचा, नवं-नवं काही शिका, असं सांगतो. जगातल्या सगळ्या नद्या जशा समुद्राला जाऊन मिळतात, तद्वतच शिकू इच्छिणारी मुलं दाही दिशांतून आपल्याकडे यावीत, अशी मागणी करणारा हा गुरू आहे... *'यथाऽपः प्रवता यन्ति... एवं मां ब्रह्मचारिणो धातरायन्तु सर्वतः ।'* तो आता या मुलांना सांगतो, "माझी इच्छा तुम्ही जाणता. नवी-नवी मुलं दाही दिशांतून शिकण्यासाठी माझ्याकडे यायला हवीत. तुमच्याकडे पाहून इतर मुलांना इथे येण्याची प्रेरणा मिळायला हवी. ही माझी इच्छा पुरवा. *'आचार्याय प्रियं धनम् आहृत्य ।'* ही परंपरा तुटू देऊ नका. देवांच्या, ऋषींच्या, पितरांच्या, माता-पित्यांच्या ऋणातून मुक्त व्हायचं, त्यासाठी जे जे करायला हवं, ते ते करा. *'यानि अनवधनि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि ।'* इतर काही करू नका. ते का? तर (माझ्या) गुरूच्या सान्निध्यात राहून त्याच्या आचरणातून जे घ्यायचे, ते चांगले तेच. दुसरे काही घ्यायचे नाही. *'अस्माकं यानि सुचरितानि तानि त्वया उपास्यानि*

*नो इतराणि ।'* आपल्यापेक्षा श्रेष्ठ असं कुणी भेटलं – अधिक सदाचरणी, सोशीक, संयमी, बुद्धिवंत – आणि कोणत्याही प्रसंगी त्याच्याकडून सल्ला घ्यावा, असं वाटलं, तर अनमान न करता ते घ्यावं. पण डोळे मिटून नव्हे; तर विवेक जागता ठेवून. काय करावं, काय करू नये, काय केलं असता ते योग्य ठरेल आणि काय केलं असता अयोग्य ठरेल, अशा द्विधा मन:स्थितीत सापडल्यावर, चांगल्या विचारांचा, सदाचरणी, ज्याचा कुणीही सल्ला घ्यावा, असा बुद्धिवंत माणूस अशा प्रसंगी कसा वागतो, याचा विचार करून त्यानुसार निर्णय घ्यावा. *'एष: आदेश: एष: उपदेश: एषा वेदोपनिषत्...'* हा आदेश ध्यानात ठेवायचा, हा उपदेश मतीत उतरवायचा, वेद-उपनिषदांची ही शिकवण... *'एतत् उपास्यम्...'* या शिकवणुकीनुसार वागायचं.

आताची मुलं डिग्र्या घेऊन युनिव्हर्सिटीबाहेर पडतात, तेव्हा आताचे आचार्य त्यांना कोणता उपदेश करतात काय? विद्यापीठातल्या विद्यार्थ्यांनाच विचारावं लागेल.

। १२८ ।

महाभारतातलं हे एक प्रकरण–

पांडवांचा लौकिक जसजसा वाढत चालला, तसतसा धृतराष्ट्र मत्सराग्नीत होरपळू लागला. त्याला झोप येईना. त्याच्या दरबारी कणिक नावाचा एक विचारवंत होता. धृतराष्ट्रानं त्याला बोलावून घेऊन सांगितलं, ''पांडवांचा उत्कर्ष पाहून माझ्या अंगाची आग-आग होते आहे. काय करावं, कळत नाही. त्यांना आपलं म्हणून त्यांच्याशी मैत्री करावी, की परके लेखून त्यांच्याशी शत्रुत्व करावं? काय योग्य ठरेल, ते सांग.''

कणिक त्याला सांगतो–

''दुर्योधनाचं आणि भीमाचं वैर पाहता दोघांपैकी एकाचा मृत्यू झाल्याशिवाय ते संपणार नाही. अर्जुनाच्या आणि कर्णाच्या वैराचीही तीच बाब. शत्रू तीन प्रकारचे असतात – एक आपल्यापेक्षा दुर्बल, दुसरे तुल्यबळ आणि तिसरे आपल्यापेक्षा बलवान. तिघांशी तीन वेगवेगळ्या प्रकारे वागायला हवं. शत्रू कोणीही असो, केवढाही असो, त्याचा अगदी नायनाट करायलाच हवा. त्यासाठी आपली तलवार त्याच्या शिरावर सतत टांगती असायला हवी. दुर्बल शत्रूला सतत भेडसावत राहावं, तुल्यबळाला आपल्या बळाचा अंदाज येऊ देऊ नये; आणि बलवान शत्रूला आपलं दुबळेपण कधी दिसू देऊ नये.

शत्रूवर ज्या क्षणी हात उगारला, त्या क्षणीच त्याला ठार करायला हवं. त्याला अर्धमेलं करून सोडून देऊ नये. तो दुर्बल म्हणून त्याला कमी लेखू नये. एवढीशी ठिणगी लाकडावर पडली, तरी ती पुरं रान पेटवून त्याची राख करून टाकते. दुर्बल शत्रू काय करील, सांगता येणार नाही. तो आपले पाय धरील, भीक मागेल; पण आपल्यावर केव्हा झडप घालील, हे सांगता येणार नाही. शत्रूच्या कमतरतांचा नेहमी शोध घ्यावा. संधी मिळताच त्या जाहीर कराव्यात. गरज पडली, तर त्याला (शत्रूला) डोक्यावर घ्यावं; पण संधी मिळताच त्याला ठेचावं. शत्रू गयावया करू लागला, तरी त्याला दया दाखवू नये. आपल्या मनात काय आहे, ते त्याला कधीही कळू देऊ नये. कधीही गाफील राहू नये. शत्रू आपला पिता असो, भाऊ असो, पुत्र असो, गुरू असो, शिष्य असो, मित्र असो, कुणीही असो, त्याला शत्रूच लेखून ठार मारावं. त्याचा आपल्याला राग आला असल्याचं कधी दाखवू नये. त्याच्या अपरोक्षदेखील त्याच्याविषयी वाईट बोलू नये. त्याच्याशी सदैव विनम्रपणे वागावं. काळीज मात्र तलवारीच्या धारेसारखं तीक्ष्ण असावं. शत्रूशी जुळवून घेतो, तो अखेर आपला घात करवून घेतो.''

महाभारतातला हा कणिक कोण होता, माहीत नाही. चाणक्यानं आपल्या 'अर्थशास्त्रा'त भारद्वाज नावाच्या एका राजनीतिज्ञाचा उल्लेख केला आहे. तोच कदाचित कणिक असू शकेल.

मॅकियावेली, बिस्मार्क, गॅरिबाल्डी या युरोपातल्या राजनीतिज्ञांनी जी राजनीती विकसित करून सांगितली, ती याच प्रकारची. जगभरात हीच राजनीती चालत आली आहे.

विसाव्या शतकात एक नवाच राजनीतिज्ञ उदयाला आला. त्यानं नव्या प्रकारची राजनीती सुरू केली. त्यानं सांगितलं–

आज ज्याला आपण आपला शत्रू मानतो, तो उद्या आपला मित्रही होऊ शकतो, हे कधी विसरू नये. त्याची उपेक्षा कधी करू नये. त्याच्यातल्या त्रुटी जाणवल्या, तरी त्या कधी जाहीर करू नयेत. तो आपला शत्रू झालेला असला, तरी तो दुष्ट नव्हे, या विश्वासानं त्याच्याकडे पाहावं. त्याला सुधारण्याची संधी कधी दवडू नये. आज तो आपल्यापासून दूर गेला असला, तरी त्याला आपल्या जवळ आणताना हात आखडता घेऊ नये. तो जवळ येताच त्याला हृदयाशी धरताना किंतु बाळगू नये. त्याच्या त्रुटींवर नेहमी पांघरूण घालावं. तो दुर्बल असेल, तर त्याच्यावर लाचार होण्याचा प्रसंग कधी येऊ देऊ नये. त्याची निर्भर्त्सना कधी करू नये. कमरेखाली वार तर कधीच करू नये.

त्याच्या चुकांची त्याला आठवण करून देऊ नये. आपल्याही चुकांची आठवण करून देऊ नये.

जगातली अनार्य कणिकनीती नष्ट व्हावी आणि नवी आर्य राजनीती प्रचलित व्हावी, म्हणून हा माणूस झटला. किती भव्य राजनीती केली त्यानं! सदैव कणिकनीतीनुसार चालणाऱ्या इंग्रजांनादेखील हार खावी लागली त्याच्यापुढे.

। १२९ ।

एक पंचशील बुद्धानं प्रचलित केलं होतं – मी कुणाची हत्या करणार नाही, चोरी करणार नाही, व्यभिचार करणार नाही, खोटेपणा करणार नाही, व्यसनाधीन होणार नाही, या अर्थाचं. चारित्र्यासाठी आवश्यक असं.

अडीच हजार वर्षांनंतर जवाहरलाल नेहरूंनी आणखी एक पंचशील आणलं – देशा-देशांदरम्यान सलोख्याचं. विश्वशांती घडवून आणण्यासाठी आवश्यक असं.

परवा काकासाहेबांची कागदपत्रं चाळत बसलो होतो, तेव्हा आणखी एक पंचशील आढळून आलं – माओचं. चिनी मुलांना राष्ट्रीय चारित्र्याचा धडा घालून देणारं.

१. अवघे विश्व जरी माझे असले, तरी मी जन्माला आलो आहे माझ्या देशात. मी माझ्या देशाचा अभिमान सतत बाळगीन आणि त्याच्या उन्नतीसाठी आपली सारी शक्ती पणाला लावीन.

२. या धरतीवरचे सारे माझे बंधू असले, तरी माझ्या देशातील लोक ही माझ्या घरची माणसे आहेत, असेच मी मानीन आणि आपल्या कुटुंबियांविषयी जसा कोणता आप-परभाव आपण बाळगत नाही, तद्वतच माझ्या देशातल्या लोकांविषयी मी कोणताही आप-परभाव बाळगणार नाही. कुणालाही मी परका समजणार नाही, वेगळा मानणार नाही. तो आपलाच आहे, असे समजून वागीन.

३. मी आपल्या हातांनी काम करून आपले पोट भरीन. केवळ बुद्धिजीवी कामे करून जगणार नाही. बुद्धीची कामे करायची झाली, तरी शारीरिक श्रमांपासून पळणार नाही. माझी कामे मी स्वतःच करीन आणि इतरांना त्यांच्या कामात मदत करीन.

४. देशाची संपत्ती ही आपलीच संपत्ती मानून स्वतःच्या संपत्तीला जसे सांभाळावे, तसा मी देशाच्या संपत्तीचा सांभाळ करीन. तिचे नुकसान होऊ देणार नाही.

५. मी माझ्या आरोग्याची काळजी घेईन. रोगटपणा आणि दुबळेपणाने देशाचा घात होतो, असे मी मानतो. धष्टपुष्ट शरीरच जीवनात हर तऱ्हेचा आनंद घेऊ शकते आणि देशाची सेवाही करू शकते. रोगट आणि दुबळी माणसे समाजाला भाररूप होतात. मी तसा होणार नाही. रोगट असणे, ही शरमेची बाब आहे, असे मी मानीन.

काकासाहेबांनी या चिनी पंचशीलाखाली आपल्या हस्ताक्षरात लिहिलंय – 'आश्चर्य की बात है, पुराने और इन नये सूत्रों में मौलिक अंतर कोई नहीं है ।'

। १३० ।

काळ म्हणे बदलला आहे. पूर्वीसारखा राहिलेला नाहीय.

म्हणजे काय झालंय?

समजा, एका गावात एकानं दुकान घातलं. तो बाहेरून माल आणतो आणि 'भेसळ' करून तो विकतो. या दुकानदाराला आपण लबाड म्हणणार नाही? पन्नास वर्षांपूर्वी अशा दुकानदाराला लोक लबाड म्हणत असत. शंभर, दोनशे, पाचशे वर्षांपूर्वीही असंच म्हणत असत; आजही असंच म्हणतात.

काळ या बाबतीत मुळीच बदललेला नाही.

समजा, गावात एक डॉक्टर आलाय. तो लोकांना बरं करण्याऐवजी त्यांनी पुन्हा पुन्हा आपल्याकडे यावं म्हणून त्यांचे आजार वाढतील, असंच बघत राहतो, त्यांच्याकडून जेवढा म्हणून पैसा ओरबाडता येईल तेवढा ओरबाडत राहतो; तर असल्या डॉक्टरला आपण दुष्ट म्हणणार नाही? शंभर, दोनशे, पाचशे वर्षांपूर्वीही माणसं अशा डॉक्टरला दुष्टच मानत असत; आजही मानतात.

याही बाबतीत काळ बदललेला नाही.

समजा, गावात एक माणूस आहे. त्याला लोकांचं चांगलं बघवत नाही, तो त्यांना त्रास देतो, लुबाडतो. अशा माणसाला आपण जुलमी, लुटारू म्हणायचं नाही? पाचशे-हजार वर्षांपूर्वी लोक अशा माणसाला जुलमी, लुटारू असंच म्हणत; आजही म्हणतात.

हजार-दोन हजार वर्षांत याही बाबतीत काळ बदललेला नाही.

राजकारणासारख्या चारित्र्यहीन क्षेत्रात कुणी चारित्र्यवान पुढारी दृष्टीस पडला, भ्रष्टाचारात बरबटलेल्या प्रशासनात पैशाला हातही न लावणारा असा कुणी स्वच्छ सचिव, नोकरशहा – ब्यूरोक्रॅट – पाहायला मिळाला, तर त्याच्याविषयी आजही आपल्याला आदर वाटतो. दिलेला शब्द पाळणारा, सत्याच्या मार्गानं

चालणारा कुणी भेटला, तर आजही त्याच्यापुढे आपण नतमस्तक होतो. त्यागाची, नि:स्वार्थ सेवेची आजही आपण कदर करतो. आपलं शील विकून पैसा मिळवणारी स्त्री दिसली, तर आजही आपल्याला तिची शिसारी येते. हांजी-हांजी करणारा कुणी लाचार माणूस दृष्टीस पडला, तर आजही आपल्याला त्याच्याविषयी तिरस्कार वाटतो. दारूबाज मुलगा कितीही श्रीमंत असला, तरी आजही लोक त्याला आपली मुलगी द्यायचं टाळतात.

मग काळ बदलला म्हणतात, तो नेमका बदलला तरी कुठे?

खरं सांगायचं, तर बदलायला हव्यात, अशा किती तरी गोष्टी समाजात आजही चालतात. आजही आपण 'प्रसादा'साठी देवळात जातो. आजही आपण कुंडल्या पाहून मुला-मुलींची लग्नं करतो वा मोडतो. आजही आपण मंगळ, शनी, गुरू यांचा आपल्यावरचा प्रभाव वाढवण्यासाठी वा कमी करण्यासाठी तऱ्हेतऱ्हेच्या खड्यांच्या आंगठ्या बोटांत घालतो.

देवाविषयीच्या आपल्या समजुती आजही पाच हजार वर्षांपूर्वी होत्या, तशाच राहिल्या आहेत. आजही आपण धर्माच्या नावानं कित्येक वेडगळ चाली-रीती मोठ्या श्रद्धेनं पाळत असतो. आजही आपण धर्माच्या नावानं एकमेकांशी भांडत असतो.

तरी म्हणे काळ बदललाय!

बदललाही असेल; पण आपण बदललो नाही. आपण दोन हजार वर्षांपूर्वी होतो, तसेच आज राहिलो आहोत – तितकेच अडाणी, तितकेच अंधश्रद्धाळू, तितकेच जुनाट.

नाही म्हणायला एक गोष्ट घडून आली आहे–

पूर्वी आपल्याकडून लबाडी झाली, तर आपल्याला लाज वाटत असे. लोक छी: थू करतील याची भीती वाटत असे. आता, 'सगळेच करतात. त्यात काय?' असं म्हणत आपण लबाडीचं समर्थन करू लागलो आहोत. पूर्वी दारू पिणं वाईट, असं आपण समजत असू. ज्यांना तिचं व्यसन लागलेलं असे, तेही चोरून पीत असत. आता दारू पिणं, ही फॅशन झाली आहे. जो पीत नाही, त्याला 'सोवळा' म्हणून त्याची थट्टा केली जाते. सत्ताधीशांपुढे लाचारी पत्करून याचना करण्यानं पूर्वी घराण्याची अब्रू जात असे, नाक कापलं जात असे. आता कामं होतात म्हटल्यावर आपण कोणत्याही थरावर उतरायला तयार असतो.

पूर्वी आपण नीती, धर्म अशा गोष्टी मानत असू, पाळत असू. आता या बाबतीत आपण सैल सुटलो आहोत. असल्या गोष्टी आता चालणार नाहीत;

म्हणून आपण त्या सोडून दिल्या आहेत.

कुणी कुणाला फसवू नये, असं आपण म्हणतो. पण थोडासा जरी फायदा होणार असल्याचं दिसलं, की आज आपण दुसऱ्याला फसवायला एका पायावर तयार असतो. लाच घेणं बरोबर नाही, असं आपण म्हणतो; पण लाच घेतल्याशिवाय कामं करायची म्हटली, तर आपण काचकूच करतो. हा 'वर्ल्ड फिनॉमिनॉन' असं म्हणून आज लाचखोरीचं समर्थन स्वतः सरकारही करू लागलंय.

आज देशात चारित्र्याला किंमत नाही, विद्वत्तेला नाही, त्यागाला नाही, तपश्चर्येला नाही, ते 'काळ बदलला' म्हणून नव्हे; तर आपली अधोगती झाली, म्हणूनच ना? आपल्या अधोगतीची जबाबदारी काळावर ढकलून आपल्याला साळसूदपणे मिरवता येणार नाही.

काळ बदलतोच. बदलणं हा काळाचा धर्मच. पण या बदललेल्या काळाच्या कसोटीवर उतरता येईल, अशा प्रकारे आपल्या जीवनाच्या मूल्यांत आपल्याला बदल करायला हवा. त्या मूल्यांची उपासनाही आपल्याकडून व्हायला हवी. आपल्यामध्ये आणि भोवताली जे जे सडकं, नासकं आढळेल, ते ते निपटून काढायचा धीर आपल्याला झाला पाहिजे.

काळाच्या बदलाची दिशा ठरलेली असते. एक तर तो आपल्याला 'पुढे' नेतो, आपली उन्नती घडवून आणतो किंवा मग आपली पुढे जाण्याची, प्रगती करण्याची तयारी नसेल, तर तो आपल्याला खाली ओढतो. एक तर तो आपल्याला प्रकृतीतून 'संस्कृती'कडे नेतो; किंवा आपल्याला 'विकृती'कडे नेऊन अगदी विकृत करून सोडतो. काळाला तिसरी गती नसते.

काळ बदललाय, पण...

आपण मात्र उन्नतीऐवजी गर्तेत पडलो आहोत, विकृत झालो आहोत, नासून गेलो आहोत.

। १३१ ।

काकासाहेब जितके गांधींजींचे, तितकेच रवींद्रनाथांचे भक्त. खरं सांगायचं, तर दोघांचे आदर्श वेगळे, दोघांच्या अभिरुची वेगळ्या. असं असतानाही काकासाहेबांना दोघांमधलं साम्य दिसत असे.

गुरुदयाल मल्लिकही काकासाहेबांप्रमाणेच दोघांचेही भक्त. गांधी हा सत्यातून सौंदर्याकडे निघालेला एक कवी; तर रवींद्रनाथ हा सौंदर्यातून सत्याकडे निघालेला

एक संत होय. दोघांची वाटेत 'शिवा'पाशी भेट होते, असं काहीसं ते म्हणायचे. इथेच त्या दोघांमधलं साम्य दिसून यायचं.

आचार्य भागवतही या दोघांचे भक्त. त्यांना या दोघांतलं साम्य दिसायचं, ते पूर्व आणि पश्चिमेचा समन्वय साधणाऱ्या त्यांच्या देशभक्तीत; आंधळा अभिमान न बाळगणाऱ्या त्यांच्या भारत-भक्तीत.

यांच्यामुळे मीही गांधी आणि रवींद्रनाथांमध्ये साम्य पाहायला शिकलो. युरोपियन संस्कृतीपुढे झुकायचं नाही, तिची पूजा करायची नाही, हा माझ्यातला संस्कार या दोघांनीच दृढ केला आहे.

स्वातंत्र्याचा अर्थ या दोघांना नीट कळला होता, असं मी मानू लागलो आहे.

असं असतानाही मन कधी-कधी दोघांची तुलना करू लागतं, तेव्हा गांधी मला रवींद्रनाथांपेक्षा तेजस्वी दिसू लागतात. स्वातंत्र्याच्या चळवळीत रवींद्रनाथांना किती का कडू अनुभव आले असेनात; पण गांधींच्या हाती स्वातंत्र्याची चळचळ गेल्यानंतर तरी त्यांनी चळवळीत पडायला हवं होतं; तुरुंगवास भोगायला हवा होता.

रवींद्रनाथांच्या शिरपेचात मला एकाच तुऱ्याची कमतरता भासते – तुरुंगवासाची.

। १३२ ।

आपण मोठं व्हावं, असं सर्वांनाच वाटतं. वाटायलाच हवं. वयात आलेल्या मुलांना तर जास्तच. ज्याला मोठं व्हायची इच्छा नाही, तो कधी मोठा होऊ शकत नाही. आत्मसंतुष्ट वा अल्पसंतुष्ट माणूस कधीच मोठा होत नाही. तो काहीच होत नाही. आणि माणूस आपसूक तर कधीच मोठा होत नसतो. मोठं होण्याची इच्छा प्रत्येकात असायला हवी आणि प्रत्येकानं मोठं व्हायचा प्रयत्न करायला हवी. ज्याला अशी इच्छा आहे, त्याला दोष देत राहणं बरोबर नाही. पण मोठं व्हायचं म्हणजे कुणापेक्षा मोठं व्हायचं?

बहुतेकांना दुसऱ्यापेक्षा मोठं व्हायचं असतं आणि इथेच ते आपटतात. माणूस जेव्हा दुसऱ्याशी आपली तुलना करून त्याच्यापेक्षा आपण मोठं व्हायचं, असं ठरवून वागू लागतो, तेव्हा त्याच्यात दुस्वास, मत्सर यांसारखे काही अवगुण वाढीस लागतात. मग ज्याच्याशी तो आपली तुलना करतो, त्याला खाली ओढायचा प्रयत्न तो करू लागतो. वेळी-अवेळी, गरज नसताना तो त्याच्या चुका काढतो आणि भेटेल, त्याच्याकडे त्याची निंदा करतो. निंदा

केल्याशिवाय त्याला चैनच पडत नाही.

साहित्यकार, संगीतकार, कलाकारांमध्ये असे खूप लोक आढळतील. विलक्षण प्रतिभावंत; पण माणूस म्हणून mean, petty minded वा क्षुद्र, नीच. कधी दुसऱ्याचं मोठेपण मान्य करणार नाहीत. 'They suffer by comparison.'

म्हणून सगळ्यात पहिला नियम केला पाहिजे तो हा, की – 'मी दुसऱ्याशी कधी स्वत:ची तुलना करणार नाही.' माणसानं तुलना करायची, ती खरी स्वत:ची स्वत:शीच. मी काल जो होतो, त्याहून आज मोठा झालो आहे की नाही? की तेवढाच राहिला आहे? हे सतत पाहत राहायला हवं. आपण आतून वाढतो आहोत की नाही, याचा शोध घेत राहायला हवं आणि काल होतो, त्यापेक्षा मोठं होण्याचा प्रयत्न करायला हवा.

हीच अंतर्मनातली यात्रा – 'journey within' – जगात जे कुणी खऱ्या अर्थानं मोठे झाले, ते या मार्गानं गेले आहेत.

। १३३ ।

काही जण आपलं मोठेपण दुसऱ्यांवर ठसवण्यासाठी डिग्र्या-पदव्या मिळवायचा प्रयत्न करतात आणि त्या मिळाल्या, म्हणजे आपण मोठे झालो, असं समजतात. आजचं जग हे स्पर्धेचं जग आहे. या जगात डिग्र्या-पदव्यांना किंमतच नाही, असं कसं म्हणता येईल? डिग्र्या-पदव्या म्हणजे एक पासपोर्ट आहे. नोकऱ्या-चाकऱ्यांच्या त्या त्या देशात जाण्यासाठी. बी. ए. झालेल्या माणसापेक्षा एम. ए. झालेल्याला चार पैसे अधिक मिळतात. डिग्र्या-पदव्यांचं मोल ते हे. एवढाच त्यांचा उपयोग. तेवढ्यासाठीच त्या घ्यायच्या.

पण ज्यांना नोकरी-चाकरी करायची नसते, असे काही लोकही 'पद्मश्री', 'पद्मभूषण'सारख्या डिग्र्या-पदव्या मिळवायला धडपडत असतात. त्यांच्या लटपटी-खटपटी पाहिल्या की वाटतं, हे लोक मुदलात ॲल्युमिनियम-निकेलसारख्या धातूंचे असले पाहिजेत. टाकसाळीत जाऊन स्वत:वर पाच पैसे, दहा पैसे, पन्नास पैसे असा ठसा मारून घेतल्याशिवाय समाज आपल्याला मानणार नाही, याची त्यांना खात्री असावी. म्हणूनच ते डिग्र्या-पदव्या मिळवण्यासाठी लटपटी-खटपटी करत असावेत. सोन्याला स्वत:वर असा ठसा मारून घेण्याची कधी गरज भासत नाही. खरं मोठेपण ते सोन्याचं. ते माणसात मुदलातूनच असायला हवं. ज्याच्यात ते असतं, तो 'स्वनामधन्य' होय. पदव्यांनी तो मोठा होत नाही; आणि त्या नसल्या, तरी तो छोटा ठरत नाही.

लोहिया, जयप्रकाशसारख्यांना कुणी कसल्या पदव्या दिल्या होत्या? एक लक्षात ठेवावं, जो मुदलात 'ग्रेट' असतो, तोच 'ग्रेटर' वा 'ग्रेटेस्ट' होऊ शकतो. जो मुदलातच 'स्मॉल' असतो, तो किती का पदव्या घेईना, 'ग्रेट' कधीच होऊ शकत नाही. तो 'स्मॉलर' आणि 'स्मॉलेस्ट'च होत जातो.

## । १३४ ।

काही जणांचा समज असतो की, ज्याचं नाव वर्तमानपत्रांत गाजतं, तोच मोठा. जो 'प्रसिद्ध', तोच 'प्रतिष्ठित'. त्या बिचाऱ्यांना कळत नाही, प्रसिद्धी वेगळी आणि प्रतिष्ठा वेगळी. हल्ली प्रसिद्धी कुणालाही मिळते. थोडं नाव मिळवलं, की मिळते. तोडफोड केली, की जास्त प्रसिद्धी मिळते. जनता पक्षाच्या राजवटीत राजनारायण यांना थोडी का प्रसिद्धी मिळाली होती? पण प्रतिष्ठा मिळाली का?

प्रतिष्ठा अशी सपासप कुणाला मिळत नसते. प्रतिष्ठा मिळवायला तपश्चर्येच्या आगीतून तावून-सुलाखून निघावं लागतं; चारित्र्याच्या कसोटीवर उतरावं लागतं. प्रतिष्ठा प्राप्त करायला वर्षानुवर्षं लागतात. पण एकदा ती मिळाली, की कधी जात नाही. ती सदैव टिकून राहते. इतकंच नव्हे; तर तपस्येबरोबर ती दिवसेंदिवस वाढतच जाते.

प्रसिद्धी पटकन मिळते आणि चटकन नाहीशी होते.

प्रतिष्ठा मिळवलेला माणूस कधी लपून राहिलाय का?

प्रतिष्ठा ही आपल्या मोठेपणाला समाजाची मिळालेली मान्यताच! समाजाला मोठा माणूस ओळखता येत नाही म्हणतात; पण ते खरं नाही. तो सर्वांना नीट ओळखतो. सगळ्यांची योग्य ती किंमत तो करतो. तुम्ही तुमचं मोठेपण त्याच्यावर लादू पाहाल; म्हणून तो ते मान्य करील, असं नाही. 'He will cut you to your size.' तुम्ही स्वतःला भले फसवाल; पण समाजाला फसवू शकणार नाही. तो जेव्हा कुणालाही मान्यता देतो, तेव्हा प्रथम त्याची कसून परीक्षा घेतो; आणि त्यानंतरच त्याला मान्यता देतो. मान्यता दिल्यानंतर तो त्याची दिवस-रात्र स्तुती करत बसतो, असंही नाही. तोंडून कधी शब्दही काढीत नाही. पण जो परीक्षेत उतरला, त्याचं मोठेपण तो मूकपणे मान्य करतो. माणसाचं मोठेपण समाजाला 'जाणवायला' हवं, तरच तो मोठा.

तुम्हाला ओळखणाऱ्यांनाच नव्हे; तुमच्या मित्रांनाच नव्हे; तर तुमचा द्वेष, मत्सर करणाऱ्यांनादेखील तुमचं मोठेपण जाणवायला हवं. इतकंच नव्हे; तर

तोंडून एक शब्ददेखील न काढता त्यांनी मनातल्या मनात तुमचा हेवा करायला हवा, तरच तुम्ही मोठे.

। १३५ ।

"वज्जींचा मी अगदी नायनाट करीन... त्यांना भिकेला लावीन..." म्हणून अजातशत्रू मधून-मधून उसळून बोलायला लागला होता.

तो वज्जींवर खूप भडकला होता.

का? काही म्हणतात, वज्जींकडे एक हत्ती होता. त्याला तो हवा होता. वज्जींनी त्याला तो दिला नाही; म्हणून तो चिडला होता. कुणी म्हणतात, त्यानं तो हत्ती वज्जींकडे मागितला. त्याला तो आपल्या पट्टराणीला द्यायचा होता. वज्जींना त्याला तो दिला नाही, म्हणून तो रागावला.

खरं कारण वेगळंच होतं. वज्जींचं राज्य मगध देशाला लागून होतं आणि ते मगध देशाच्या मर्जीनुसार नव्हे; तर आपल्याला हवं, त्या पद्धतीनं, आपल्या स्वतंत्र बुद्धीनं चालत होतं. अजातशत्रूचं खरं दुखणं हेच होतं.

त्या काळचं राज्यशास्त्रही म्हणत असे की, शेजारच्या राज्याला कधीही मित्र राज्य मानू नये. त्याला नेहमी शत्रू म्हणूनच लेखावं. ते तुम्हाला अनुकूल राहिलं नाही, तर संधी मिळताच त्याला खिळखिळं करून आपल्या राज्याला जोडावं. राज्यशास्त्राच्या याच नियमानुसार अजातशत्रू, 'वज्जींचा मी नायनाट करीन, त्यांना भिकेला लावीन', वगैरे म्हणू लागला होता. वज्जींचा विनाश करण्यासाठी तो निमित्तच शोधत होता. हत्ती वा रत्नहार ही केवळ निमित्तं होती, असंच म्हणायला हवं.

मगध देशानं यापूर्वी भोवतालची किती तरी छोटी-छोटी राज्यं या ना त्या निमित्तानं काबीज करून आपल्या राज्याला जोडली होती. वज्जींचंच एक राज्य जोडायचं राहिलं होतं. ते का राहिलं? तर वज्जींची एकजूट होती, आपल्या 'संस्थागारा'त ते एकत्र बसून एकमतानं निर्णय घेत, एकमेकांना सांभाळून घेत, एकमेकांच्या साहाय्यानं राज्य चालवत, म्हणून! आजच्या भाषेत सांगायचं, तर वज्जींच्या राज्यात एक प्रकारची लोकशाही होती आणि लोक या लोकशाहीच्या वातावरणात मोकळेपणानं जगत होते. राज्य लहान असलं, तरी ते जिंकणं सोपं नव्हतं. ते आतून मजबूत होतं.

आपल्या एकछत्री राज्याशेजारी एक लोकतांत्रिक राज्य चालू देणं आपल्याला महाग पडेल, असं अजातशत्रूला वाटू लागलं होतं; म्हणून तो 'वज्जींचं राज्य

धुळीला मिळवीन', 'त्यांचा विनाश करीन' असं बोलू लागला होता.

कुणी तरी त्याला म्हटलं, "एवढं मोठं पाऊल उचलण्यापूर्वी बुद्धाला विचारलेलं बरं. सध्या तो आपल्याच राज्यात भ्रमण करतो आहे. तो राजगृहात येऊन राहिला आहे."

अजातशत्रूनं वस्सकार नावाच्या आपल्या एका अमात्याला बुद्धाकडे रवाना केलं. वस्सकारानं बुद्धाला अजातशत्रूचा बेत सांगितला.

बुद्धासोबत त्या वेळी त्याचा शिष्य आनंद होता. तो बुद्धाला वारा घालत होता. बुद्धानं वस्सकाराला उत्तर देण्याऐवजी आनंदला काही प्रश्न विचारले.

"आनंद, वज्जी लोक एकजुटीनं राज्य करतात ना?"

"हो," आनंद उत्तरला, "सगळी कामं ते एकमेकांच्या आधारानं, एकत्र येऊन, एकजूट होऊन, एकमतानं करतात."

"बरं! ते एकमतानं निर्णय घेतात ना?"

"हो... ते एकत्र येऊन एकमतानं निर्णय घेतात."

"आता एक सांग, कायद्याला धरून ते चालतात ना? त्यांनी जे नियम बनवले आहेत, त्यांचं पालन ते नीट करतात ना? नियम मोडत तर नाहीत?"

"नाही." आनंद म्हणाला, "कोणताच नियम ते मोडत नाहीत. कायद्याला धरूनच सगळा कारभार ते चालवतात."

"वडीलधाऱ्यांना जो मान द्यायला हवा, तो ते देतात ना? त्यांचा सल्ला घेतात ना?"

"वडीलधाऱ्यांना विचारूनच ते सगळे निर्णय घेतात."

"तिथे मुली-बाळींवर, स्त्रियांवर अत्याचार तर होत नाहीत ना?"

"नाही. वज्जींच्या राज्यात कुठल्याही स्त्रीकडे कुणीही वाकड्या नजरेनं पाहत नाही."

"बरं, आता सांग, वज्जींच्या राज्यात देवळं-बिवळं असतील... वेगवेगळी धर्ममतं मानणारे लोक असतील... कुणालाही कसलाही त्रास होत नाही ना? सर्वांना आपापल्या धर्मानुसार आचरण करण्याची मुभा ते देतात ना?"

"होय. ते सर्व धर्मांचा आदर करतात."

"बरं, आता शेवटचा प्रश्न : वज्जी राज्यात बाहेरून लोक येतात... त्यांना त्रास होऊ नये म्हणून वज्जी लोक काळजी घेतात ना?"

"होय. कुणालाही ते त्रास होऊ देत नाहीत... सगळ्यांचा चांगला पाहुणचार करतात."

आनंदची उत्तरं ऐकल्यावर बुद्ध अजातशत्रूच्या अमात्याला म्हणाला, "जोपर्यंत

या सात नियमांनुसार वज्जी लोक चालताहेत, तोपर्यंत कुणी त्यांचं काहीही वाकडं करू शकणार नाही.''

वस्सकार समजायचं ते समजला. जोपर्यंत वज्जींची एकजूट असेल, तोपर्यंत त्यांना जिंकता येणार नाही, हे त्याला चांगलं समजलं. त्यानं त्यांची एकजूट मोडायचे प्रयत्न सुरू केले. त्यांच्यात फूट पाडली आणि एक दिवस त्यांच्यावर हल्ला करून त्यांना जिंकून घेतलं.

राज्यच नव्हे; तर कोणतीही संस्था, कोणतीही चळवळ, कोणताही राजकीय पक्ष जोपर्यंत एकमतानं, एकमेकांना सांभाळून घेत, एकमेकांच्या साहाय्यानं चालतो, तोपर्यंत त्याला कोणतीही भीती नसते. ज्या दिवशी त्याच्यात कलह सुरू होतात, साथीदार एकमेकांचे पाय ओढू लागतात, त्या दिवशी त्याची अधोगती सुरू होते आणि त्याचे शत्रू एक दिवस त्याचा पाडाव करतात.

घराण्यांनादेखील हाच नियम लागू होतो.

किती तरी घराणी आंतरिक कलहापायी लयाला गेली आहेत.

संस्कृत भाषेत एक श्लोक आहे–

*'सर्वे महत्त्वं इच्छन्ति कुलं तत् अवसीदति । सर्वे यत्र विनेतारः राष्ट्रम् तत् नाशम् आप्नुयात ।'* – ज्या घराण्यातली माणसं आपापलं महत्त्व वाढवण्यासाठी एकमेकांचे पाय ओढू लागतात, त्या घराण्याला अवकळा येते, त्या घराण्याचा नाश होतो आणि ते लयाला जातं. त्याचप्रमाणे, ज्या संस्थेतले, चळवळीतले, राज्यातले नेते 'मीच खरा नेता' असं म्हणून एकमेकांचे पाय ओढू लागतात, त्या वेळी समजावं, ती संस्था, ती चळवळ, ते राज्य विनाशाच्या मार्गाला लागलं. आता कोणत्याही क्षणी ते लोप पावणार.

। १३६ ।

विवेकानंदांनी म्हटलंय–

या देशातील चोर आणि वाटमारेदेखील आपापल्या 'धर्मा'नुसार आचरण करतात. धर्म नाही, असा या देशात कुणी नाही. इतका हा देश धर्मग्रस्त आहे.

एकदा एक व्यापारी गाडी भरून माल घेऊन येत होता. वाटेत वाटमाऱ्यांनी त्याला गाठलं. त्याचा सगळा माल त्यांनी लुटला. मग वाटमाऱ्यांचा सरदार तलवार घेऊन व्यापाऱ्याला मारायला पुढे सरसावला.

व्यापारी त्याच्या पाया पडून म्हणू लागला, ''सगळा माल तुम्ही घेऊन जा; पण कृपा करून मला मारू नका. मला बायको-मुलं आहेत. मी मेलो, तर त्यांना

पाहणारं कुणी नाही... तुम्ही माझा माल लुटल्याचं मी कुणाला सांगणार नाही. केसही करणार नाही. खुशाल माल न्या; पण मला सोडा.''

त्यावर सरदार म्हणाला, ''आम्ही तुझा माल लुटून तुला जिवंत सोडलं, तर आम्ही चोरी केल्यासारखं होईल. आम्ही चोर नव्हे. बरं, तू दिलेलं आम्ही घेतलं, तर ते दान घेतल्यासारखं होईल. दान घ्यायला आम्ही काही ब्राह्मण नाही. आम्ही वाटमारे आहोत. तुला ठार मारूनच आम्ही तुझा माल लुटणार. तुला सोडायचं म्हटलं, तर तुझ्या मालासकट सोडून देऊ... शरण आलेल्याला सोडून देणं आमच्या धर्मात बसतं. तू तुझा माल घेऊन आरामात घरी जा.''

जिथे वाटमाऱ्यांनीदेखील आपल्याला एक 'धर्म' आहे, असं मानलं, तिथे बाकीच्यांनी मानलं, तर त्यात नवल ते काय? धर्माविषयीचं एवढं *'ऑब्सेशन'* जगाच्या पाठीवर इतर कोणत्याच देशात पाहायला मिळणार नाही.

या देशात ऐतिहासिक काळात किती तरी वंशांचे, धर्मांचे; आणि किती तरी चाली-रीती, किती तरी परंपरा पाळणारे लोक सतत येत राहिले. सर्वांना – कुणाचाही कुणाला त्रास होऊ नये, अशा प्रकारे – एकत्र बांधून ठेवण्यासाठी आपल्या पूर्वजांनी धर्माचा आधार घेतला. जो प्रजेला धारण करतो, तिला एकत्र ठेवतो, तो धर्म, अशी धर्माची व्याख्या केली – *धर्मोऽ धारयते प्रजा* – आणि या देशाच्या आगळ्या-वेगळ्या संस्कृतीचा पाया घातला.

आर्य संस्कृती, द्रविड संस्कृती, निषाद संस्कृती आणि किरात संस्कृती या चार मुख्य संस्कृती या देशात एकमेकींच्या उभ्या-आडव्या धाग्यांनी विणल्या जाऊन एकमेकींच्या संगतीनं नांदल्या आहेत. त्यांनीच आपला 'लोकधर्म' जन्माला घातला आहे. या लोकधर्माचाच प्रभाव सर्वांवर पडत राहिला आहे.

बाहेरून आलेल्या इस्लामी आणि ख्रिस्ती या संस्कृतीदेखील या लोकधर्माच्या रंगात रंगून गेल्या. या लोकधर्माच्या प्रेरणांचा शोध घेतल्याशिवाय कोणताच प्रश्न आपल्याला सोडवता येणार नाही.

सुमारे तीन तपांच्या निरीक्षण-चिंतन-मनन आणि अध्ययनानंतर मी एका महत्त्वाच्या निर्णयाप्रत पोहोचलो आहे. या देशात सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक, शैक्षणिक प्रश्न नाहीत. आहे तो एकच प्रश्न : धार्मिक. कोणताही सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक प्रश्न घ्या, खोलात जाऊन पाहिलं की मुळात तो धार्मिक असल्याचीच जाणीव होईल. प्रश्नाचं धार्मिक मूळ शोधून त्याच्यावर धार्मिक उपाय केल्यावरच तो सुटेल; नाही तर नाहीच सुटणार, गुंततच जाईल.

युरोपातल्या विचारवंतांनी तिथे एक वैचारिक मंथन घडवून आणलं

आणि धार्मिक आणि ऐहिक (ज्यात राजकीय, सामाजिक इत्यादी सगळे प्रश्न येतात.), असे जीवनाचे दोन भाग केले. आपण? असलं वैचारिक मंथन कधीच घडवून आणलं नाही. फक्त युरोपियनांची दृष्टी जशीच्या तशी घेतली. युरोपियनांचा चष्मा डोळ्यांवर चढवला आणि आपल्या प्रश्नांकडे युरोपियन चष्म्यातून पाहू लागलो.

एकही प्रश्न आपण सोडवू शकलो नाही.

धर्म-बिर्म सगळं 'थोतांड', असं म्हणून आपण या महत्त्वाच्या क्षेत्रात एक 'व्हॅक्यूम' निर्माण केली. ती पोकळी आता पुराणमतवादी, दकियानूसी, फंडामेंटालिस्ट भरून काढू लागले आहेत.

आणि सगळ्यांची झोप उडू लागली आहे.

गेल्या शतकात या देशात दोनच राष्ट्रपुरुष ही गोष्ट नीट ओळखू शकले – एक विवेकानंद आणि दुसरे गांधी. एक लक्षात ठेवलं पाहिजे की, दोघंही 'सनातनी हिन्दू' होते. सनातनी हिंदू असल्यामुळेच सुधारकांच्या सुधारणा ते प्रत्यक्ष सुधारकांपेक्षा अधिक प्रभावीपणे स्वतःच्या आचरणात उतरवू शकले. दोघांनी कोणत्या प्रश्नावर कोणता उपाय शोधून काढला, ते बारकाईनं पाहायला हवं, तेव्हाच आपण तथाकथित 'सेक्युलरिस्ट', सुधारक, प्रोग्रेसिव्ह लोक कुठे चुकतो, ते कळून येईल.

। १३७ ।

बाकीबाबांना – कविवर्य बा. भ. बोरकरांना – साठ वर्षं पूर्ण व्हायची होती. त्या निमित्तानं त्यांचा सत्कार करावा, असं त्यांच्या काही इष्ट-मित्रांना वाटलं आणि त्यांनी एक सत्कार समिती स्थापन केली. या सत्कार समितीनं इतर काही कार्यक्रमांबरोबरच बाकीबाबांना एक 'गौरव-ग्रंथ' अर्पण करायचा, असं ठरवलं.

मी बाकीबाबांकडे बरेचदा जात असे. एक दिवस नेहमीप्रमाणे गेलो असताना त्यांनी मला या गौरव-ग्रंथाविषयी सांगितलं आणि ते मला म्हणाले, "तुला समितीचं पत्र येईल... तू एक लेख लिहिशील ना?"

मी 'लिहीन' म्हटलं आणि गौरव-ग्रंथाविषयीचं माझं मतही सांगून टाकलं. म्हटलं, "आपण सगळे मुदलातच दांभिक लोक. लिहायचं म्हणून लिहिणारे. पण जे लिहू, ते खरं असेलच, असं नाही. 'गौरव-ग्रंथा'पेक्षा 'अध्ययन-ग्रंथ' केलेला बरा! तुमच्या काव्याचा अभ्यास अनेकांनी केलेला आहे. त्यांना लिहायला सांगायचं आणि ते या ग्रंथात संकलित करायचं. तुमच्या कवितेचा खोलात

जाऊन अभ्यास करू इच्छिणाऱ्यांसाठी तो उपयुक्त ठरेल. अध्ययन-ग्रंथात दांभिकपणाला स्थान नसतं...''

''खरंय तुझं... मी तुझं मत समितीला कळवतो.'' ते म्हणाले. कुठे माशी शिंकली कुणास ठाऊक; पण गौरव-ग्रंथही आला नाही आणि अध्ययन-ग्रंथही आला नाही.

'मांडवी' नियतकालिकाचा एक अंक प्रकाशित झाला. त्यात दोन्ही प्रकारचे लेख होते.

अध्ययन-ग्रंथाची सूचना केल्यानंतर मी म्हटलं, ''बाकीबाब, नेहमीप्रमाणे स्पष्ट अन् मोकळेपणानं विचारतो. तुमचे इष्ट-मित्र तुमचा सत्कार करू पाहताहेत, हे चांगलंच आहे. त्यांनी तो करायलाच हवा. तुम्हीही त्यांना तो नको न म्हणता करू द्यायचा... यापलीकडे तुम्ही काही बोलू नये... तुम्ही सत्काराच्या कार्यक्रमात फारच लक्ष घालता आहात... असं व्हायला हवं, तसं व्हायला हवं, म्हणून सुचवता आहात... मला हे विचित्र वाटतं... 'below dignity' वाटतं...''

''हा विचार माझ्या मनात आलाच नाही, असं तुला वाटतं का?'' त्यांनी मला विचारलं आणि म्हटलं, ''वीस वर्षांपूर्वी... मी चाळीस वर्षांचा असताना हे झालं असतं, तर ते 'below dignity' ठरलं असतं. का? तर त्या वेळी समाजाकडून जो बहुमान मला मिळायला हवा होता, तो मिळाला नव्हता... मला हवा होता, तेवढा तरी मिळाला नव्हता. पण आज तसं म्हणता येणार नाही. समाजाकडून मला जे मिळायला हवं होतं, ते सारं या वीस वर्षांत मिळालंय. जास्तच मिळालंय, असं म्हणता येईल. तसा मी एक तृप्त माणूस आहे... यापुढे मला कुणीच काहीच दिलं नाही, तरी मला जे मिळालंय, त्यातलं काहीही कमी होणार नाहीय आणि आणखी चार स्तुती-गीतं कानांवर पडली, म्हणून त्यात भरही पडणार नाहीय... मी कोण, काय आहे, हे मला चांगलं माहीत आहे आणि माझ्यात कुठे काय कमी पडतंय, तेही मी चांगलं ओळखून आहे. पण एक गोष्ट सांगू इच्छितो, मी सत्ताधीश नाही, लक्षाधीश नाही, आज समाज ज्याला सारखा डोक्यावर घेतो, असा कुणी मी नाही. मी एक साधा, अगदी किरकोळ माणूस. पण मी एक कवी आहे... आणि मला या गोष्टीचा मोठा अभिमान आहे. कवीला मी स्मृतिकारांपेक्षाही मोठा मानतो. सत्ताधीश येतील आणि जातील; पण कवी राहील. कवीचा बहुमान केला पाहिजे, हे समाजाला कुणी तरी शिकवायला हवं... माझ्यापेक्षा मोठे कवी भविष्यात येणार आहेत. समाजानं त्यांची, 'ह्यः, कवी!' अशी उपेक्षा करता कामा नये... त्यांचा मान राखला जावा. हा विचार करूनच मी माझ्या सत्कारात लक्ष घालायला लागलो.

मला माझं हे कर्तव्य वाटतं. इतकंच नव्हे; तर या सत्कारात कुठे काही कमी पडू नये, म्हणून मी काळजीही घेऊ लागलो... तुला आणखी एक गोष्ट सांगतो – तुझ्याप्रमाणेच स्पष्ट अन् मोकळेपणानं – मला साठ वर्षं पुरी होऊ लागली आहेत, हे माझ्या इष्ट-मित्रांना ठाऊक नसतं, तर मीच त्यांना त्याची आठवण करून दिली असती. माझ्यानंतर जे कवी येणार आहेत, त्यांचा सन्मान मला राखता आला पाहिजे...''

मला आणखी एक आठवण येते.

मी आणि मनोहरराय मिळून त्यांना एकदा भेटायला गेलो होतो. दोन-तीन दिवसांपूर्वीच कुणी तरी मनोहररायांची 'फ्रेंच भाषेचे प्रोफेसर' म्हणून कुठे तरी ओळख करून दिली होती. सॉर्बोनला सहा वर्षं राहून आल्याचं सांगितलं होतं. ''ऐक मनोहर, तुला एक सांगायचंय,'' बाकीबाब त्यांना म्हणाले, ''तू फ्रेंचचा प्रोफेसर असशील... आणखीही कोणी असशील... लौकिकदृष्ट्या आहेस, त्याहूनही मोठा असशील... पण तू एक कवी आहेस, हे विसरू नकोस हां... स्वत:ची ओळख करून देताना 'मी कवी मनोहरराय' अशी अभिमानानं करून देत जा. कळलं? या प्रोफेसरां-बिफेसरांपेक्षा कवी खूप मोठा असतो... तुला तुझ्यातल्या कवीचा मान राखता यायला हवा.''

बाकीबाबांची खूप आठवण येते मधून-मधून मला.

। १३८ ।

आपल्यातले अवगुण दृष्टीस पडताच माणसानं ते सुधारायचा प्रयत्न केला पाहिजे. खरं तर ते सुधारायची गरजच भासायला नको. ते दृष्टीस पडल्यावर आपसूक गळून पडायला हवेत. पण त्यासाठी आधी ते 'दृष्टीस पडायला' हवेत.

। १३९ ।

आपण जन्माला येतो, लहानाचे मोठे होतो, शिकतो, व्यापार-उदीम वा नोकरी करतो. लग्न होतं. मुलं जन्माला घालतो. त्यांना लहानाचं मोठं करतो. त्यांना व्यापार-उद्योगाला वा नोकरीला लावतो आणि एक दिवस मरून जातो. याला जगणं म्हणायचं का? असलं जीवन तर इतर प्राणिमात्रही जगत असतात. माणसाच्या जीवनाचा उद्देश या प्राणिमात्रांप्रमाणे एवढाच असू नये.

आजचा कावळा आणि पाच हजार वर्षांपूर्वीचा कावळा, यांत काही फरक नसतो. पाच हजार वर्षांपूर्वीच्या आणि आजच्या कोल्ह्यात, वाघात, हत्तीत, सिंहात काही फरक नाही. आजच्या सर्पाप्रमाणेच पाच हजार वर्षांपूर्वीचा सर्प उंदराला गिळत होता आणि आजच्या मुंगुसाप्रमाणेच पाच हजार वर्षांपूर्वीचा मुंगूस सापाला गिळत होता. पशु-पक्षी, जीव-जिवाणू, मुंग्या यांच्यात पाच हजार वर्षांत कसलाच फरक पडलेला नाही. या जीवांना इतिहास नाही. त्यांनी आपली संस्कृती घडवली नाही. माणसाला इतिहास आहे; संस्कृती आहे. आजचा माणूस आणि पाच हजार वर्षांपूर्वीचा माणूस एकच नव्हे. तेच कशाला, शंभर वर्षांपूर्वीचा माणूस आणि आजचा माणूसही सारखा नव्हे. त्यांच्यात जमीन-अस्मानाचा फरक पडला आहे. माणूस विचार करतो. भल्या-बुऱ्यातला फरक त्याला कळतो. त्याच्यातल्या या विचार करण्याच्या गुणामुळेच तो निसर्गातल्या इतर प्राण्यांहून वेगळा झाला आहे. तो प्राकृत अवस्थेत राहिलेला नाही. तो सु-संस्कृत झाला आहे किंवा विकृत झाला आहे, ते एकदा मान्य केलं, हे की जगायचं कसं आणि कशासाठी, हे आपल्याला सहज कळेल. संस्कृतीच्या वारशाचं जे रोप पूर्वजांनी आम्हाला लावून दिलं, त्याला पाणी घालून, त्याची नीट मशागत करून त्याला वाढवण्यासाठी; आणि त्याच्या वाढीत अडथळे आणू पाहणाऱ्यांना हाकलून दूर करण्यासाठी जगायचं असतं, हे कळेल.

माणसानं अशा प्रकारे जगावं, की मरताना त्याला म्हणता आलं पाहिजे–

मी जन्माला आलो, त्या वेळी माझा समाज संस्कृतीच्या ज्या पायरीवर उभा होता, त्याहून आज तो बऱ्याच वरच्या पायरीवर पोहोचला आहे आणि त्याच्या या आरोहणात माझाही थोडा-फार हातभार लागला आहे.

मरताना ज्याच्या तोंडून असे संतोषाचे शब्द बाहेर पडतील, तोच जन्माला येऊन खऱ्या अर्थानं चांगला जगला, असं म्हणता येईल.

। १४० ।

जगायचं, ते संस्कृतीच्या वृद्धीसाठी. संस्कृतीची अंगं दोन. एक बाह्य आणि दुसरं आंतरिक. वापरून-वापरून गुळगुळीत झालेल्या शब्दांत सांगायचं, तर एक भौतिक आणि दुसरं आध्यात्मिक. दोन्ही अंगं महत्त्वाची. दोन्ही आवश्यक. दोन्हींची सारखीच जोपासना होत राहायला हवी, तरच संस्कृतीच्या वृद्धीत समतोल राखला जाईल.

पण दोन्ही अंगं महत्त्वाची असली, तरी ती एकच नव्हेत. यातलं आध्यात्मिक अंग अधिक महत्त्वाचं. त्याचं स्थान भौतिक अंग घेऊ शकणार नाही.

पास्कलनं म्हटलंय, ''निनेव्हदेखील आज उरलं नाही.'' निनेव्ह हे एके काळी मध्य पूर्व आशियातलं एक मोठं शहर होतं. डोळे दिपवणारं. त्या काळच्या जगात ते वैभवाच्या शिखरावर असलेलं असं शहर होतं. आज त्याच्या खुणादेखील कुठे पाहायला मिळत नाहीत.

भौतिक वैभव डोळे दिपवणारं असलं, तरी ते कायमस्वरूपी राहू शकत नाही.

समजा, उद्या भारतावर एखादं संकट कोसळलं आणि त्यात उपनिषदं, गीता, रामायण, महाभारत, भागवत, कालिदास, भवभूती, रवींद्रनाथ, वगैरे सगळे नष्ट झाले, तर मग भारतवर्ष राहील का? नुसती जमीन राहील, तिच्या उत्तरेकडचा उत्तुंग हिमालय राहील, तिच्या तिन्ही बाजूंना समुद्राची गाज असेल; पण ज्यामुळे भारतवर्ष हा भारतवर्ष म्हणून ओळखला गेला, ते असणार नाही.

याउलट, समजा, भारतावर दोन-चार न्यूट्रॉन बॉम्ब पडले, (ईश्वर न करो. असं बोलू नये. पण समजा, पडले,) आणि त्यामुळे मुंबई, कोलकत्ता, मद्रास अशी सगळी शहरं जळून खाक झाली; फक्त उपनिषदं, गीता, रामायण, महाभारत, भागवत, ही आणि कालिदास, भवभूती, रवींद्रनाथ, गांधी यांनी लिहिलेली पुस्तकंच उरली, तर? तरी भारतवर्ष भारतवर्ष म्हणूनच राहील.

म्हणजेच, भारत हा भारत आहे, तो त्याच्या सांस्कृतिक वारशामुळे. भारतवर्षाचे प्राण या वारशात आहेत. हा वारसा हा त्याचा आत्मा आहे.

आत्मा राहिला, तर तो नवं शरीर धारण करून जगत राहील.

भारतवर्षाचा हा वारसा ही हसण्यावारी नेण्याची गोष्ट नव्हे. जीवनाला दिशा दाखवणारा, अर्थ प्राप्त करून देणारा, जीवन घडवणारा वारसा आहे हा.

जगायचं, ते या वारशात भर घालण्यासाठी.

। १४१ ।

वाल्मिकीपासून रवींद्रनाथांपर्यंतचा वारसा ज्यांच्या वाट्याला आला, तेच सांस्कृतिकदृष्ट्या भारतीय – मग ते कुठे का राहीनात, कोणती का भाषा बोलेनात, कोणत्या का धर्माचे असेनात. या वारशात भर घालून तो अधिक संपन्न करणं, हे प्रत्येक भारतीयाचं कर्तव्य. भर घालायला अनुकूल अशी एक

परिस्थिती आज आपल्याला लाभलेली आहे. आज आपल्या संस्कृतीला नवी परिमाणं, नवी डायमेशन्स् मिळाली आहेत.

पाच शतकांपूर्वी आपण फक्त भारतातच राहत असू. पृथ्वीच्या पाठीवर युरोप नावाचा खंड आहे, हे त्या काळच्या राजा-महाराजांनादेखील माहीत नसे. आजच्यासारखी प्रवासाची साधनं नव्हती; त्यामुळे बाहेरच्या जगाविषयी आपल्याला बरंच काही माहीतच नव्हतं.

आज विमानं आहेत. पहाटे बाहेर पडले, ब्रेकफास्ट कैरोत केला, दुपारचं जेवण लंडनमधल्या एखाद्या रेस्टॉरंटमध्ये घेतलं आणि रात्री झोपायला न्यूयॉर्कला गेले, असा दिनक्रम असणारे लोक आपल्या या गरीब देशातदेखील आज कित्येक पाहायला मिळतील.

आज आपण केवळ भारतात नाही, अवघ्या पृथ्वीवर जगतो आहोत. *'माता भूमि पुत्रोऽहं पृथिव्या: ।'* ही धरित्री माझी आई, मी तिचा पुत्र, ही आज आपली केवळ इच्छा उरलेली नाही; तर वस्तुस्थिती झालेली आहे. आपण मोठे झालो. वाल्मिकीपासून रवींद्रनाथांपर्यंतचा आपला वारसा हा आपला वारसा खराच; परंतु त्यापलिकडचा जगभरातला वारसा हाही आज आपला वारसा झाला आहे. आपली पाळं-मुळं आपल्या भूमीत खोल रुजवायची; पण उन्हं, वारा, पाऊस अंगावर घ्यायचा, तो साऱ्या जगातला.

विनोबांनी म्हटलंय, आम्ही अनादि काळाचे यात्रिक. आमची यात्रा आजही एकसारखी चालू आहे. असा यात्रिक एकाच कोणत्या तरी देशाचा अभिमान बाळगणार नाही. तो कोणत्याही धर्माच्या, पंथाच्या वा जातीच्या जाळ्यात स्वत:ला अडकवून घेणार नाही. विश्वात सद्विचारांची एक बाग फुललेली असेल, त्या बागेत विहार करणं, हा त्याचा स्वाध्याय असेल आणि वेगवेगळ्या मतांच्या लोकांमध्ये एकात्मता निर्माण करणं, ही त्याची साधना असेल. हा आपला आजचा वारसा. हे आपलं आजचं उत्तरदायित्व.

## । १४२ ।

त्याची स्थिती माझ्याच्यानं पाहवत नाही.

किती चांगला होता तो! गरजेपुरतंच मिळवायचा; सुखी होता. एकाएकी त्याला लक्षाधीश व्हायचे डोहाळे लागले. तो कोट्यधीशांशी आपली तुलना करू लागला. 'जपानला हेच का म्हणून जातात? मीही जाईन; माझ्या खर्चानं जाईन,' अशा जिद्दीनं तो पेटून उठला आणि त्यानं 'बिझिनेस' सुरू केला.

माणूस 'सक्सेसफुल' झाला. ज्या कामाला तो हात घाली, ते तडीस नेऊ लागला. अपयश म्हणून माहीत नव्हतं त्याला.

आता पाहतो, तर कर्ज काढतो, हप्ते भरतो, ज्याला-त्याला लाच देतो, ज्याला-त्याला पार्ट्या देत असतो, इथे खड्डा खण, तिथला खड्डा बुजव, तिथे खड्डा खण, इथला खड्डा बुजव, असल्या भानगडींत दिवसभर गुंतून पडलेला असतो. वेळेवर जेवलेलं कधी त्याला कुणी पाहिलेलं नाही. घरातल्या लोकांशी पोटभर गप्पा मारताना कधी तो दिसत नाही.

त्याला पाहून, 'बिझिनेस' म्हणजे एक प्रकारचं 'टेन्शन', या निष्कर्षाप्रत मी आलो आहे.

माणूस 'बिझिनेस' करायला उद्युक्त होतो, तो कशासाठी? हवं तेव्हा हवं ते करता यावं, हवं ते घेता यावं, हवं तिथे जाता यावं, सुखानं जगता यावं, म्हणूनच ना!

सुखानं जगायचं, तर खिशात भरपूर पैसे हवेत. ते सहजपणे हाती येत नाहीत. मिळवावे लागतात. ते मिळवण्यासाठी वेगवेगळे उपद्व्याप करावे लागतात.

या उपद्व्यापाचं नाव बिझिनेस.

बिझिनेस सुरू केला, की काही दिवसांनी लक्षात येतं, सुखाकडे पाठ केल्याशिवाय, तहान-भूक विसरून सगळा वेळ बिझिनेससाठी खर्च केल्याशिवाय बिझिनेस चालत नाही. म्हणजे, सुख मिळवण्यासाठी जो पैसा हवा, तो मिळवण्यासाठी सगळ्यात आधी पाणी सोडायचं, ते सुखावरच. हळूहळू पैसा मिळवण्यातच माणसाला एक प्रकारचं सुख मिळू लागतं. सुखाविषयीच्या त्याच्या कल्पनेतच बदल घडून येतो. 'हवं तेव्हा हवं ते करायला मिळणं, हवं ते घेता येणं', ही त्याची सुखाविषयीची आधीची कल्पना असते. आता 'पैसा मिळवणं... अधिक पैसा मिळवणं' ही नवी संकल्पना त्याच्यावर वर्चस्व गाजवू लागते. आजवर मी कुठचाच श्रीमंत सुखी पाहिलेला नाही. कारण? कारण तो आधी पैशाचा धनी होऊ पाहत असतो, करता-करता एक दिवस पैसाच त्याचा धनी होऊन बसतो.

। १४३ ।

हल्ली एक पुस्तक वाचलं – 'डाएट फॉर न्यू अमेरिका' नावाचं. अमेरिकेत या पुस्तकानं मोठीच खळबळ उडवून दिलीय. लेखक आहे जॉन रॉबिन्सन. तो म्हणतो–

अमेरिकेतल्या लोकांना मांस खायला मिळावं म्हणून तिथे ज्या गायी, डुकरं, कोंबड्या पाळल्या जातात, त्यांना जेवढं अन्न खायला घालावं लागतं, ते भुकेल्या लोकांना दिलं, तर जगातल्या सुमारे एक अब्ज लोकांची पोटं भरतील. एवढंच नव्हे; तर अमेरिकेतले लोक जेवढं मांस खातात, त्याच्या फक्त एक दशांश मांस खायचं त्यांनी कमी केलं, तर दर वर्षी सुमारे एक कोटी लोकांना अन्न देता येईल. एवढं सांगून लेखक पुढे म्हणतो–

एक पौंड बीफ बनवण्यासाठी सोळा पौंड अन्न, पंचवीसशे गॅलन पाणी आणि एक गॅलन पेट्रोल वापरावं लागतं. मांसासाठी पाळण्यात येणाऱ्या या प्राण्यांना पोसण्याकरिता अमेरिका खंडातलं बावीस कोटी एकर जंगल तोडावं लागलं आहे. मेक्सिको, ब्राझिलसारख्या देशांतली निम्म्याहून अधिक जंगलं याच एका कारणापायी नष्ट झाली आहेत. अमेरिकेत दर वर्षी दैनंदिन उपयोगासाठी जे पेट्रोल, गॅस आणि कोळसा वापरला जातो, त्याच्या किंमतीपेक्षा अधिक किंमतीची 'रॉ मटीरियल्स्' मांसोत्पादनासाठी वापरली जातात. यातलं फक्त पाच टक्के रॉ मटीरियल वापरून तितक्याच प्रमाणात तांदूळ, गहू, भाजीपाला आणि फळांचं उत्पन्न काढता येतं.

जगातल्या 'विकसित' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या देशांत – म्हणजेच अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, जपान, नेदरलँड्स् या देशांत जगातले फक्त चोवीस टक्के लोक राहतात; पण जगातलं ऐंशी टक्के अन्न, दूध, लोखंड, ऊर्जा, कागद हेच लोक फस्त करतात. इतके खादाड देश आहेत हे.

आणि वातावरणात सत्तर टक्के कार्बन डाय ऑक्साइडही हेच देश सोडतात.

तिसऱ्या जगात लोकसंख्या वाढली-वाढली म्हणून जगभर लोक बोंब मारत आहेत. लोकसंख्या प्रमाणाबाहेर वाढता उपयोगी नाही. ती वाढू नये, म्हणून एक गर्भपात सोडून बाकी सर्व प्रकारचे उपाय योजले पाहिजेत. हवी तर नसबंदी सक्तीची करावी. तेच कशाला, दोनाच्यावर मुलं झाली, तर त्यावरही अतिरिक्त कर बसवावा. पण, लोकसंख्येला आळा घातला पाहिजे, असं सांगताना विद्वान लोक 'लोकसंख्येच्या प्रमाणात अन्न पिकत नाही' म्हणून जे विधान करतात, त्याची सत्यता मात्र तपासून घ्यावी लागेल.

जगात पिकतं, ते सारं अन्न 'विकसित' देशच फक्त खाऊ लागले, तर अन्न कसं पुरणार? त्यांनी आपलं खादाडपण निम्म्यानं कमी करावं आणि पाहावं – जगात कुणी उपाशी राहतंय का ते.

लोकसंख्येला आळा घालायलाच हवा; पण त्याहूनही या 'विकसित' देशांच्या वखवखीला आळा घालायला हवा.

। १४४ ।

सकाळी राजघाटावर समाधीपाशी एकटाच जाऊन बसलो.

गांधी जन्मशताब्दीच्या वर्षीच 'मी गांधीवादी नाही', असं जाहीर करून टाकलं होतं – माझ्या मापानं कुणीच गांधींचं मूल्यांकन करू नये, म्हणून. गांधींना माझी ही सर्वात मोठी श्रद्धांजली मानतो मी.

गांधींच्या सहवासात राहण्याचं भाग्य ज्यांना लाभलं, त्यांच्यात माझी गणना होत नाही. मी गांधींना पाहिलंय. लक्षावधी, कोट्यवधी लोकांनी पाहिलंय, तसंच. पण इतरांपेक्षा एका बाबतीत मी भाग्यवान. गांधींच्या सहवासात राहिलेल्या व्यक्तींच्या सहवासात राहण्याचं भाग्य भला मिळालं. काकासाहेब कालेलकर, विनोबा भावे, किशोरलालभाई मश्रूवाला, जे. सी. कुमारप्पा, आचार्य कृपलानी, डॉ. राम मनोहर लोहिया या गांधींकडे पाहण्याच्या माझ्या खिडक्या होत.

एवढ्या साऱ्या वर्षांत मी गांधींना एक क्षणभरही विसरलेलो नाही. कोणत्या ना कोणत्या निमित्तानं मला त्यांची आठवण होत असते. जसजशी वर्षं सरतात, तसतसं मला त्यांचं महत्त्व अधिकाधिक जाणवत चाललंय. त्यांनी सांगितलेल्या मार्गानं गेलं, तरच जग अधिक चांगलं होऊ शकेल, असं दिवसागणिक मला वाटत आलंय. जेवढं खोलात जावं, तेवढे गांधी मला अधिकच पटत चालले आहेत.

बुद्धानंतरचा हा सगळ्यात महान माणूस. जगात आजवर जितकी मोठी माणसं होऊन गेली, त्यांच्यातला सगळ्यात मोठा माणूस.

'कोणती वाट धरावी?', असं कुणीही विचारलं, तर मी गांधींनी दाखवलेल्या वाटेकडे बोट दाखवत म्हणतो, "ही. फक्त हीच वाट."

आणि असं असतानाही मी स्वत:ला गांधीवादी म्हणत नाही. 'तू गांधीवादी ना रे? मग असं काय करतोस?' असं कुणी म्हणेल, या भीतीनं नव्हे; विनम्रतेनंच म्हणतो.

माझ्यात आणि इतरांत फरक आहे तो एवढाच की, कोणत्या वाटेनं गेलं असता आपण कुठे पोहोचणार, हे मला ठाऊक आहे. बाकीच्यांना कोणत्या वाटेनं जावं, ते कळत नाही.

मी गांधीवादी नाही, असं म्हटलं, तरी गांधींनी दाखवलेल्या मार्गावर चालण्याचा प्रयत्न करणारा मी एक यात्रिक आहे, हे मला नाकारता येणार नाही. गांधीवाद हा माझा आदर्श आहे. आदर्श नेहमी दूर असतो. पण...

माझ्यापुढे आदर्श तरी आहे. यांच्यापुढे तोही नाही... आणि हे लोक मला गांधीवाद शिकवताहेत!

नाही.

। १४५ ।

गांधी परंपरावादी – कॉन्झर्व्हेटिव्ह – होते. का? कारण, ते सर्वसामान्य लोकांप्रमाणेच बोलत.

ते सर्वसामान्य लोकांप्रमाणेच बोलत, ही गोष्ट खरी; पण ते तसंच का बोलायचे? कारण, सर्वसामान्य लोकांत राहूनच ते कामं करीत होते आणि सर्वसामान्य लोकांच्या साहाय्यानंच जगाला बदलू पाहत होते.

ते समाज 'बदलू' पाहत होते. समाज आहे तिथेच राहावा, असं त्यांना वाटत नव्हतं.

ते काँझर्व्हेटिव्ह नव्हते. सगळं मुळापासून बदलायला हवं, असं म्हणणारे रॅडिकल – क्रांतिकारक – होते ते.

रॅडिकलांतले रॅडिकल होते.

त्यांची एक पद्धत होती. ते रॅडिकल लोकांप्रमाणे जुनं ते मोडीत काढायला निघाले नव्हते. जुनं ते सारं मोडून टाकूया, असं ते म्हणत नव्हते. जुन्यात त्यांनी नवा प्राण फुंकला. नवा प्राण फुंकताच जे जुनं होतं, ते जुनं राहत नाही, ते नवं होतं आणि नवं होताच ते नवं शरीर धारण करून पुढे जातं, हे त्यांनी पाहिलं होतं. याच प्रकारे त्यांनी भारतीय समाजात काही बदल घडवून आणले.

महिलांचंच उदाहरण घेऊ–

स्त्रिया स्वत:ला अबला मानून युगानुयुगं पुरुषाच्या आश्रयानं जगत आल्या होत्या; पुरुषाच्या 'पायाची दासी' बनून राहिल्या होत्या. गांधींनी त्यांच्यापुढे अर्धनारीनटेश्वराचं चित्र ठेवलं आणि म्हटलं, ''स्त्री हे पुरुषाइतकंच अर्धनारीनटेश्वराचं महत्त्वाचं अंग. स्त्रीच्या सोबतीशिवाय पुरुष पूर्ण होत नाही; अपूर्णच राहतो आणि पुरुषाच्या सोबतीशिवाय स्त्री पूर्ण होत नाही. आजच्या परिस्थितीत दोघंही अपंग राहिला आहात. तुम्ही विवाहाच्या वेळी 'धर्मे च अर्थे च कामे च नातिचरामि' म्हणून शपथ घेतली होती. धर्म, अर्थ, काम या तिन्ही बाबतीत तुम्ही दोघांनी मिळून कर्तृत्व केलं, तरच तुमची आजची अपूर्णता संपून तुम्ही पूर्णत्वाला पोहोचाल. स्त्री म्हणजे अबला, हा विचार आधी डोक्यातून काढून टाका. मग पहा समाजात केवढा बदल घडून येतो तो.''

हेच सांगून गांधींनी महिलांना घराबाहेर पडायला लावलं, तोफेच्या तोंडावर उभं राहण्याएवढं धाडस त्यांच्यात निर्माण केलं आणि त्यांच्याकडून मोठमोठी कामं करून घेतली.

यामुळेच स्वातंत्र्य-संग्रामात महिला नेहमीच सर्वांच्या पुढेच राहू शकल्या.

महिलांना पुढे आणण्याचं कार्य यापूर्वी जोतिबा फुले, अण्णासाहेब कर्वे यांच्यासारख्या अनेक सुधारकांनी केलं होतं; पण ते महिलांना केवळ शिक्षणाच्या क्षेत्रातच पुढे आणू शकले होते. तोफेच्या तोंडावर उभं राहण्याचं धाडस त्यांच्यात एकटे गांधीच निर्माण करू शकले होते. स्त्रियांकडे गांधींनी घडवून आणली होती, ती केवळ 'सुधारणा' नव्हती; तर ती होती 'क्रांती'. क्रांती शिक्षणानं घडून येत नाही. तेवढी ताकद शिक्षणात नसते. क्रांती घडते, ती संघर्षातून, लढ्यातून. स्त्रियांना संघर्षात उतरवूनच गांधींनी त्यांच्यात ही क्रांती घडवून आणली होती.

ही क्रांती घडवून आणण्यासाठी त्यांनी भाषा जुनीच – अर्धनारीनटेश्वराची – वापरली होती. गांधी जुनीच उदाहरणं आपल्यापुढे ठेवतात, जुन्याच गोष्टी करतात, असं सगळ्यांना वाटलं होतं; पण जुन्यात नवा प्राण फुंकून त्यांनी ते जुनं राहूच दिलं नव्हतं. सारं नवं घडवून आणलं होतं.

गांधी वा त्यांच्या विचारांनी प्रभावित झालेली कोणतीही स्त्री मग पतीची दासी राहिली नाही; त्याची 'अर्धांगिनी' झाली. अधिकारांच्या आणि कर्तव्यांच्या बाबतीत त्याच्या बरोबरीची झाली.

आपण देशात रामराज्य आणू पाहतो आहोत, असं गांधी म्हणत. कुणी तरी त्यांना रामराज्याची व्याख्या करा, म्हणून म्हटलं, तेव्हा 'ग'च्या बाधेतून मुक्त झालेलं ग्रामराज्य आपण आणू पाहतो आहोत, असं ते म्हणाले. भाषा जुनीच; पण ते म्हणत, "That government is the best which governs the least." गांधींना सरकारच्या हाती सत्ता केंद्रित झालेली नको होती. मार्क्सलाही नको होती. जगात सर्वत्र साम्यवाद आला, की सरकारं आपसूक विरून जातील (स्टेट विल विदर अवे), असं ते म्हणत असत. गांधींच्या मते सरकारं अगदी पूर्णपणे गेली पाहिजेत, असं नाही. पण आपण एक करू शकतो. सरकारच्या हातात सर्व सत्ता केंद्रित होणार नाही, अशी काळजी आपण घेऊ शकतो, असं ते म्हणत. हे कसं करायचं? तर सरकारच्या हाती असलेली जास्तीत जास्त कामं लोकांनी स्वत:कडे घ्यायची, म्हणजे सत्तेचं केंद्रीकरण होणार नाही. पण विकेंद्रीकरणाची प्रक्रिया सर्वप्रथम अर्थव्यवस्थेत करायला हवी. कारण, उत्पादनाची साधनं ज्यांच्या हातात असतात, त्यांच्याच

हातात आजवर सत्ता आणि संपत्ती एकवटत आलेली आहे. म्हणून काय करायचं, तर उत्पादनाची साधनं कुणा एकाच व्यक्तीच्या हातात राहणार नाहीत, याची काळजी घ्यायची. म्हणजेच, उत्पादनाची साधनं आकारानं लहान असायला हवीत आणि ती जास्तीत जास्त लोकांच्या हातांत असायला हवीत. गांधींचं ग्रामराज्य, ते हे. जिथे सर्वांकडे काम असेल आणि जिथे कुणीच कुणाचं शोषण करत नसेल, अशा तऱ्हेची गावं उभी करणारं राज्य. तिथे सगळे एकमेकांच्या साहाय्यानं जगतील.

गांधींचं सर्व चिंतन खेड्यांना केंद्रस्थानी ठेवून होत असे. त्यांच्या काळी देशात सात लाख खेडी होती. सर्वांनी स्वावलंबी व्हावं, मूलभूत सोयी तिथे उपलब्ध असाव्यात, यासाठी ते प्रयत्नरत असत. त्यांचे सगळे विधायक कार्यक्रम (कन्स्ट्रक्टिव्ह प्रोग्रॅम) त्यांनी गावांसाठी आखले होते. गावांतल्या सर्वसामान्य लोकांना समजेल, अशाच भाषेतून ते बोलत असत. त्यांची भाषा जुनाट वाटली, तरी ती जुनी नव्हे, हे लक्षात घेऊनच त्यांचे विचार समजून घ्यायचा प्रयत्न करायला हवा. म्हणजे मग आपलं आपल्यालाच कळून येईल की, गांधींसारखा दुसरा क्रांतिकारी झालेला नाही. असा एक क्रांतिकारी, ज्यानं क्रांतीच्या तंत्रातच क्रांती घडवून आणली.

। १४६ ।

जिला आपण अचेतन – जीव नसलेली – सृष्टी म्हणतो, तिच्यातूनच ही सचेतन म्हणजे सजीव सृष्टी निर्माण झाली ना? जिला आपण चित्-शक्ती म्हणतो, ती या जीवसृष्टीतूनच उदयाला आली ना?

तर मग असं म्हणायला हवं की, चित्-शक्ती ही मुळात जीवसृष्टीत होतीच. ती प्रकट झालेली नव्हती, इतकंच! आणि जी जीवसृष्टी अचेतन आहे, असं आपण म्हणतो, तिच्यातच ती लपलेली होती. उत्क्रांतीची प्रक्रिया सुरू झाली आणि मग जे जे लपलेलं होतं, ते ते हळूहळू प्रकट होऊ लागलं.

आता प्रश्न पडतो–

उत्क्रांतीची ही प्रक्रिया चित्-शक्तीच्या प्रकटीकरणासरशी थांबली की काय? की चित्-शक्तीच्याही पलिकडची दुसरी एखादी शक्ती अजून प्रकट व्हायची राहिली आहे?

तशी ती राहिली असेल, तर आता चित्-शक्तीनंच तिच्या प्रकटीकरणाच्या प्रक्रियेला गती द्यायला हवी.

ईश्वराचा शोध घेण्याची, – तो नसला, तरी आहे, असं मानून – त्याला प्राप्त करण्याची जी एक ओढ माणसात दिसून येते, ती ओढ म्हणजेच उत्क्रांतीच्या प्रक्रियेला गती देणारी प्रेरणा तर नव्हे?

असली पाहिजे. तिची चेष्टा करण्याइतका आपला बुद्धिवाद आंधळा असता कामा नये.

उत्क्रांतीचा उद्देश काय?

पृथ्वीच्या पाठीवर असा एक जीव निर्माण करणं, जो दिसायला माणसासारखाच असेल; पण ज्याच्यापुढे आजचा सर्वाधिक प्रगत माणूसदेखील जंगली ठरेल.

। १४७ ।

ती दिसायला सुंदर होती. याच्या नजरेत ती भरली. हा हुशार. यानं तिच्या नवऱ्याशी ओळख करून घेतली, ओळख वाढवली, मैत्री केली आणि एक दिवस अलगद तिला आपल्या जाळ्यात ओढली. त्याच्या पराक्रमाच्या गोष्टी परवा एकजण सांगत होता. मी विचारलं, ''समजा, त्याची बहीणही एवढीच सुंदर असती, तर तिलाही त्यानं असंच आपल्या जाळ्यात ओढलं असतं?'' त्यावर तो काही बोलला नाही.

मी म्हटलं, ''बहीण, मुलगी, आई या अप्सरेसारख्या सुंदर असल्या, तरी माणूस त्यांच्याकडे अशा नजरेनं कधी बघत नाही.''

''खरंय.'' तो म्हणाला.

''तसं असेल, तर जिला तू शारीरिक ओढ – फिजिकल ॲट्रॅक्शन – म्हणतोस, ती शरीराची नव्हेच; ती मनाचीच ओढ, असं म्हणावं लागेल.''

''हो...''

''तसं असेल, तर समस्त स्त्री-जातीकडे पाहताना या आपल्या माता, आपल्या बहिणी, मुली आहेत, या दृष्टीनं बघता आलं पाहिजे माणसाला. माणूस हा इतर प्राण्यांसारखा नाही. तो एक तर अधिक प्रगत तरी होईल; नाही तर पार घसरून रसातळाला जाईल. इतर प्राण्यांप्रमाणे आपण 'नैसर्गिक' – प्राकृतिक – अवस्थेत राहू, असं म्हणून त्याला तसं राहता येणार नाही. माणसाला 'प्राकृतिक अवस्था'च नाही. तो ज्या क्षणी प्राकृतिक अवस्थेत राहू पाहील, त्या क्षणी त्याचं पतन होऊ लागेल. तो विकृत होईल. दूध काढून होताच आपण ते तापवून ठेवतो. कारण, धारोष्ण दूध फार वेळ टिकत नाही;

नासतं. तापवलेलं दूधही चोवीस तासांपेक्षा अधिक वेळ टिकत नाही. ते एक तर पिऊन तरी टाकावं लागतं; नाही तर मग त्याला विरजण लावावं लागतं. विरजण लावलं, की त्याचं दही होतं, ताक होतं; आणि ताकातून लोणी काढता येतं. ते आणखी काही दिवस टिकतं. लोणी कढवून त्याचं तूप केलं, की ते महिना-दोन महिने टिकतं. दूध कायम दूध-स्वरूपात राहत नाही. दुधाचं तूप होईपर्यंतची जी प्रक्रिया आपण करतो, तिला 'सांस्कृतिक प्रक्रिया' म्हणतात. दुधापेक्षा ती माणसाला अधिक लागू होते. माणूस प्रकृतीपासून अधिक प्रगत होत-होत एक तर संस्कृतीकडे जातो; किंवा मग त्याचं पतन होऊन तो विकृत होतो (नासतो). माणूस पशू नव्हे; पशूंतून देव होण्यासाठी जन्माला आलेला तो एक जीव होय. माणूस हा ऊर्ध्वगामी होय. चांगलं काय, वाईट काय, याची पारख त्याला करता येते. त्यातलं काय घ्यायचं नाही, हे त्याला कळतं. त्यातलं घ्यायला हवं, ते त्याला निवडून घेता येतं. त्याच्यात हा जो 'विवेक' असतो, तसा इतर कोणत्याच प्राण्यात पाहायला मिळत नाही. बाकीच्या प्राण्यांप्रमाणे माणूस भूक लागली, की जेवतो; थकला, की झोपतो; संकटं ओढवताच पळून जातो (वा अंगावर धावून जातो), हे खरं असलं, तरी त्याच्यातल्या विवेकामुळे तो इतर प्राण्यांपेक्षा वेगळा ठरतो. माणूस भूक लागल्यावरही कधी-कधी जेवत नाही (उदा., घरातल्या कुणाचा मृत्यू झालेला असतो, तेव्हा); आणि कधी-कधी तो भूक नसली, तरी जेवणाला नाही म्हणत नाही (उदा., पार्टीला गेलेला असताना). त्याला जागरण करता येतं आणि संकट ओढवलं, तर त्याला धीरानं तोंडही देता येतं. माणसाला 'हुतात्मा' होता येतं. हे त्याच्यातले गुण त्याच्यातल्या विवेकामुळे प्रकट झालेले आहेत. विवेकामुळेच माणूस 'कोणत्या गोष्टीनं आपली प्रगती होईल आणि कोणत्या गोष्टीपायी आपला अध:पात होईल', हे ठरवू शकतो. विवेकामुळेच माणूस आपला अध:पात होईल; अशा गोष्टी टाळतो आणि आपल्याला उन्नत करणाऱ्या गोष्टींचा स्वीकार करतो. भोग आणि संयम या दोन गोष्टी त्याच्यापुढे उभ्या राहिल्या, तर त्या दोन्हींना पारखून घेऊन तो म्हणतो, 'भोग माझा अध:पात घडवून आणील, तर संयम माझी प्रगती घडवून आणील.' आणि असा विचार करून तो भोगाची वाट सोडून संयमाच्या मार्गानं चालू लागतो. त्याला समजा, कुणाचा राग आला, तर 'राग येणं स्वाभाविक आहे,' असं म्हणून तो त्या रागात वाहवत जाणार नाही. तो म्हणेल, 'असा वाहवत गेलो, तर मी रसातळाला जाईन.'

माणसानं नेहमीच राग, द्वेष, मत्सर या भावनांवर विजय मिळवायचा

प्रयत्न केलेला आहे. कारण या भावनांवर विजय मिळवूनच आपण तरतो, हे अनुभवातून तो शिकला आहे.

माणूस देवत्व प्राप्त करो वा न करो; पण त्याला पशू म्हणून कदापि राहता येत नाही. तो पशुत्वाकडून देवत्वाकडे जाईल किंवा पशूपेक्षाही खालच्या थराला जाईल. त्याच्या प्रवासाची दिशा ठरलेली आहे.

त्याच्यातल्या दुबळेपणाला 'स्वाभाविक' म्हणून त्याला आंजारणं-गोंजारणं योग्य नव्हे; आणि त्याला श्रेष्ठत्वाप्रत पोहोचवणाऱ्या गोष्टींविषयी, 'या महात्म्याला शोभणाऱ्या गोष्टी' असं म्हणून त्यांच्याकडे दुर्लक्ष करायला शिकवणं बरोबर नाही. आज आपण ज्यांना 'व्यावहारिक', 'स्वाभाविक' म्हणून मानू लागलो आहोत, त्या खरं तर अ-व्यावहारिक, अ-स्वाभाविक गोष्टी होत किंवा अ-मानवी – अमानुष – होत.

ज्या गोष्टींना आपण 'अति-मानवी' म्हणतो, त्याच खऱ्या व्यावहारिक, स्वाभाविक गोष्टी होत. दुधात विरजण घातल्यावरच त्याचं दही, ताक होतं; आणि ताक घुसळल्यावरच त्यातून लोणी निघतं. लोणी कढवल्यावरच त्याचं तूप होतं, तसंच माणूस प्रकृतीतून संस्कृतीच्या दिशेनं वर चढत गेला, की तो माणूस होऊ शकतो. तसं झालं नाही, तर तो पतन पावून विकृत होतो.

आणि पशूपेक्षाही खालच्या थराला जातो.

। १४८ ।

गोवा मुक्त झाला नव्हता, तोपर्यंत दर १५ ऑगस्टला मी उपास करीत असे – आपण अजून मुक्त झालेलो नाही, याची स्वतःलाच आठवण करून देण्यासाठी... जोपर्यंत गोवा स्वतंत्र होत नाही, तोपर्यंत हिंदूस्तानला 'संपूर्ण स्वातंत्र्य' मिळालं, असं म्हणता येणार नाही, याची आठवण राहावी म्हणून.

गोवा मुक्त झाला आणि मी हा उपास सोडला.

आता दर वर्षी १५ ऑगस्ट येतो. मी उपास करीत नाही; पण उपासाच्याच मूडमध्ये असतो.

'कण्डिशण्ड् रिफ्लेक्स' म्हणावं हवं तर याला.

काकासाहेब कालेलकरांनी एकदा म्हटलं होतं, ''१५ ऑगस्टचा उत्सव साजरा करताना तो ३० जानेवारीच्या संदर्भात करायला हवा. म्हणजेच त्या दिवशी ३० जानेवारीचंही स्मरण करावं, म्हणजे डोक्यात एकाच वेळी

विचारांचे दोन प्रवाह वाहू लागतील : १५ ऑगस्ट रोजी देश का आणि कसा स्वतंत्र झाला, हा एक विचारप्रवाह; आणि स्वातंत्र्य मिळाल्यानंतर सहा महिन्यांच्या आतच ते स्वातंत्र्य मिळवून देणाऱ्या महात्मा गांधींना आपण का आणि कसे गमावून बसलो, हा दुसरा विचारप्रवाह. या दोन प्रश्नांची उत्तरं शोधली, तर देशापुढे आज जे प्रश्न आहेत, ते कसे सोडवायचे, त्याचे उपाय तुमचे तुम्हालाच सुचतील...''

हा देश इतर देशांसारखा एवढासा देश नाही. खंडप्राय देश आहे हा. सांस्कृतिकदृष्ट्या हा देश काल-परवाचा नव्हे; तर अतिप्राचीन, पुरातन संस्कृती असलेला देश आहे. या देशाचे प्रश्न 'वीस कलमी कार्यक्रमा'नं सुटणार नाहीत, 'विकासा'ची गती वाढवूनही सुटणार नाहीत; आणि कायदे करूनही सुटणार नाहीत. सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे या देशाचे प्रश्न कोणतंच सरकार सोडवू शकणार नाही. सामाजिक-सांस्कृतिक दृष्टी असलेलं नेतृत्व पुढे आलं, तर तेच काही करू शकेल.

जवाहरलालजींनादेखील ही सामाजिक-सांस्कृतिक दृष्टी नव्हती. (तर ती इंदिरा गांधी, राजीव गांधी यांच्याकडे कुठून येणार?)

'बॅक टू गांधी' हा एकच उपाय आहे.

त्यांनी किती तरी प्रश्न हाती घेतले होते आणि ते सोडवायचे काय काय उपाय शोधून काढले होते, हे खोलात जाऊन समजून घ्यायला हवं. एक 'नेशन बिल्डर' म्हणून गांधींना समजून घेतलं पाहिजे. गांधी आज फक्त 'रेलेव्हण्ट'च नव्हे; तर 'इनएव्हिटेबल' होऊन बसले आहेत. जवाहरलालनी त्यांना 'बायपास' केलं. विनोबांनी त्यांना 'सरपास' करायचा प्रयत्न केला. त्यांचे बरेच कार्यक्रम 'आजच्या काळात चालणारे नाहीत'... 'व्यवहारात बसणारे नाहीत...' असं म्हणून या देशानं ते मोडीत काढले.

आता 'हेच कार्यक्रम योग्य होते...', 'याशिवाय दुसरे काही उपाय नाहीत...', असं विदेशी विचारवंतांच्या तोंडून ऐकायची वेळ आपल्यावर आली नाही, म्हणजे झालं...

। १४९ ।

कावळे जोरजोरानं कोकलत होते. मी वाचनात गुंग होतो. माझं त्यांच्याकडे लक्ष गेलं नव्हतं. माझ्या नातीचं – पुतुलचं – लक्ष मात्र गेलं. ती दोन वर्षांची. भोवतालच्या जगातलं नवं-नवं काय-काय शिकत असते. तिनं, ''तात्या... का

का...'' म्हणून माझं त्यांच्याकडे लक्ष वेधलं.

मी तिला घेऊन बाहेर गेलो. आमच्या दर्शनी दारापुढे जाईचा कुंज आहे. त्याच्या अलिकडच्या बाजूला एक त्रिफळाचं, एक चाफ्याचं आणि एक गुलमोहराचं झाड आहे. या तिन्ही झाडांवर मिळून तीस-चाळीस कावळे जमा होऊन बसले होते. मधून-मधून भांबावून जाऊन 'का... का...' करत उडायचे आणि पुन्हा झाडावर येऊन बसायचे. म्हटलं, शेतात यांचा कुणी तरी शत्रू आलेला दिसतोय. त्याला पाहून हे घाबरून कोकलताहेत. मी नातीला कडेवर घेऊन कट्ट्यावर उभा राहून बघत राहिलो. एक धामण जाताना दिसली. मी ती नातीला दाखवली; पण तिला ती दिसली नाही. ती पोर ध्यानमग्न होऊन कावळ्यांकडे पाहत होती.

धामण सरपटत दूर निघून गेली, तेव्हा कावळे शांत झाले आणि आपापल्या वाटेनं उडून गेले. मीही कट्ट्यावरून खाली उतरलो.

मला प्रश्न पडला–

नात एवढा वेळ ध्यानमग्न होऊन काय पाहत होती? त्यातून ती काय शिकली?

काही दिवसांपूर्वीचा एक प्रसंग आठवला–

असंच एक दिवस किंगफिशर (किरकिरा) 'किर्र्रर्र किर्र्रर्र' करून ओरडत होता. ते नातीनं ऐकलं. ती धावत माझ्याकडे आली. तिला हा आवाज नवीन होता. तो कोण काढतंय, ते तिला कळत नव्हतं. मी मग तिला असंच आजच्यासारखं बाहेर नेलं.

बाहेर गुलमोहरावर किंगफिशर बसला होता. तो नातीला दाखवून म्हटलं, ''हा बघ, हा किंगफिशर...''

मी तिला 'हा किंगफिशर' म्हणून जे 'ज्ञान' देत होतो, त्याच्याकडे तिचं लक्षच नव्हतं. ती किंगफिशर पक्ष्याकडे बघत होती आणि त्याचा 'किर्र्रर्र किर्र्रर्र' आवाज ऐकून आनंदानं फुलली होती.

मला फार लाज वाटली. म्हटलं, ती आपण होऊन 'शिकतेय.' मी तिला 'शिकवायची' गरज नव्हती.

एकाएकी दोन इंग्रजी शब्द माझ्या ओठांवर आले आणि दोहोंतला फरक स्पष्ट जाणवला.

नात जे शिकतेय, ते 'एज्युकेशन.'

आणि मी तिला 'हा किंगफिशर' म्हणून देतो आहे, ते 'इन्स्ट्रक्शन'. दोन्हींचा अर्थ एक नव्हे.

माणूस निधन पावल्यावर लागलीच त्याच्या घरच्या लोकांनी त्याला पोहोचवण्याची घाई करू नये. कारण, माणूस हा काही फक्त त्याच्या घरात जन्माला आलेला नसतो; तो समाजात जन्माला आलेला असतो. नव्हे; तो 'भुर्भुव स्व:'मध्ये जन्माला येतो. त्याचं नातं फक्त त्याच्या घरच्या लोकांशीच नसतं. घराबाहेरच्या अनेकानेक लोकांशी नातं जोडून तो जगत आलेला असतो. त्याच्या देहावर जितका त्याच्या घरच्या लोकांचा हक्क असतो, तितकाच त्याच्या साथीदारांचा, त्याच्या मित्रांचा अधिकार असतो.

त्याला पोहोचवण्याची संधी या सर्वांना मिळायला हवी.

म्हणून मरण आणि अंत्यसंस्कार यात कमीत कमी चोवीस तासांचं तरी अंतर ठेवावं, असा एक नियम आपण केला पाहिजे. वृत्तपत्रांतून त्याच्या निधनाची सूचना द्यावी आणि अंत्यसंस्कार कुठे आणि कधी करणार, याची माहिती द्यावी. म्हणजे ज्यांना अंत्ययात्रेत सामील व्हायचं असेल, त्यांना यायला पुरेसा अवधी मिळेल. 'आम्हाला कळलंच नाही' अशी तक्रार कुणाला करता येणार नाही.

दुसरा एक नियम केला पाहिजे–

निधन पावलेल्या माणसाचा आणि आपला थेट संबंध नसेल; पण त्याच्या मागे राहिलेल्यांपैकीच कुणाशी आपला थेट संबंध असेल, तर तो निधन पावल्याचं कळल्यावर त्याच्या घरच्या लोकांना भेटून त्यांचं सांत्वन करायला आपल्याला जाता येतं. पण निधन पावलेल्या माणसाचा आणि आपला कोणत्या ना कोणत्या प्रकारे थेट संबंध आला असेल, तर एक वेळ त्याच्या घरच्यांना भेटायला गेलो नाही तरी चालेल; परंतु त्याच्या अंत्ययात्रेला जाण्याचं आपलं कर्तव्य टाळून चालणार नाही. मृत्यू हा एकदाच येतो आणि ज्याच्या सोबतीनं आपण जगलो, वावरलो, त्याला अखेरचा निरोप देण्यासाठी त्याच्या अंत्यसंस्कारावेळी आपण स्मशानभूमीवर हजर हे राहिलंच पाहिजे.

हा केवळ एक शिष्टाचार नाही; एक मोठं कर्तव्य आहे हे. मरण ही एक दुःखद घटना असली, तरी ती माणसाच्या आयुष्यातील फार मोठी घटना होय. या घटनेच्या परिमाणाला शोभेल, असंच आपलं वर्तन असायला हवं.

युरोपियनांकडून आपण दोन चाली उसन्या घेतल्या आहेत. एक, गेलेल्या माणसाला स्मशानात श्रद्धांजली वाहण्याची आणि दुसरी, त्यानंतर शोकसभेत 'त्याच्या आत्म्याला शांती मिळो' म्हणून प्रार्थना करण्याची.

यापैकी श्रद्धांजली वाहण्याची चाल अगदीच दांभिक होय.

'मेल्या म्हशीला बारा शेर दूध' अशा थाटाची श्रद्धांजली वाहिलेली मी अनेक वेळा ऐकली आहे. स्तुती करायची ती किती, याचा काहीजणांना काही सुमारच राहत नाही, ते मी पाहिलंय. ज्यानं आयुष्यभर मेलेल्या माणसाचा दुस्वासच केला, त्याला स्मशानात धाय मोकलून रडताना मी पाहिलंय.

स्तुती करायची म्हणजे तिचा अतिरेक करायचा नाही आणि खोटी स्तुती तर मुळीच करायची नाही.

असल्या दांभिकपणाला कदापि खतपाणी घातलं जाऊ नये.

माझ्या अंत्यसंस्कारावेळी कुणालाही श्रद्धांजली वाहू देऊ नये. 'तुम्ही स्मशानात पोहोचवायला आलात, हेच खूप झालं!' असं म्हणून 'नो फ्युनरल ओरॅशन्स्' असं सांगून टाकावं, असं मी माझ्या कुटुंबियांना, तसंच सर्व इष्टमित्रांना, सहकाऱ्यांना सांगून ठेवतो आहे. मला या 'फ्युनरल ओरॅशन्स्'चा वीट येतो.

माणूस हयात असताना त्याच्याविषयी काहीही बरं बोलायचं नाही; आणि तो मेला, की त्याची तोंड फाटेपर्यंत स्तुती करायची, ही चालच अगदी उबग आणणारी आहे. तिच्यावर बंदी घालायला हवी.

। १५१ ।

माणूस मेल्यावर त्याचा आत्मा त्याच्या शरीराभोवती घुटमळत राहतो, मग एक दिवस ईश्वर अशा साऱ्या आत्म्यांना बोलावून घेतो, त्यांची झाडाझडती घेतो; आणि त्यांच्या पाप-पुण्याचा हिशेब करून त्यांना स्वर्गात वा नरकात पाठवतो, असा ज्यू लोकांचा समज आहे. ख्रिश्चन आणि मुसलमान हे दोन्ही धर्म ज्यू धर्मातून उदयाला आले, त्याच परंपरेत वाढले; म्हणून ख्रिश्चन आणि मुसलमानांतही हाच समज प्रचलित आहे. ईश्वर आत्म्यांची झाडाझडती घेतो, त्याला त्यांच्याकडे 'डे ऑफ जजमेंट', 'कयामत का दिन' असं म्हणायची पद्धत आहे. ख्रिश्चन आणि मुसलमान प्रेताचं दफन करतात, ते यासाठीच की कयामतचा दिवस येईल, तेव्हा त्या त्या आत्म्याला आपापला देह नीट मिळावा म्हणून. याकरिता, तो दिवस उगवेपर्यंत त्याच्या आत्म्याला शांती लाभावी, म्हणून ते प्रार्थना करतात.

मुसलमानांचं एक वेळ समजून घेता येईल. ज्ञान-विज्ञानाच्या क्षेत्रात ते आजही बरेच मागासलेले राहिले आहेत. कित्येक शतकं मागे राहिले आहेत. पण

ख्रिश्चन, विशेषत: युरोपातले, ज्ञान-विज्ञानाच्या क्षेत्रात किती तरी पुढे गेलेले आहेत. जगातील इतर कुणापेक्षाही पुढेच आहेत. त्यांनीही 'कयामत'ची वाट पाहत बसायचं, हे अजबच म्हणायला हवं.

पण हिंदूंनी त्यांची ही चाल कशाला स्वीकारायला हवी? हिंदूंचा आत्म्याविषयीचा विचार वेगळा आहे. माणसाच्या मृत्यूनंतर त्याचा आत्मा एक तर दुसरं नवं शरीर धारण करून पुन्हा जन्म घेतो किंवा त्यानं आयुष्यात खूप पुण्य केलं असेल, तर त्याला मोक्ष मिळून तो कायमचा ईश्वरात विलीन होऊन जातो. म्हणून हिंदूंमध्ये माणूस मृत्यू पावला, की त्याचे सगे-सोयरे त्याचा अग्निसंस्कार करून त्याच्या पार्थिवाला अग्नीच्या स्वाधीन करतात. 'त्याच्या आत्म्याला शांती मिळो' म्हणून प्रार्थना करणं हे हिंदूंच्या तत्त्वज्ञानात अजिबात बसत नाही. युरोपियनांकडून घेण्यासारख्या अनेक गोष्टी आहेत. त्यांच्या चुकीच्या गोष्टी घेऊ नयेत. तसं करणं म्हणजे अंधानुकरणच म्हटलं पाहिजे. हिंदूंनी आता ही चाल बंद करायला हवी.

मृत्यूनंतरच्या गोष्टीसंबंधात लिहायला बसलो आहे, तर आणखी एका बाबीसंबंधात सांगू इच्छितो–

मृत शरीर जमिनीत पुरण्याऐवजी त्याच्यावर अग्निसंस्कार करून ते अग्नीच्या स्वाधीन करणं हे अधिक विज्ञानसंमत आहे, असं आता सगळ्या विचारवंतांचं मत झालं आहे. भूमीवर हक्क असतो, तो फक्त झाडा-पेडांचा. तिला माणसांनी आपल्या थडग्यांनी अडवून, व्यापून टाकणं योग्य नव्हे. पण सर्वांनीच अग्निसंस्काराची चाल सुरू केली, तर झाडा-पेडांवर काय अवस्था ओढवेल, हे सांगणं कठीण. माणूस किती केलं, तरी अखेर माणूस. तो तरी काय करील? आज तर माणसापेक्षाही झाडा-झुडपांची किंमत जास्त झाली आहे.

म्हणून ठिकठिकाणी आता विद्युत्वाहिन्यांची-इलेक्ट्रिकल क्रिमेटोरियम्सची पद्धत सुरू करायला हवी. पण...

आपल्यासारखे जे लोक समुद्राकाठी राहतात, त्यांनी आता एक नवी पद्धत का सुरू करू नये? पार्थिव शरीरं समुद्रात सोडायची. अग्नीला अर्पण करण्याऐवजी वरुणाला अर्पण करायची. दोघेही आर्यांचेच देव. दोघेही सारखेच श्रेष्ठ. इंग्लंडमध्ये नौदलात काम करणाऱ्यांचे अंत्यसंस्कार या प्रकारे झाले. इंग्रजांच्या कोणत्याही चाली निर्बुद्धपणे घेण्यापेक्षा या प्रकारच्या चाली सुबुद्धपणे घेतलेल्या बऱ्या. जे लोक आयुष्यभर मासे खात आले आहेत, त्यांनी जग सोडून जाताना आपलं शरीर माशांना खायला घातलं, तर एक पुण्यकर्म

होईल आणि आपल्यासाठी जे एक झाड तोडलं जाणार, तेही वाचेल; त्यामुळे आणखी एक पुण्यकर्म पदरात पडेल.

मग अस्थि-विसर्जनाच्या वेगळ्या विधीची गरजच उरणार नाही.

माणसाचं एक बरं असतं : ते तुम्हाला तुमची जागा दाखवून देतं. जिवंतपणी हवी ती जागा तुम्ही अडवून बसा, मेल्यावर तुमची नेमकी जागा ते तुम्हाला देतं. तुम्ही कुणाला फसवूच शकत नाही...





श्रीयुत रवीन्द्र केळेकर यांना आज 'ज्ञानपीठ' विजेते विचारवंत व साहित्यिक म्हणून भारतीय सारस्वताच्या मांदियाळीमध्ये ओळखले जाते. 'ओथांबे' हा त्यांचा मुक्तचिंतनपर स्फुट लेखांचा संग्रह. हा संग्रह म्हणजे प्रेरक असे चिंतनशिल्प आहे.

या पुस्तकातून आलेले लेखन हे केवळ दैनंदिनी नव्हे. निमित्त दैनंदिनीचे. मात्र त्यातून रवीन्द्रबाबांचे समाज-संस्कृतीविषयीचे चिंतनच प्रामुख्याने शब्दबद्ध झालेले आहे. त्याचे स्वरूप हे अनुभव, निरीक्षण, चिंतन यांची नोंद या स्वरूपाचे असून त्यासाठी त्यांनी निबंधसदृश फॉर्मची निवड केलेली आहे.

'ओथांबे' वाचताना डाग हेम्मरशोल्डच्या 'Markings' ची आठवण येते. मनात आलेले विचार, सूक्ष्म भावना, जीवन आणि मरण याविषयीचे खोल चिंतन हेम्मरशोल्ड एकत्र करून ठेवत असे. त्याचप्रमाणे रवीन्द्रबाबांमधील चिंतक कवीच्या नजरेने त्या जगाकडे पाहतो आणि ज्या गोष्टी सामान्यपणे आपल्या नजरेला दिसत नाहीत त्या अचूक टिपतो.



पद्मगंधा
प्रकाशन